लित साहित्य प्रकाशन ४१ वें

# चाहूल

ना. सी. फडके

द्वितीयावृत्ति
१४ जानुआरी १९५४

किंमत पांच रुपये

प्र का श क
पंडित अनंत कुलकर्णी
कु ल क र्णी ग्रं था गा र,
१८६ शनिवार, पुणें २.



मुं ब ई ए ज न्सी
अं ज लि प्र का श न लि.
३७, वेस्टर्न इंडिया हाऊस,
सर फेरोजशहा मेथा रोड,
फो र्ट, मुं ब ई १.



ही कादंबरी १९५३ च्या
अंजलि दिवाळी अंकांत
प्रथम प्रसिद्ध झाली.

मु द्र क
वि ष्णु ग णे श मा टे
' विश्वकर्मा ' मुद्रणालय
टिळक रोड, पुणें २.

# चा हू ल

ना. सी. फडके

मुखपृष्ठावरील सुंदर चित्र सुप्रसिद्ध कलावंत **श्री. अच्युत बापट** यांनीं श्री. दत्ता धर्माधिकारी यांच्या "आल्हाद चित्र" "**सुहागन**" मधील तारका गीताबाली यांच्यावरून तयार केलेलें आहे.

# ना. सी. फडके

## यांचीं आमचीं प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| १ | मंथन | ४ |
| २ | झंझावात | ५ |
| ३ | हंसूं आणि आंसूं | ५ |
| ४ | जेह्लम | ६ |
| ५ | कमलपत्रें | ३ |
| ६ | अभ्यंगस्नान | ३ |
| ७ | मैफल | ३ |
| ८ | उद्धार | ७॥ |
| ९ | खेळणीं | ५ |
| १० | मिठी | २॥ |
| ११ | बस नं. १२ (हिंदी) | २ |
| १२ | सुषमा | ५ |
| १३ | चाहूल | ५ |

### आगामी

१ हांक, २ निरंजन, ३ सांवली.

# फडके साहित्य

## कादंबऱ्या

(१) अल्ला हो अकबर
(२) कुलाब्याची दांडी
(३) जादूगार
(४) दौलत
(५) अटकेपार
(६) निरंजन
(७) कलंकशोभा
(८) आशा
(९) उद्धार
(१०) काश्मिरी गुलाब
(११) प्रवासी
(१२) समरभूमि
(१३) उन्माद
(१४) गुप्त प्रायश्चित्त
(१५) इंद्रधनुष्य
(१६) प्रतिज्ञा
(१७) वादळ
(१८) शाकुंतल
(१९) अखेरचें बंड
(२०) बस नंबर बारा
(२१) जीवन संगीत
(२२) माझा धर्म
(२३) झंझावात
(२४) अंजलि
(२५) जेहलम
(२६) पतंग
(२७) हंसू आणि आंसू
(२८) उजाडलं ! पण सूर्य कुठें आहे ?
(२९) भरतीची लाट
(३०) खेळणीं
(३१) सितारा मंझिल
(३२) सरिता सागर
(३३) हांक
(३४) सुषमा
(३५) चाहूल

## प्रबंध

(३६) मानसोपचार
(३७) मानसोन्नति
(३८) सुखाचे संसार
(३९) संतति-नियमन
(४०) आजचे तरुण स्त्री-पुरुष
(४१) प्रतिभा साधन
(४२) वाङ्मयविहार
(४३) आधुनिक गाता
(४४) मानसमंदिर
(४५) साहित्य व संसार
(४६) मनोहरची आकाशवाणी
(४७) वेचलेले मोती
(४८) टाकीचे घाव
(४९) टांकाच्या फेकी
(५०) माझ्या साहित्य-सेवेंतील स्मृती भाग १ ला
(५१) माझ्या साहित्य-सेवेंतील स्मृती भाग २ रा
(५२) कोंदणें
(५३) शेलापागोटें
(५४) लघुकथा लेखन : मंत्र आणि तंत्र

## नाट्य

(५५) युगांतर
(५६) संजीवन
(५७) तोतया नाटककार
(५८) काळे गोरे
(५९) जानकी
(६०) जडावाची देवी [नाटिका]
(६१) आगलावी [नाटिक
(६२) क्षमेसाठीं उ [नाटिका

## गोष्टी

(६३) प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
(६४) भाग २ रा.
(६५) लोला आणि इतर गोष्टी
(६६) नमुनेदार गोष्टी
(६७) उल्हासकथा
(६८) वत्सला आणि इतर गोष्टी
(६९) चंद्रा आणि इतर गोष्टी
(७०) लाडकी लक्ष्मी आणि इतर गोष्टी
(७१) माझा देश आणि इतर गोष्टी
(७२) जिवाचं मैतर
(७३) बाजुबंद
(७४) अत्तर गुल
(७५) मागं वळून नकोस
(७६) अभ्यंगस्ना
(७७) किशोरकथ
(७८) प्रीतिपुष्प
(७९) मिठी
(८०) सोबत

## ललित गद्य

(८१) गुजगोष्टी
(८२) नव्या गुजगोष्टी
(८३) धूम्रवलयें
(८४) अबोलीच्या गोष्टी
(८५) मैफल
(८६) कमलपत्रें

## चरित्रें

(८७) दादाभाई नौरोजी
(८८) टेरेन्स मॅक्स्विनी
(८९) डी व्हॅलेरा
(९०) तीन थोर देशभक्त
(९१) लोकमान्य टिळक
(९२) महात्मा (मराठ
(९३) महात्मा (हिंदी

## व्याख्यानें

गाजलेलीं भाषणें

मित्र हो !

(१६) मंथन

(१७) खाडिलकराच्या नाट्य-कृती

(१८) किर्लोस्कर, देवल, आणि गडकरी

## काव्य

(१९) रुमझुम

## ENGLISH

0) Sex problem in India

1) Psychology

2) Social Psychology

4) Elements of th

4) History of Philosophy

(105) Manual of Logic

(106) Birth Control

(107) Leaves in the August wind (Novel)

(108) Birth Pangs of New Kashmir

(109) Sunbeams & Shadows (Stories)

(110) India Vs. Common-wealth Tests 1950-51

(111) India Vs. M.C.C. Tests

---

: : २ : :

“हां हां धावूं नका ! मैनाताई, धावूं नका !”

छोट्या मैनाचा फराळाचा डबा आणि थर्मास हातांत घेऊन जिन्याच्या पायऱ्या सावकाश चढणारी सारजा मोलकरीण ओरडली.

मैना तिच्यापुढें चार पायऱ्या होती ती तेवढ्यांत आठ पायऱ्या पुढें चढून गेली.

धावूं नका म्हणून सारजानं ओरडावं आणि त्याकडे लक्ष न देतां मैनानं आणखी पुढें धांवावं हा रोजचाच प्रकार होता. सारजा मोलकरीण मध्य वयाची होती, आणि मैना फक्त पांच वर्षांची होती. एकाच तऱ्हेनं आणि सारख्याच वेगानं दोघी जिना चढतील हें कसं शक्य होतं ? बालकमंदिरांतून घरीं परत येतांना मैनाच्या मनांत अनेक कल्पन ा तरंगत असत. आपण चोर आहोंत आणि पळून जात आहोंत, आपण पक्षी असून घरट्याकडे जात आहोंत, किंवा ज्याच्या मागें शिकारी कुत्रा लागला आहे असा सुंदर चपळ ससा आपण आहोंत असं तिनं मनाशीं ठरविलेलं असे. शाळेंत ऐकलेल्या गोष्टींवरून या कल्पना तिला सुचलेल्या असत. आज तिच्या बाईंनीं राजकन्येची ोष्ट सांगितली होती. त्या गोष्टींत ती राजकन्या बापाकडे तीरासारखी धांवली असं तिनं ऐकलं होतं. घरीं परत जातांना ती स्वतःला राजकन्या समजत होती. मग सारजाच्या आरोळीकडे ती काय लक्ष देणार ! शाळेंतलंच एक गाणं गुणगुणत आणि त्याच्या तालावर एकेक पायरी ओलांडत ती धांवत होती. ‘चद्रानिवामां ’तलीं मोठीं मुलं दोन दोन पायऱ्या ओलांडून चढत आणि उतरत तें तिनं पाह्यलं होतं. आपल्याला इतक्या जलद धांवतां येत नाहीं याचा तिला खेद होत असे. मोठं झाल्यावर

काय काय करायचं याबद्दल तिनं मनाशीं जे अनेक बेत केले होते त्यांतला एक असा होता कीं जिन्याच्या दोन पायऱ्या ओलांडून नेहमीं चढायचं किंवा उतरायचं. दोनच? तीन कां नाहीं?—असं तिच्या मनांत येई; परंतु नुसत्या त्या कल्पनेचीच तिला भीति वाटे. तीन पायऱ्या ओलांडणं आपल्याला साधायचं नाहीं अशी कबुली ती आपल्या मनाशीं देत असे. मोठ्या मुलांना तरी तीन पायऱ्या ओलांडणं कुठें साधत होतं? फक्त सुतारमामांच्या सदूलाच ही गोष्ट करतांना तिनं पाह्यलं होतं. सदू काय वाटेल तें करी. जगांत त्याला अवघड अशी गोष्टच नव्हती...एकेक पायरी ओलांडून धांवणंच सध्या पुरे असं मनाशीं ठरवून ती धांवत होती... "धांवूं नका! धांवूं नका!" ही सारजेची आरोळी ती शक्य तितक्या वेगानं मागं टाकीत होती...तीरासारखी निघालेली राजकन्या होती ती!...

मात्र राजकन्येप्रमाणें बापाकडे जाण्याचा विचार मैनाच्या मनांत नव्हता! तिचे वडील डॉक्टर होते. तिची शाळा सुटून ती घरीं येण्याच्या सुमारास ते बहुधा आपल्या खोलींत आरामशीर निजलेले असत. तिची आई बहुधा शेजारच्या ब्लॉकमध्यें नवीन महिलामंडळ निघालं होतं त्याच्या बैठकीला गेलेली असे. उंच शेगड्यांखालच्या कपाटांत तिच्यासाठीं झाकून जें कांहीं ठेवलेलं असेल तें सारजा तिला खायला देत असे. मैनाची लहर लागली तर ती सरळपणें टेबलाजवळच्या खुर्चीवर बसून खात असे, नाहीं तर मन मानेल तिकडे पळून जात असे. "मैनाताई! खातां कीं नाहीं? वहिनी-साहेबांना सांगेन बरं कां!" असा धाक सारजा दाखवी. परंतु मैना तो जुमानीत नसे. सारजा तिला आवडत असे. बालक मंदिरा-जवळ चिंचा विकणारा एक माणूस कधीं कधीं बसलेला असे तो सारजेचा पाहुणा होता व त्याच्या पाटींतली एक तांबडी चिंच निवडून सारजा मैनाला देत असे. सारजा फार चांगली होती याबद्दल तिची खात्री होती. तिचा अपमान करण्याची मैनाची इच्छा नसे. परंतु ती मनाशीं म्हणे, भूक नसतांना खायचं कसं? तिला मनाशीं नेहमीं हाच चमत्कार वाटे कीं जें ऐकणं कठीण आहे असं हीं मोठीं माणसं

लहान मुलांनासांगतात कशाला? आणि लहान मुलांनीं ऐकलं नाहीं कीं अपमान झाला असं समजतात कशाला?...

आज तर सारजा कितीही ओरडली तरी ती मुळींच खायसाठीं टेबलाजवळ बसणार नव्हती. नाना नेहमींप्रमाणें झोपलेले असले आणि आई शेजारीं गेलेली असली तर ती सुतारमामांच्या सदू-बरोबर खेळणार होती...

'चंद्रनिवासा'ची चार मजली टोलेजंग इमारत चार महिन्यां-पूर्वींच तयार झाली होती. खूप विस्तीर्ण चौकाच्या चारही बाजूंस बांधलेल्या पांच पांच खोल्यांच्या ब्लॉक्समध्यें रहावयास आलेल्या कित्येक मंडळींनीं आपल्याला हव्या तशा सोयी आणि फार्निचर ज्या मिस्त्रीकडून करून घेतलं होतं त्याला निवासांतले सारे बाबा लोक सुतारमामा म्हणत असत. गेले आठ दिवस सुतारमामांचा मुक्काम डॉक्टरांच्या ब्लॉकमध्यें होता. त्यांच्याबरोबर त्यांचा आठ नऊ वर्षांचा मुलगा सदू येत असे. त्याची आणि मैनाची गट्टी जमली होती. करवत धरण्यांत, गिरमिट धरण्यांत, रांधा मारण्यांत बापाला मदत करणाऱ्या सदूकडे ती लक्षपूर्वक पहात बसे. तिला वाटे आपणही सदुसारखं काम करावं. पण "नका नका ताईसाहेब" म्हणून सुतारमामा तिला कोणत्याही हत्याराला हात लावूं देत नसत. इकडे तिकडे पडलेल्या रांध्याचा केर काढून फडक्यांत गोळा करण्याच्या कामांत सदूला मदत केल्यावांचून मात्र ती रहात नसे. शाळेंतल्या आपल्या मैत्रिणींना ती सांगे "आमच्या घरीं सुतारमामा येतात त्यांना मदत करतें मी." या गोष्टीचा पुरावा म्हणून आपल्या मैत्रिणींना ती एक छोटी डबी दाखवीत असे. सदूकडून मिळविलेले बारीक बारीक खिळे स्क्रू त्या डबींत तिनं ठेवले होते. एखाद्या मैत्रिणीनं हट्टच धरला तर ती एक खिळा किंवा स्क्रू देत असे, व त्याच्या बदला दुध्या पेन्सिलीचा तुकडा किंवा लिमलेटाची गोळी घेत असे. या विक्रींतला हिस्सा ती सदूला न चुकतां दुसऱ्या दिवशीं देई. तो तिचा फार आवडता होता. कामांतून सवड झाली कीं तो आणि ती मिळून वरच्या मोठ्या

गच्चीवर जात व एका कोपऱ्यांत सावली पडलेली असे तिथें बसत. डॉक्टरांनीं तिच्यासाठीं रंगीत चित्रांचीं पुष्कळ पुस्तकं आणलीं होतीं, त्यांतल्या गोष्टी तिला वाचतां येत नसत. सदू पुस्तक हातांत घेऊन तिला गोष्टी सांगे. त्या पुस्तकांतल्याच असल्या पाहिजेत याविषयीं तिला शंका नसे. ती त्याला विचारी "तूं कोणत्या शाळेंत जातोस?" तो म्हणे, "मी कुठला शाळेंत जातो आहे?" परंतु त्याला पुस्तक घडाघड वाचतां येत असलं पाहिजे याबद्दल तिची खात्री होती. पुस्तकांतल्या गोष्टी तो सांगत असे त्या उगीच कीं काय?...

परंतु जिन्याच्या तीन तीन पायऱ्या ओलांडण्याच्या करामतीपेक्षां व गोष्टी वाचून दाखविण्याच्या चार्तुर्यापेक्षांही त्याची जी गोष्ट मैनाला अधिक आवडत असे ती म्हणजे तोंडानं बाजा वाजविणं. लहानसा टीचभरच बाजा होता त्याचा. परंतु बाजा ओठाला लावून आणि डाव्या पंजानं तोंड झाकल्यासारखं करून सदू वाजवूं लागला कीं किती गोड गोड स्वर त्यांतून निघूं लागत! 'कुंकू' चित्रपट तिच्या नानांनीं तिला दाखविला होता, त्यांतलीं 'भारती सृष्टीचें सौंदर्य खेळे', 'एक होता राजा एक होती राणी' हीं गाणीं तो अगदीं हुबेहूब वाजवून दाखवी. "मला पाहूं जरा" असं ती म्हणाली कीं सदू बाजा तिच्या हातांत देई. पण तो वाजविणं तिला मुळींच साधत नसे, आणि तिला फार वाईट वाटे. सदूएवढ्या आपण मोठ्या झालों कीं बाजा वाजवितां येईल असं ती आपल्या मनाचं समाधान करून घेत असे. ज्या अनेक गोष्टींसाठीं मोठं होण्याची घाई मैनाला वाटत असे त्यांत ही एक गोष्ट होती...

कधीं कधीं सदू आपल्या बापाला मदत करीत असला कीं मैना त्याच्या लेंग्याच्या खिश्यांतून बाजा काढून घेऊन वाजवीत असे. 'भारती सृष्टीचे' या गाण्याचे स्वर बाजांतून निघत नसत. पण तिला भास होई कीं आपण ते बरोबर काढले. मग ती जोरजोरानं बाजा वाजवूं लागे. एकदां ती अशी बाजा फुंकीत असतांना नाना

एकदम खोलींत आले. त्यांनीं विचारलं " मैनाताई, हें काय चाललंय काय ? "

" नाना, आमचं गाणं ओळखा पाहूं ? " असं म्हणून तिनं बाजांतून सूर काढले. नाना नुसते बघत राहिले तेव्हां तिनं विचारलं, " नाहीं ओळखलं ? हुर्यो रे ! पुन्हां ऐका हं." ती पुन्हां वाजविगार होती.

पण नानांनीं तिला विचारलं " कुणाचा बाजा ? "

" या सदूचा."

" त्याचा उष्टा बाजा वाजवितेस ? " असं म्हणून नानांनीं बाजा तिच्या हातांतून काढून घेतला, आणि तो देतांना सदूला बजावलं, " हिनं मागितला तरी पुन्हां देऊं नकोस हं."

सदूचा उष्टा बाजा वाजविला तर काय बिघडलं हा प्रश्न मैनाच्या मनांत न सुटतांच राहिला होता परंतु त्याचं उत्तर मिळालंच पाहिजे अशी काहीं गरज नव्हती. नाना निजलेले असले कीं सदूबरोबर गच्चीवर जाऊन बाजा वाजविणं अगदीं सोपं होतं...

आज मैनाची स्वारी सारजाच्या आरोळीला न जुमानतां पायऱ्यावरून धांवत निघाली होती ती सुतारमामांच्या सदूशीं खेळायला मिळेल या अपेक्षेच्या ओढीनंच !

शक्य तितक्या घाईनं मैनाचा पाठलाग करीत सारजा ब्लॉक-मधल्या दोन खोल्या ओलांडून सैंपाकघरांत पोचली तेव्हां मैनानं उभ्या उभ्या पाण्याचं भांडं तोंडाला लावलं होतं. " अहो, आधीं नका पाणी पिऊं, खाल्ल्याशिवाय काय पाणी पितां ? " असं म्हणून सारजानं पाण्याच्या भांड्याला हात घातला. पण तिच्यावर खेकसून मैना म्हणाली, " मला तहान लागली आहे भूक नाहीं लागली." तिनं पुन्हां भांडं तोंडाला लावलं. " अहो थोडंसं तरी खा " सारजानं आग्रह करतांना तिच्या खांद्यावर हात टाकला. तो झटकून टाकीत मैना फुसफुसली, " मला भूक नाहीं म्हणून सांगितलं ना तुला ? मी नाहीं खाणार जा. " तिनं पाण्याचे आणखी दोन मोठे घोट घेतले, "सारजिटली कुठली !" असं म्हणून उरलेलं पाणी तिच्या

अंगावर फेकलं, आणि पुढच्या खोलींत सुतारमामांच्या कामाची कटकट चालली होती तिकडे धांव घेतली...

नंतर पांच दहा मिनिटांत ती सदूबरोबर गच्चीवर गेली, आणि नेहमींच्या सावलीच्या जागीं बसली. नेहमींप्रमाणें तिनं रंगीत चित्रांचं एक पुस्तक त्याच्या हातीं दिलं आणि म्हटलं " यांतली गोष्ट वाचून दाखवितोस ? " " होय " म्हणून सदूनं गोष्टीला आरंभ केला. " आंबोली नांवाचं गांव होतं. तिथें जिकडे तिकडे ताडामाडांची झाडं होतीं. गांवाला लागूनच खाडी होती. समुद्राला भरति आली कीं खाडीचा सारा भाग पाण्यानं तुडुंब भरून जाई. मग छोटी मोठीं पोरं छोट्या छोट्या होड्या घेऊन आंत जायला निघत..." सदू रत्नागिरीकडचा होता त्यामुळें मैनाचं छापील रंगीत पुस्तक घेऊन त्यांतली गोष्ट तो सांगूं लागला कीं ती नेहमीं ताडी-माडीच्या झाडांनीं झाकलेल्या लहानशा गांवाचीच असे. त्या गोष्टींत समुद्र असे किंवा खाडी असे, कोळी कोळीणी असत, मोठे मासे असत, लहान माशांचे ढीग पडले कीं उन्हांत त्यांचीं चंदेरी पोटं चकमकत असत... सदूच्या गोष्टींचा साचा कांहींसा ठरीव झाला होता. परंतु मैनाला कंटाळा येत नसे. आज शाळेंत तिच्या बाईनीं राजकन्येची गोष्ट तिला सांगितली होती ती तिला आवडली होती. परंतु आंबोली गांवांतल्या चिक्कू मारवाड्याची जी गोष्ट तिच्या पुस्तकांत पाहून सदू तिला सांगूं लागला तिच्यापुढें कसली ती राजकन्येची गोष्ट ! ..

तीन गोष्टी सदूनं वाचून दाखविल्या. मैना त्याला म्हणाली " आतां तुझा बाजा वाजवूं दे मला जरा. " त्यानं खिशांतला बाजा काढला तो हातीं घेतां घेतां तिनं विचारलं " आतां मला यायला लागलं कीं नाहीं रे थोडं थोडं ? "

सदूला खोटं बोलणं भागच होतं. तो म्हणाला " तर ! आतां किती तरी छान वाजवितेस तूं ! "

हवी ती प्रशंसा मिळाल्यावर मैना स्वतःची टीकाकार बनली. ती म्हणाली, " पण तुझ्यासारखं येत नाहीं रे. "

सदू हंसला आणि म्हणाला " फुंकर सोडण्याची आणि ओढण्याची युक्ति आहे ती तुला अजून साधत नाहीं. "

" मग शिकव ना मला. "

" गाणं वाजवायचं बंद कर. एकाच सुरावर तोंड ठेव. अन् मी सांगतों तसा श्वास सोड आणि आंत घे. "

त्यानं सांगितल्याप्रमाणें ती करूं लागली. बाजांतून गाणं निघत नव्हतं, परंतु एकच स्वर अगदीं स्वच्छ निघूं लागला. कांहीं तरी नवीन ज्ञान आपल्याला झालं, नवीन विद्या कळली, या जाणीवेनं मैनाला विलक्षण हर्ष झाला. उलट सुलट फुंकर घालून ती बाजावर ' फों फों ' करीत होती व " बरोबर आहे. बरोबर आहे " असं सदू म्हणत होता. शिकविणारा आणि शिकणारी अगदीं रंगांत आलीं होतीं.

" मैनाताई ! इथें गच्चीवर येऊन बसून हें काय चाललंय ? "

नानांचा आवाज ऐकल्याबरोबर मैना दचकली. तिनं पाहिलं तों नाना तिच्यासमोरच उभे होते त्यांच्याकडे बघतां बघतां हंसत ती म्हणाली " नाना, बाजा वाजवायची एक अगदीं सोपी युक्ति आहे. तुम्हांला माहीत आहे ? फुंकर सोडतां न् ओढतां आला पाहिजे. बघा हं. " तिनं ' फों फों ' करून वाजवूनच दाखविलं आणि विचारलं " आहे कीं नाहीं ? या सदूनं शिकविलं मला. "

नानांनीं तिचं किंचित्‌ही कौतुक न करतां तिच्या हातांतला बाजा काढून घेतला. ते गंभीर स्वरांत म्हणाले " खालीं चला पाहूं आधीं दोघं. "

सदूनं तिचीं पुस्तकं गोळा केलीं. नानानीं तिचा हात धरून तिला जिन्याच्या तोंडाकडे नेलं. सदू त्यांच्यापुढें सटकला आणि नेहमींप्रमाणें तीन तीन पायऱ्यांवरून उड्या मारीत पुढें गेला. तें पाहून नाना पुटपुटले, " वाह्यातच दिसतंय कार्टं ! " ' वाह्यात् ' म्हणजे काय तें मैनाला कळलं नाहीं. परंतु सदूच्या तीन पायऱ्यां-वरच्या उड्या नानांना पसंत पडल्या नसाव्यात एवढं तिनं

ओळखलं. मनांतल्या मनांत तिला नानांचा मोठा चमत्कार वाटला. हीं मोठीं माणसं कधीं कौतुक करायची नाहींत, नांवं ठेवायची फार हौस यांना...

खालीं आल्यावर मैना ज्या खोलींत सुतारमामांचं काम चाललं होतं त्या खोलींत जाऊं लागली. नाना तिला जाऊं देईनात. ते तिला ते म्हणाले "माझ्या खोलींत चल." ती त्यांच्या हाताशीं ओढ घेऊं लागली व त्यांच्या पकडींतून तिला सुटतां येईना तेव्हां तिनं मोठ्यांदा गळा काढला. "बरं बुवा! जा तिकडे" असं म्हणून नानांनीं तिचा हात सोडला तरी तिचं भोकाड कांहीं थांबलं नाहीं. आतां खरं म्हणजे केवळ रडण्याच्या मजेखातर ती रडत होती. अशी ती पुष्कळदां रडत असे. तिच्यावरचा राग कुणावर तरी काढण्यासाठीं नानांनीं सदूला खसकन् ओढलं, त्याचा बाजा त्याच्या हातांत कोंबला आणि "पुन्हां तिला उष्टा बाजा दिलास तर खबरदार!" असं दरडावून त्याच्या एक मुस्कुटांत मारली. ती कांहीं फारशी जोरात नव्हती सदूला तिचं कांहींच वाटलं नाहीं. त्यानं बाजा घेतला आणि लेंग्याच्या खिशांत घातला. परंतु मैनानं मोठी किंचाळी फोडली आणि ती मोठमोठ्यांदा रडूं लागली. तिला नानांचा फार राग आला होता. त्यांना खूप चिमटे घ्यावेत, ओरखाडावं, असं तिला वाटत होतं. पण तें करतां येत नव्हतं म्हणून ती रडत होती. "गप! तुला काय झालं रडायला? चल पाहूं माझ्या खोलींत!" असं म्हणून नाना तिला ओढूं लागले. मैना जास्तच किंचाळूं लागली. किंचाळण्याच्या अनेक तऱ्हा तिला अवगत होत्या.

नानांनीं तिला ओढीत खोलीबाहेरच्या बोळकांडींत नेलं. आपल्यावर हा शुद्ध अत्याचार होत आहे या कल्पनेनं मैनाचा बापावरचा राग अगदीं शिगेला पोचला. "मैने, गप रहातेस कां देऊं चांगला धपाटा?" नाना ओरडले. ते तिला एक रद्दा लगावणारच होते.

पण तितक्यांत ब्लॉकचं पुढचं दार धाडकन लोटलं गेलं, आणि

एक तरुण विधवा स्त्री आंत आली. "काय, झालं काय?" तिनं विचारलं.

तिला पाहिल्याबरोबर मैना तिच्याकडे धावली, व तिनं उचलून कडेवर घेतल्याबरोबर तिच्या खांद्यावर मान टेकून ती एकदम गप्प झाली. मैनाचे वडील त्या स्त्रीला म्हणाले "फार त्रास देते ग. भलते हट्ट करते बघ!" त्या स्त्रीनं हंसून म्हटलं "तुम्हांलाच कळत नाहीं. आमची मैना मोठी शहाणी आहे."




नाना म्हणाले "बरं बरं! तूं शहाणी आणि तुझी मैना शहाणी. बाकी आम्ही सारीजणं वेडीं!"

"मग शंका आहे कीं काय?"

त्या दोघांचा हा संवाद मैनाला फार आवडला. तारा मावशी नेहमीं तिला शहाणी म्हणे. नानांना वेडे म्हणे.

" आमच्याकडे येणार ना तूं ? " तारामावशीनं तिला विचारलं, आणि तिचा मुका घेतला. मैना चटकन् हो म्हणाली. सुतारमामांचं काम पहात उभं राहण्याची, सदूशीं खेळण्याची तिची इच्छा एकदम नाहींशी झाली. बाजाचा मात्र तिला पुरता विसर पडला नाहीं. समोरच्या ब्लॉकमधल्या मावशीच्या घरांत गेल्यावर तिनं तिला विचारलं " मला बाजा आणून देशील तूं ? "

हा बाजाचा प्रश्न एकदम कसा काय निघाला तें तरामावशीला नीटसं कळलं नाहीं. पण ती म्हणाली " हो. कसला बाजा ? "

" सदूचा आहे तसला. "

सदूचा बाजा तारामावशीनं पाहिलेला नव्हता. पण तरी ती म्हणाली " तसला ना ? घेऊं कीं. त्यांत काय मोठंसं ? "

" मी तुला वाजवायला शिकवीन हं मावशी. मला छान येतो वाजवायला. सदूनं शिकवलं आहे मला. " मग एकदम विषयांतर करून मैना म्हणाली, " श्रीखंडाची वडी हवी मला. मी घेऊं आपल्या हातानं हव्या तितक्या ? " असं विचारीत ती मावशीच्या कडेवरून उतरून कपाटाकडे जाऊं लागली. मावशीच्या सैपाकघरांत कुठें काय काय ठेवलेलं असतं तें तिला माहीत झालेलं होतं. तिनं उजव्या मुठीत मावल्या तेवढ्या वड्या काढल्या. डावी मूठही भरून घ्यायची तर डबा खालीं ठेवायला हवा हें लक्षांत आल्यावर डबा ठेवला. दोन्ही मुठी भरून घेतल्यावर मान वळवून मावशीकडे हंसत बघत तिनं विचारलं, "मी घेऊं ?" तारा मावशी घेही म्हणाली नाहीं, नको घेऊंही म्हणाली नाहीं. ती फक्त हंसली आणि म्हणाली " किती लबाड आहेस ग ! " 'लबाड' या शब्दांत संमति, प्रशंसा, कौतुक भरलेलं असतं ही गोष्ट तारा मावशीच्या तोंडून तो शब्द ऐकून ऐकून मैनाला माहीत झाली होती... आईच्यांत आणि तारा मावशीच्यांत फरक होता तो हाच... दोन्ही मुठी भरून घेतल्यानंतर तिनं विचारलं, " माझी चूल-बोळकीं ? " तारा

मावशीनं वांकून कॉटखालीं ठेवलेला एक टिनचा डबा पुढें ओढला. मैनाच्या स्वतःच्या घरीं तिची चूल-बोळकीं होतींच. पण मावशीकडे येऊन खेळत बसण्याची लहर तिला केव्हां येईल त्याचा नेम नसल्यामुळें तारानं चूल-बोळक्यांनीं भरलेला एक डबा आपल्या कॉटखालीं ठेवलेला होता. इकडली कांहीं भांडीं घरच्या डब्यांत आणि तिकडचीं कांहीं मावशीकडच्या डब्यांत अशा प्रकारें लोकसंख्येची अदलाबदल वारंवार होत असे, आणि मग केटली, तवा, पोळपाट अशी जी कोणती वस्तु जागेवर नसेल, व जागेवर नसल्यामुळेंच मैनाला तातडीनं हवी असे ती शोधण्यासाठीं जें माणूस जवळ असेल त्याची एकच धांदल मैना उडवून देई...

मैनानं डब्यांतलीं चूल बोळकीं काढलीं व त्यांकडे ती निरखून पाहूं लागली. डब्यांत जें सांपडत नसेल तेंच हवं म्हणण्याची ही पूर्व तयारी असावी हें तारानं ओळखलं. कोणतं भांडं नसल्याचं खुसपट काढून तें आणण्याचा हुकूम बाईसाहेब करतात त्याची ती वाटच पाहूं लागली. परंतु दोन मुठी भरून वड्या घेतल्यामुळें मैना जरा खुषींत असावी. तिनं खुसपट काढलं नाहीं. चूल, शेगडी, परात, ताट सगळ्या वस्तू तिनं मांडल्या आणि तिचा सैंपाक सुरूं झाला. वड्या होत्या त्या वड्या राहिल्या नाहींत. भात, भाजी, आमटी, पोळया, लाडू असे परोपरीचे पदार्थ त्या वड्यांच्या बारीक चुऱ्या पासून तयार होऊं लागले... तारा कॉटवर बसली व मैनाच्या बडबडीला हुंकार देत तिच्याकडे पहात राहिली...

चार महिन्यांपूर्वीं 'चंद्रनिवास'मधील ब्लॉक्स तयार झाले तेव्हां 'डी' नंबरच्या या बाजूंत अगदीं पहिलं बिऱ्हाड आलं तें ताराचं—म्हणजे तिच्या भावाचं. तिनं सामानसुमान लावलं. आणि घर सजविलं तेव्हां कॉंक्रीटच्या भिंतींचा, गिलाव्याचा, चुन्याचा आणि व्हार्निशचा दरवळ लोपलेला नव्हता. ताराच्या घरांत ती आणि तिचा थोरला भाऊ एवढीं दोनच माणसं होतीं. खरं म्हणजे पांच खोल्यांच्या ब्लॉकची त्यांना गरज नव्हती. तिनं तसं म्हटलंही होतं. परंतु तो तिला म्हणाला होता, "भाड्याच्या खोल्यांत राह्यचा

कंटाळा आला आहे. स्वतःच्या मालकीचं आपलं घर असावं. चार पैसे जवळ सांचलेले आहेत तोंवर घेऊन टाकावं. 'आबासाहेब फाटक घरांत आहेत कां' असं दारावरची घंटा वाजवून विचारणाऱ्याला होय, आपल्या मालकीच्या घरांत आहेत, अशा ऐटीनं 'आहेत' म्हणून सांगतां आलं पाहिजे. मोठी माणसं माझ्याकडे येतात त्यांना घडीच्या खुर्चीच्या फळकुटावर बसायला सांगून कंटाळलों आहे मी. मोठा ब्लॉक घेतला कीं बसण्या उठण्यासाठीं स्वतंत्र खोली सजवितां येईल, चांगल्यापैकीं सोफा सेट मांडता येईल. दारा-खिडक्यांन उत्तम पडदे लावयाची हौस भागवितां येईल..." त्याच्या बोलण्यांत तथ्य होतं. एका सिनेमा कंपनीच्या जाहिरातखात्यांत मुख्य जागवर तो होता. मालकांची त्याच्यावर मर्जी होती. त्याला पगार चांगला होता. शिवाय सिनेमाच्या क्षेत्रांतल्या मंडळींत तो फार लोकप्रिय होता. आबासाहेब फाटक घरांत आहेत कां म्हणून दिवसाकाठीं किती तरी लोक त्याच्याकडे येत असत चांगल्या मोठ्या सजविलेल्या स्वतःच्या मालकीच्या जागेंत राहण्याची त्याची इच्छा योग्यच होती. 'चंद्रनिवास'मधल्या ब्लॉकमध्यें आल्यावर त्यानं ताराला विचारलं, "कशी काय आहे जागा? पसंत पडली कीं नाहीं तुला?" ती हंसून म्हणाली, "अगदीं मनपसंत आहे." "आतां साऱ्या खोल्या सजवायचं काम तुझं. हे पैसे संभाळ" असं म्हणून त्यानं शंभरा शंभराच्या पांच नोटा तिच्या हातावर ठेवल्या.

'ए. एम्. फाटक' अशा झोकदार अक्षरांची नवी पाटी रंगवून आणून ती बाहेरच्या दारापाशीं लावतांना तारानं समोरच्या ब्लॉककडे पाहिलं. तिथें अजून कुणी राह्यला आलं नव्हतं. कोण येणार होतं कुणास ठाऊक! परंतु नंतर वीस दिवसांनीं त्या ब्लॉकमध्यें सामान येऊं लागलं. तीन चार दिवसांनीं माणसंही राह्यला आलीं. मुंबईतल्या लोकांची तऱ्हा अशी असते कीं भिंतीपलीकडे रहाणाऱ्या शेजाऱ्याचीदेखील चौकशी करायची नाहीं. आपली खोली बरी कीं आपण बरे हाच खरा शेजारधर्म. समोरच्या ब्लॉकमध्यें माणसं राह्यला आलीं म्हटल्यावर कोण काय म्हणून चौकशी न करण्याची, उगाच डोकावून

न पाहण्याची, व आपल्या ब्लॉकचं दार कधीं उघडं न टाकण्याची खबरदारी तारा घेऊं लागली. पण एके दिवशीं भाजीवाला आला म्हणून तिनं दार उघडलं तोंच समोरच्या भिंतीवर तिला नांवाची पाटी दिसली. ' डॉ. एन्. व्ही. सुलाखे !' अस्सं ! एकूण समोरच्या ब्लॉकमध्यें एक डॉक्टर आले होते तर ! तितक्यांत सूट बूट व साहेबी टोपी घातलेला, मजबूत बांध्याचा, सुमारें बेचाळीस वर्षांचा, उजळ वर्णाचा एक गृहस्थ दार उघडून बाहेर आला. समोरच्या घरात कुणी स्त्री उभी आहे असं पाहिल्याबरोबर त्यानं नजर वळविली. स्त्रीसुलभ लज्जेमुळें उजव्या वक्षस्थलावरून पदर सरकविल्यासारखं करून तारा पाऊल मागं घेऊन दाराआड झाली. परंतु तरी त्या पुरुषाची आणि तिची क्षणार्धच कां होईना दृष्टिभेट झालीच. त्याच्या कोटाच्या खिशांतला स्टेथॉस्कोप तिला दिसला. अस्सं ! डॉक्टर सुलाखे ते हेच वाटतं !...

डॉक्टरांनीं आपल्या ब्लॉकचं दार ओढून घेतलं व जिन्याच्या पायऱ्या उतरण्यासाठीं ते पुढें झाले.

पण तितक्यांत " नाना ! नाना ! मी येणार " अशी कोंवळ्या आवाजांतली आरोळी आंतून ऐकूं आली. दुसऱ्याच क्षणीं दार उघडलं गेलं. दारांत सुमारें पांच वर्षांची मुलगी दिसली. ती संपूर्णतः नग्न होती. तिच्या गोऱ्या पान बाळसेदार अंगाची शोभा वाढविणारे काळ्याभोर केसांचे घुंगुरवाळे अस्ताव्यस्त होते. स्वारी बहुधा न्हाणी घरांतून बाहेर धांवत आली असावी. " नाना ! नाना ! मी येणार " ती म्हणाली.

डॉक्टर पहिल्या पायरीपाशीं थबकून वळून म्हणाले, "मैनाताई, मी दवाखान्यांत निघालों आहे."

दवाखान्यांत निघालों ही काय सबब झाली ! मैनाला ती मुळींच पटली नाहीं. तिनं आपल्या मागणीचा पुनरुच्चार केला " मला न्या !", आणि न नेल्यास काय परिणाम होईल त्याची चुणुक दाखविण्यासाठीं रडण्याच्या सप्तकांतले पहिले दोन स्वर काढले.

डॉक्टर रागानं म्हणाले, " अग न्या काय ? वेडी कीं काय तूं ? अन् आधीं आंत जा पाहूं ! असं कपडे न घालतां दारांत येतं कां कुणी ? "

हा शेवटचा मुद्दा विचारांत घेण्याची मैनाची मुळींच इच्छा नव्हती. तिनं सप्तकांतले पुढचे स्वर काढले.

" तूं अशीच हट्टी आहेस ! रड खुशाल " असं म्हणून डॉक्टर पायऱ्या उतरूं लागले. " मी येणार नाना ! " मैनानं किंकाळी फोडली. आंतून हातांत तपेली घेतलेली एक मोलकरीण " हां हां मैनाताई, न्हाणी घरांत चला. " असं ओरडत आली. तिच्या मागोमाग " मैने, रडायचं नाहीं. तोंड मिट पाहूं. " असं म्हणत उंची इरकली लुगडं नेसलेली एक बाई अंगांत ब्लाउझ घालीत घालीत आली. ती मैनाची आई असावी. आतां मैनानं भोकाडच वासलं. मोलकरीण तिला ओढूं लागली. तेव्हां तिनं तिला एक छानपैकीं चापटी ठेवून दिली आणि " सारजिटली खापिटली " असा आहेर केला. मैनाची आई मोलकरणीला म्हणाली " तूं दूर हो " आणि मैनाचा दंड धरून ओढून तिला दरडावलं " चलतेस कीं नाहीं आंघोळीला ?" दार धाडदिशीं बंद झालं. " मी नानांबरोबर जाणार ! " अशा मैनाच्या आरोळ्या न्हाणी घरांतून ऐकूं आल्या.

अशा प्रकारें डॉक्टरांच्या सबंध कुटुंबाचं पहिलं दर्शन ताराला घडलं !

तिनं भाजी घेतली आणि दार लोटून बंद केलं.

रविवारीं मैनाची शाळा नव्हती. या नव्या बिऱ्हाडांत आल्यापासून तिला अजून कुणी मैत्रिणी मिळाल्या नव्हत्या. तिच्या बालविकास मंदिरांत अमृत आणि नंदा नांवाचे दोन मुलगे होते त्यांच्याशीं तिची थोडीशी गट्टी जमली होती. पण त्या दोघांचीं बिऱ्हाडं समोरच्या ' ए ' नंबराच्या बगलेंत होतीं. त्यांच्याकडे जायचं म्हणजे चार जिने उतरून जायला हवं होतं. आणि " जिन्याकडे जायचं नाहीं हं " म्हणून आईनं हुकूम सोडला

होता व त्याची अंमलबजावणी करण्यासाठीं सारजा सारखी पाळतीवर होती...

दार उघडं आहे अशी संधि पाहून मैना बाहेर आली. समोरच्या ब्लॉकचं नेहमीं बंद असणारं दार अर्धं उघडं असलेलं तिला दिसलं. या घरांत कुणी खेळगडी मिळतो कां बघूं या असा विचार तिच्या मनांत आला. दाराची फळी पुरती लोटून तिनं आंत पाऊल टाकलं. इकडे तिकडे कुणी दिसतं कां म्हणून बघत ती उभी राहिली.

ज्या खोलींत ती उभी होती तिथें कुणी नव्हतं. समोरच्या किंवा डावीकडच्या दालनांतही कुणाची चाहूल नव्हती. हाक मारावी असं तिच्या मनांत आलं. पण त्या घरांतल्या कुणाच माणसाचं नांव तिला माहीत नव्हतं. मोठ्या पंचायतींत पडली ती. परत फिरण्याचा विचार तिच्या मनांत आला. पण तितक्यांत वाऱ्याची मोठी झुळुक आली, तिच्या डाव्या हाताकडच्या दारावरचा झुलता निळा पडदा फुगून वर झाला, व एक गृहस्थ पोषाख करीत आरशापुढें उभे राहिलेले तिला दिसले. ती हळूच पावलं टाकून त्या खोलींत गेली तेव्हां त्या गृहस्थांबरोबर बोलत उभी राहिलेली एक बाई तिला दिसली. त्या दोघांचींही नांवं तिला माहीत नव्हतीं. म्हणून तिनं नुसत्याच हाका मारल्या, "अहो! अहो!—" आणि मग पुढें काय बोलावं तें न सुचल्यामुळें गोंधळून जाऊन तिनं हातांतल्या बाहुलीचा पाय तोंडांत घातला.

तारानं तिला ताबडतोब ओळखलं व ती हंसून तिला म्हणाली, "ओहो! या!" पोषाख करीत असलेल्या आबासाहेबांना तिनं सांगितलं "समोरच्या डाक्टरांची ही मुलगी", आणि पुढें होऊन मैनाला उचलून व तिचा मुका घेऊन तिनं विचारलं, "खेळायला आलीस होय?"

मैनानं मान हालवून विचारलं, "तुमच्या घरांत मुलं आहेत कां?"

"अंहं."

"मग मी कुणाशीं खेळूं?"

" माझ्याशीं खेळ कीं. "

" तुला खेळायला येतं ? " मैनाच्या प्रश्नांत संपूर्ण अविश्वास होता.

" हो. "

" तुझी बाहुली आहे ? पाळणा आहे ? बाबागाडी आहे ? चूल-बोळकीं आहेत ? " विद्यार्थ्याला नापास करण्याच्या हेतूनं अवघड प्रश्न निवडून विचारणाऱ्या त्रासदायक परीक्षकाच्या अविर्भावानं मैनानं प्रश्न केले.

त्या प्रश्नांना नकार दिला तर चांगलं हातीं आलेलं सावज पळून जाईल हें ताराला ओळखतां येत होतं. म्हणून तिनं निराळाच विषय काढला आणि म्हटलं " आम्ही तुला खाऊ देणार आहोंत. तुला हवा ना ? "

" चॉकोलेट आहे तुझ्याजवळ ? "

" चॉकोलेटपेक्षां चांगला खाऊ आहे. "

" दे. "

नेकटायची गाठ गळ्याखालीं नीट बसवितांना आरशांत पाहतां पाहतां आबासाहेब म्हणाले " मोठं वस्ताद दिसतं आहे काम हं. " नंतर वळून त्यांनीं मैनाला विचारलं " सिनेमांत काम करणार कां तुम्ही ? "

परंतु त्या 'ऑफर'चा विचार करण्यापेक्षां खाऊ पदरांत पाडून घेण्याची मैनाला अधिक उत्कंठा होती. आबासाहेबांकडे सर्वस्वी दुर्लक्ष करून ती ताराला म्हणाली " खाऊ दे ना मला. "

" जातों ग " असं बहिणीला सांगून आबासाहेब बाहेर पडले. तारानं मैनाला सैपाकघरांत नेऊन कपाट उघडीत विचारलं, "काय पाहिजे तुला ?" मैना कपाटांतल्या साऱ्या खणांतल्या वस्तू निरखून पाहूं लागली. तारानं कोणताही डबा उघडला तरी त्यांतला खाऊ तिला पसंत पडेना. शेवटीं एका छोट्या डब्यांतली श्रीखंडाची वडी तिच्या पसंतीस उतरली.

ती खातां खातां ताराच्या कॉटवर बसून तिची बडबड सुरूं

झाली. वडी संपल्यानतर मघाशीं नापसंत केलेल्या सगळया खाऊंची तिला आठवण झाली. आतां तिला ते पसंत होते, व अगदीं संकोच न करतां तिनं ते मागून घेतले. आपल्या घरांतल्या गोष्टी ती ताराला सांगूं लागली. त्या सांगतांना ती पुन्हां पुन्हां "अहो, अहो!" असं म्हणत होती. म्हणून शेवटीं तारा तिला म्हणाली, "मला अहो अहो नाहीं म्हणायचं हं. मावशी म्हणायचं."

"पण कोण मावशी? आमची एक सुधा मावशी आहे. तशी होय तूं?"

"हं तशीच. पण तारा मावशी."

"तारा मावशी?" असं म्हणून मैना खुदकन हंसली. मग तिच्या मनांत काय आलं कुणास ठाऊक, तिनं विचारलं, "मावशी आहेस तर मग तुझा नवरा कुठें आहे? आमच्या सुधा मावशीला आहे. तुला आहे कां?"

ताराचं वैधव्याचं दुःख जुनं झालं होतं त्यामुळें त्या प्रश्नाचं तिला वाईट वाटलं नाहीं. उलट ती चेष्टेनें म्हणाली, "हो, आहे कीं."

माणसांची मनाला येतील तशी नातीं जोडण्यांत मैना पटाईत होती. तिनं विचारलं, "मघाशीं बाहेर गेला तो तुझा नवरा होय?"

"शाबास ग! ते माझे भाऊ."

"मग भाऊ नवरा नसतो होय?"

कोणत्या नात्यांनीं कोणतीं नातीं अशक्य होतात तें मैनाला समजून सांगणं फारच कठीण होतं हें ओळखून तारा म्हणाली, "त्यांना आम्ही आबासाहेब म्हणतों. तुला मोठं लोकरींचं अस्वल घेऊन यायला सांगणार आहे मीं त्यांना. चकाकणाऱ्या डोळयांचं. काळं भोर. किल्ली दिली कीं उड्या मारणारं."

"किती मोठी उडी मारील तें? एवढी?" मैनानं दोन्ही हात शक्य तितके दूर पसरून उंच धरले.

तारानं सांगितलं "त्यापेक्षां मोठी."

"मग कुठें आहे अस्वल? दे मला."

"अग आत्तां नाहीं माझ्याजवळ. आबा आणतील, मग मी

तुला देईन."

रोखीचं रूपांतर उधारींत झालेलं पाहून मैनाच्या दृष्टीनं अस्वलाची अर्धी मजा नाहींशी झाली. तिनं चेहरा हिरमुसला केला. तिला पुन्हां खुषींत आणण्यासाठी काय करावं याचा विचार तारा करीत होती तोंच पुढचं दार ढकलल्याचा आणि पावलांचा आवाज झाला.

"आमची मैना आली आहे कां इकडे?"

तारानं वळून पाहिलं तों मैनाचे वडील खोलींत डोकावून विचारीत होते.

"आहे" अशीं दोनच अक्षरंसुद्धां ताराच्या तोंडून धड बाहेर पडलीं नाहींत. डॉक्टर अकस्मात् येऊन इतके जवळ उभे राहिलेले पाहतांच ती अगदीं गोंधळून गेली. कॉटवरून उतरून तिनं पदर सावरला, व डॉक्टरांच्या नजरेला अर्धवट नजर देत व अर्धवट त्यांची नजर चुकवीत ती उभी राहिली. या म्हणावं कीं बसा म्हणावं कीं काय बोलावं तें तिला अगदीं सुचेना.

पण तितक्यांत डॉक्टरच कॉटकडे पाहून म्हणाले, "आहेत कीं बाईसाहेब इथें."

तें ऐकतांच ताराला खूप हंसूं आलं. तोंडाला पदर लावून तिनं एकदां डॉक्टरांकडे व एकदां मैनाकडे बघितलं.

डॉक्टर मैनाकडे बघत म्हणाले "खाऊ खाणं चाललं आहे वाटतं तुमचं मैनाताई?"

"आतां कुठें खातें आहे हो नाना? मघाशींच संपविला!" बापाच्या बोलण्यांतली वर्तमानकाळाची चूक मैनानं पदरांत घातली.

डॉक्टर आणि तारा दोघांनाही तें ऐकून हंसूं आलं. हंसतांना दोघांनाही एकमेकांकडे सरळ मोकळेपणानं पाहतां आलं. डॉक्टर ताराला म्हणाले "हिला कशाला घरांत घेतलीत तुम्ही? एक नंबरची आगंतुक आहे. आतां रोज येते कीं नाहीं बघा तुमच्याकडे त्रास द्यायला."

"त्रास कसला त्यांत? फार शहाणी आहे" तारा म्हणाली.

"हं चला बाईसाहेब घरीं" असं म्हणून नानांनीं मैनाला

उचललं आणि तिचा मुका घेतला. तिचा मुका घेतल्यावर ते नेहमीं तिला विचारीत "कमल्या वासाचा मुका आहे?" आणि जें कांहीं नुकतच खाल्लं असेल त्याच्या वासाचा म्हणून मैना उत्तर देत असे. त्याप्रमाणें आतांही नानांनी विचारलं "कसला वास येतो आहे रे चोरा?"

"श्रीखंडाचा" मैनानं उत्तर दिलं, आणि विचारलं, "तुम्हांला हवी वडी नाना? तारामावशीजवळ छान आहे."

डॉक्टर हंसून म्हणाले "नको. आम्हांला नाहीं आवडत,"

"अं...घ्या कीं वडी तुम्ही!" मैनानं आग्रह केला. "तुमच्यांतली मला द्या हं थोडी!" आग्रहामागचा हेतूही लगेच तिनं बोलून दाखविला.

"नको ग. मला खरंच आवडत नाहीं."

"घ्या ना" मैनानं रडका स्वर काढला.

डॉक्टर मोठमोठ्यांदा हंसले, आणि मैनापेक्षां ताराकडे अधिक पहात म्हणाले, "आपण आगंतुक ती आगंतुक आणि दुसऱ्याचाहि वशिला लावते पहा."

"पण ती एवढी म्हणते तर तिचं ऐकायला कांहीं हरकत नाहीं" असं म्हणून तारानं झटकनं वळून श्रीखंडाच्या चार पांच वड्या एका बशींत काढल्या, बशी जेवणाच्या टेबलावर ठेवली, आणि खुर्ची सरकवून डॉक्टराना बसायची खूण केली. तिनं झटकन् एक सुंदर पेला काढून पाण्यानं भरून टेबलावर ठेवला.

या गोष्टीला आतां कित्येक महिने झाले होते.

पण आज डॉक्टरांच्या हातून घेऊन तिनं मैनाला आपल्या खोलींत आणलं, खाऊ दिला, व खोटा सैंपाक करतां करतां चालणाऱ्या तिच्या बडबडीला मधून मधून हुंकार देत कॉटवर बसून तारा तिच्याकडे पहात राहिली तेव्हां तिला तो प्रसंग आठवला. भाजी घ्यावयासाठीं म्हणून ती दारांत आली व त्याच वेळीं आपल्या ब्लॉकमधून बाहेर पडलेल्या डॉक्टरांची दृष्टादृष्ट झाली तो प्रसंग, आणि मैनाला शोधीत डॉक्टर प्रथम तिच्या घरांत आले व

श्रीखंडाच्या वड्या खाऊन पाणी प्याल्यावर ग्लास खालीं ठेवतां ठेवतां हंसून म्हणाले, " अशा खाण्याच्या आशेनं मैनेलाच काय, मलादेखील यावंसं वाटेल " तो प्रसंग ताराच्या आठवणींत अगदीं पक्का कोरला गेला होता...त्यानंतर डॉक्टरांची आणि आबासाहेबांची ओळख झाली होती. सहज गप्पा ठोकायला आणि सिगरेट ओढायला म्हणून आबासाहेब जसे त्यांच्याकडे जात तसेच तेही कधीं मधीं आबासाहेबांकडे येऊन बसत. पण त्यांचं पहिलं येणं ताराला विशेष आठवे... " अशा खाण्याच्या आशेनं मलादेखील यावंसं वाटेल " असं ते म्हणाले तेव्हां ती चटकन म्हणाली होती, " मग बरंच होईल कीं. " ते तिच्याकडे पाहून हंसले होते...त्याची आठवण ताराच्या मनांत आत्तांदेखील एखाद्या ताज्या आठवणीसारखी आली...

सैंपाकांत तयार झालेले सारे पदार्थ खाऊन सरले तेव्हां मैनाताई जांभया देऊं लागल्या, थोड्या वेळानं कॉटवर चढल्या, आणि तारानं थोडा वेळ पाठ थोपटल्यावर निजल्यादेखील. मात्र निजण्यापूर्वीं तिनं मधेंच डोळे उघडून ताराला विचारलं, " मला बाजा आणणार आहेस ना तूं ! "

तारा म्हणाली, " तूं निजून उठलीस कीं मग आपण दुकानांत जाऊं आणखी घेऊन येऊं बाजा."

डोळे मिटतां मिटतां मैनानं म्हटलं, " सदूचा आहे तसला हं."

" त्याच्याहून चांगला."

मग मैनाला झोप लागली. तारा कॉटवरून उठली आणि आपलं शिवणकाम काढून बसली.

सुमारे एक तासानं सारजा मैनाला घेऊन जायसाठीं आली. डॉक्टरांच्या घरांत चहाची वेळ झाली होती. महिलामंडळांतून परत आलेल्या डॉक्टरीणबाईनीं चहा बनविला होता, व मैनाला आणण्यासाठीं सारजाला धाडली होती.

तारा तिला म्हणाली " निजली आहे तर राहूं दे ग. उठल्यावर आणून पोचवीन तिला मी."

सारजा म्हणाली " नको नको. मैनाताईला न घेतां मी परत गेलें तर अनुताई रागाला येतील." चंद्रनिवासमधलीं सारीं माणसं डॉक्टरांच्या बायकोला अनुताई या नावानंच ओळखीत असत. " मला त्या रागानंच म्हणाल्या तिकडे असतील फाटकांच्या घरीं बाईसाहेब. उठल्या सुटल्या त्यांच्या घरीं जाणं मला नाहीं आवडत."

सुईचा टाका घालतां घालतां तारा म्हणाली " हं ! "

अनुताईचा कुणावर आणि कशाबद्दल राग आहे तें ताराला चांगलं माहीत होतं; आणि असला राग धरून वाकडं वागणारी बाई मूर्खच म्हटली पाहिजे असं तिनं मनाशीं ठरविलं होतं. तुझा राग तर माझाही राग असं अनुताईशीं वागावं असं तिच्या मनांत कधीं कधीं येत असे. परंतु ती विचार करी, जाऊं दे. अनुताई कुजकं नासकं बोलतात एवढंच ना ! मैनाचं आपल्याकडे येणं तर त्या बंद करीत नाहींत ना ? आपण उघड वाकडं वागूं लागलों तर एखादे वेळेस ही मूर्ख बाई मैनाला बंदी मात्र करायची !

म्हणून आत्तां सारजाचं बोलणं ऐकून तिनं फक्त " हं ! " असा उद्‌गार काढला, आणि सुई दातांत धरली...

" उठा उठा मैनाताई. चहाला चला," असं म्हणून सारजानं मैनाला हालविलं. मैनानं डोळे उघडले. परंतु सारजाला पाहिल्यावर ती लाथा झाडून " अं " करूं लागली. " चला, चला अनुताई रागाला आल्या आहेत " अशी बातमी सांगून सारजानं मैनाच्या खांद्याखालीं हात घालून तिला उचलल्यासारखं केलं, तेव्हां मैना रडत म्हणाली " मला नाहीं चहा प्यायचा. मी नाहीं येणार." तारानं बसल्या जागेवरून तिचं मन वळविलं, "मैनाताई, जा बाळा जा. चहा पिऊन इकडे ये. मग आपण बाजा आणायला बाजारांत जाऊं जा." " चला " असं म्हणून सारजा तिला उचलूं लागली तेव्हां ती ओरडली "मी सारजाबरोबर नाहीं जाणार. मावशी तूं पोचव मला." अंथरुणावर बसून तिनं आपले दोन्ही हात उंच केले.

ताराला पेंच पडला. मैनाला घेऊन ती डॉक्टरांच्या सैंपाकघरांत गेली तर डॉक्टर साहजिकच तिला म्हणणार होते " चहा घेऊन

जा." अनुताई उघडपणें वाकडं तोंड करणार नव्हत्या, परंतु मनांतून त्यांना ती गोष्ट आवडणार नव्हती. डॉक्टर आणि त्यांची बायको जिथें एकत्र असतील तिथें जाण्याचंच तारा टाळूं लागली होती. डॉक्टर तिच्याशीं फार चांगलं वागत. तिच्याविषयीं आदर दाखवीत. अगदीं आपलेपणानं तिच्याशीं बोलत. एखादी कोटी करून हंसवीत. त्यांनीं अशी कोटी केली कीं मोकळेपणानं हंसण्याऐवजी अनुताईचा चेहरा नाराजीनं आक्रसून जात असे, भुंवयांच्या मधोमध अढीसुद्धां दिसूं लागे, हातांतल्या भांड्यांची आदळआपट त्या करीत असल्याचा संशय येई...या गोष्टी डॉक्टरांच्या लक्षांत आल्यावाचून कशा राहतील ? त्यांनीं बायकोला आपली नापसंति स्पष्ट सांगावी, असं ताराच्या मनांत येई. परंतु डॉक्टर तसं करीत नसत. ताराला त्याचं आश्चर्य वाटे. तिच्या मनांत येई, हे नवरे बायकांपुढें अशी पड कां खातात ? तिला वाटे, डॉक्टरांच्यावर चांगलं रागवावं आणि त्यांच्याशीं बोलणंच सोडून द्यावं. परंतु असं करण्यासाठीं निस्पृहपणा लागतो. तिच्या मनांत डॉक्टरविषयीं ज्या मृदु भावना निर्माण झाल्या होत्या त्यांनीं तो दुबळा करून टाकला होता. शिवाय बायकोच्या चरफडण्याकडे संपूर्ण दुर्लक्ष डॉक्टर करीत याचाही एक प्रकारचा आनंद तिला वाटे, आणि डॉक्टर एखादी अशी कोटि करीत कीं ताराला साऱ्या गोष्टींचा विसर पडे आणि ती मनापासून हंसे... तथापि एकंदरींत अनुताईसमोर जाणं तिला नको असे, व ती गोष्ट ती टाळीत असे. त्यामुळें मैनाला पोचविण्याची तिची इच्छा नव्हती. परंतु मैना तर हात वर करून तिच्याकडे आशेनं बघत होती. सारजाबरोबर ती मुळींच जाणार नाहीं हें उघड होतं...

तिनं आपलं शिवणकाम बाजूला ठेवलं, व मैनाला उचलून घेतलं. डॉक्टरांच्या ब्लॉकमध्यें जाऊन तिनं सैंपाकघराच्या अलीकडच्या बोळांतच तिला खालीं ठेवलं, व डोळ्यानं खूण केली, "जा हं."

मैना आंत धांवत गेली. अनुताई ओरडल्या, "आलांत कां बाईसाहेब ! सुटली कां मावशी ?" आईच्या बोलण्याकडे लक्ष न देतां मैना डॉक्टरांना म्हणाली,-"नाना, अहो नाना ! आमची एक

जम्मत ओळखा."

"आम्ही हरलों बाबा. तुम्हीच सांगा."

"चहा झाल्यावर मी दुकानांत जाणार आहे."

"एकटीच ?"

"नाहीं नाहीं. मावशीबरोबर! ती मला बाजा घेऊन देणार आहे. सदूचा आहे ना? तसला. त्याच्याहून चांगला. त्याच्याहून चांगला असतो कां हो नाना?"

"हो हो. असतो तर."

मधेंच अनुताई मैनाला म्हणाल्या, "तो चहा पुढें ठेवला आहे तो दिसतो आहे कां बाईसाहेब? तो घ्या आधीं. मग चालूं द्यात गप्पा. कांहीं नाहीं जायचं मावशीबरोबर बाजा आणायला. मावशीला म्हणावं आम्हांला कांहीं भीक नाहीं लागली. बाजापुरते पैसे आहेत आमच्याजवळ."

मैना रडका स्वर काढून म्हणाली, "अं... मी जाणार मावशीबरोबर."

"जा तर खरी तूं, चांगली बडवतें कीं नाहीं बघ. उठल्या सुटल्या काय आहे मावशीकडे? भिकारी मेली!"

बाहेर बोळकंडीत उभ्या राहिलेल्या ताराला तें सारं ऐकून फार वाईट वाटलं. अनुताईनीं आपला एवढा दुस्वास करावा म्हणजे किती विचित्र अन्याय म्हणायचा असं तिच्या मनांत आलं. तिला वाटलं, पुढें जावं, डॉक्टरीणबाईपुढें उभं राहवं, आणि फडाफडा बोलून समजुतीच्या चार गोष्टी तिला सांगाव्या. तिला डॉक्टरांचा-देखील राग आला. हे बायकोला बोलत कां नाहींत?... बोलत कां नाहींत?...तितक्यांत आंत डॉक्टर अनुताईना म्हणाले, "तूं असं बोलतेस, तुला कांहीं वाटत नाहीं? बोलून चालून लहान मूल हें. एखाद्या माणसाचा लळा लागला तर त्यांत एवढं धुसफुसायला काय झालं?"

अनुताई म्हणाल्या "तुम्ही मलाच मूर्ख ठरविणार हो, माहीत आहे मला...नको ग बाई हा बायकांचा जन्म!" त्यांचा आवाज

एकदम रडका झाला.

नेहमींचा नरमपणा सोडून डॉक्टर बायकोला बोलले हें पाहून ताराला बरं वाटलं. आणि अनुताईंचा स्त्रीजन्माविषयींचा सामान्य सिद्धांत आणि रडवा आवाज ऐकून तिला हंसूंच आलं... ती झटकन् डॉक्टरांच्या ब्लॉकमधून बाहेर पडली व आपल्या घरांत येऊन कॉटवर बसली तरीदेखील "नको ग बाई हा बायकांचा जन्म" हे अनुताईंचे रडव्या आवाजांतले शब्द तिला आठवत होते व तिला हंसूं येत होतं... तिच्या मनांत येत होतं, जन्म नकोसा व्हायला या बाईला काय झालं? चांगला देखणा कर्तबगार नवरा मिळाला आहे. श्रीमंति आहे, कपडेलत्ते दागदागिने आहेत, पुण्याच्या कॉलेजांत शिकणारी एक मोठी सतरा वर्षांची मुलगी आहे, सोन्यासारखी धाकटी मैना आहे! आणखी काय पाहिजे या बाईला? हिला जन्म नकोसा व्हावा असं काय घडलंय काय?...

मात्र "काय घडलंय काय?" हा प्रश्न ताराच्या मनांत जसा आला त्याचप्रमाणे त्या प्रश्नाचं एक संभवनीय उत्तरदेखील तिच्या मनांत आल्यावाचून राहिलं नाहीं...

अनुताईंचा संसार सुखानं अगदीं भरलेला होता खरा. परंतु आपल्या सुखावर एक नवीनच संकट आल्यासारखं त्यांना वाटत असलं तर? आपल्या नवऱ्याचं प्रेम कुणावर तरी बसायला लागलेलं आहे अशी शंका त्यांना आली असली तर? ...

हा विचार मनांत आल्याबरोबर तारा किंचित् चमकली...

पण ती लगेच मनाशीं म्हणाली, डॉक्टरांचं माझ्यावर प्रेम बसलं आहे?... शीः! अशी शंका कोण घेत असेल तें घेवो!... डॉक्टर तिच्याशीं ज्या रीतीनं वागत आणि बोलत त्या रीतीची छाननी तिनं एकांतांत विचार करतांना अनेक वेळां केली होती. त्यांचं तें वागणं आणि बोलणं प्रेमांत सापडलेल्या माणसाचं होतं अशी तिला खात्री वाटत नव्हती...

आणि खात्री वाटत नव्हती हेंच तिच्या मनांत अलीकडे उत्पन्न झालेलं तिचं गुप्त दुःख होतं...

## : : २ : :

चंद्रनिवासांतल्या जागेंत डॉक्टर राह्यला आल्यानंतर पुण्याच्या कॉलेजांत शिकणारी त्यांची सतरा वर्षांची थोरली मुलगी अचला रहिल्यांदाच घरीं आली होती. नव्या जागेचं वर्णन डॉक्टरांच्या पत्रांतून तिला आधींच कळलं होतं. परंतु पत्रांतलं वर्णन वाचणं निराळं, आणि जागा प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहणं निराळं. यामुळें घरीं येऊन पोचल्याबरोबर तिनं घाईघाईनं सूटकेस उघडली, " मला काय आणलंस ? " म्हणून तिची साडी ओढून नाचणाऱ्या मैनाच्या हातांत मोटर आणि टॉफीचा डबा दिला, व ती म्हणाली, "आतां आपली जागा दाखवा बाई मला कुणी तरी. केव्हां पाहीनसं झालं आहे. " सारजा शेजारी उभी होती ती तिला म्हणाली " मी दाखवतें साऱ्या खोल्या. आधीं न्हाणीघरांत चला म्हणजे चूळ भरून तोंडही धुतां येईल. या. " अचलेनं एक टॉवेल काढून सूटकेस बंद केली, आणि सारजाला म्हटलं. " चल. दाखव पाहूं न्हाणीघर. "

पण तें ऐकल्याबरोबर मैना म्हणाली " ए सारजा, तूं नको ग. आक्काला मी दाखवणार सगळ्या खोल्या. " हातांतला डबा आणि मोटर तिनं खालीं ठेवली आणि अचलेला ओढीत ती म्हणाली, " चल दाखवतें. मला माहीत आहे आपलं न्हाणीघर. चल. संडाससुद्धां माहीत आहे मला. " बहिणीला ओढीत नेतां नेतां ती पुढें सांगूं लागली, " आतां मी कांहीं बाहेर बसत नाहीं. संडासांत बसतें. खोटं नाहीं. विचार आईला. संडासांतल्या साखळीला माझा हात पोचत नाहीं. साखळी ओढायसाठीं मला उचलून घे म्हटलं तर सारजिटली घेत नाहीं. तूं घेतेस उचलून ?

आपण एकदां साखळी ओढूं, मग मी तुला न्हाणीघर दाखवीन हं." बोलतां बोलतां तिनं अचलेला संडासापर्यंत नेलंसुद्धां होतं. तिथें थबकून ती म्हणाली "उघड दार, उघड. आंत बुवा नसतो." अचलेनं दार उघडलं तेव्हां आंत पाऊल टाकून ती म्हणाली, "कुठें आहे बुवा? आहे? मी लहान होतें तेव्हां उगीच भीत होतें. आतां नाहीं भीत. आतां मला साखळी ओढूं दे." दोन्ही हात उंच करून ती अचलेकडे पाहूं लागली.

नंतर घर दाखवितांना "ही नानांची खोली, ही आईची खोली..." अशी तिची कामेंटरी चालली होती. अचलेनं तिला चेष्टेनं विचारलं, तुझी खोली कोणती? हा प्रश्न मैनाच्या मनांत कधींच आला नव्हता. त्यामुळें तिला चटकन् उत्तर सुचलं नाहीं. ड्रेसिंग टेबलाचा खण उघडून कांहीं तरी काढण्यांत गुंतलेल्या अनुताईंना तिनं विचारलं, "आई, माझी खोली कोणती?"

अनुताई खुषींत आणि लहरींत असल्या म्हणजे मैनाशीं मोठ्या प्रेमानं बोलत. खरं म्हणजे त्यांची ती फार लाडकी होती. अचलेच्या पाठीवर बारा वर्षांनीं झालेली म्हणून. आणि फार देखणी बोलकी, हुशार म्हणून. चंद्रनिवासांतल्या या जागेंत आल्यापासून तिच्यावर त्या रुसूं फुगूं लागल्या होत्या, व तिला कित्येकदां कठोरपणानं बोलूं लागल्या होत्या. समोरच्या फाटकांच्या घरांत ती उठल्या सुटल्या जात असे याबद्दलच केवळ त्या तिच्यावर जळफळल्या नसत्याही. पूर्वीं डॉक्टरांचं बिऱ्हाड जिथेंहोतं तिथेंसुद्धां मैना सदा शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या घरांत हिंडत असे. तारामावशीचा लळा आपल्या मैनाला लागावा हें अनुताईंना बिलकुल आवडत नसे त्याचं कारण फार वेगळं होतं. त्या कारणाचा उघड उच्चार करतां येत नव्हता, उघड प्रतिकार करतां येत नव्हता, म्हणून त्या सारा राग मैनावर काढीत. परंतु जी नाजुक गोष्ट, त्यांना चरफडाट करायला लावी तिचा विषय त्यांच्या मनांत ज्या वेळीं नसेल त्या वेळीं त्या मोठ्या गोड असत. कॉलेजांत शिकणारी थोरली मुलगी पुण्याहून फार दिवसांनीं घरीं आली म्हणून आज अनुताईंना फार आनंद झाला

होता. त्यांच्या मनांतले वाईट किंतु तात्पुरते नाहींसे झाले होते. आपल्या संसाराच्या सुखाच्या खुषींत त्या होत्या...

मैनाचा प्रश्न ऐकतांच त्यांनीं उत्तर दिलं, "तुझी खोली कोणती ! बेटा, अक्काला म्हणावं सगळया खोल्या माझ्याच आहेत."

एकदम आश्चर्य वाटल्याप्रमाणें चर्या करून किंचित् अविश्वासानं मैनानं विचारलं, "सगळया खोल्या माझ्या ? एकटीच्या ?"

अनुताई झटकन् तिच्याजवळ आल्या व तिचा पापा घेऊन म्हणाल्या, "होय रे बाबा, तुझ्या एकटीच्या."

"आक्काला नाहीं खोली ?"

"छे ! तिला कोण देतं खोली ?"

"मग ती निजेल कुठें आतां रात्रीं ?" मैनानं विचारलं. परंतु तितक्यांत अचलेनं पुन्हां उघडलेल्या सूटकेसमध्यें तिचं फांटनपेन तिला दिसलं. तें उचलून घेऊन ती म्हणाली "मला आणलं आहेस, होय ना ?" तिनं पेनचं टोपण काढायलासुद्धां सुरुवात केली.

त्याबरोबर अचला ओरडली, "अग ए बया, मोडशील मोडशील." कॉलेजच्या वसतिगृहांत राहणारी ती सतरा वर्षांची मुलगी अल्पवयांत मॅट्रिक होण्याइतकी हुशार होती, इंग्रजी, इतिहास, भूगोल, गणित शिकली होती, बॅडमिंटन खेळण्यांत पटाईत होती, पण मैनासारख्या लहान मुलाशीं कसं वागावं तें बहुतांशीं घरावेगळं राहिल्यामुळें तिला माहीत नव्हतं. पुण्याची हवा चांगली, संस्कार चांगले म्हणून व मुलींच्या शाळेच्या मुख्याध्यापिका नात्यांतल्या होत्या म्हणून डॉक्टरांनीं अचलेच्या पांचव्या यत्तेपासून तिला त्या शाळेच्या वसतिगृहांत पुण्यास ठेवलं होतं. ती मॅट्रिक झाली तेव्हांही पुण्याच्याच एका कॉलेजांत त्यांच्या ओळखीचे प्रिन्सिपल आणि दोघे तिघे प्रोफेसर होते म्हणून त्यांच्या देखरेखीखालीं अचला राहिलेली चांगली या हिशोबानं त्यांनीं तिला त्या कॉलेजच्या

वसतिगृहांत ठेवलं होतं. पण त्यामुळें धाकट्या बहिणीविषयीं जो जिव्हाळा अचला घरीं राहिली असती तर तिला वाटला असता तो तिच्या मनांत उत्पन्न झाला नव्हता. आणि मैनासारख्या गोड पण हट्टी मुलीशीं कसं वागावं हें तर तिला मुळींच कळत नव्हतं. " आण ग बया तें पेन इकडे. दे ! " असं ओरडून तिनं मैनाची मूठ धरली...

" अं... मला हवं. मी नाहीं देणार ! " म्हणून मैना दूर धावण्यासाठी तिच्याशीं झोंबू लागली.

" देतेस कीं नाही ? " अचला ओरडली, व तिनं मैनाच्या गालावर चापटी ठेवून दिली.

आपल्या हातांतून फौंटनपेन एवी तेवी काढलं जाणारच अशी खात्री पटल्याबरोबर मैनानं तें दूर फेकून दिलं, आणि रडायला आरंभ केला.

" मोडलन् बयानं माझं पेन ! " असं म्हणत अचलेनं झटकन् पुढें होऊन तें उचलून पाहिलं, आणि तें अगदीं सुरक्षित असल्याची तिची खात्री झाली तरी मैनाकडे बघून ती रागानं पुटपुटत राहिली.

तें पाहून मैनानं भोकाड वासून लोळण घेतली आणि अचलेच्या सूटकेसला धडा धडा लाथा मारल्या.

अनुताईनीं तिला उचलून घेतलं आणि तिला घेऊन सैंपाक घरांत जातां जातां त्या अचलेला म्हणाल्या, " असं वागत जाऊं नकोस ग तिच्याशीं "

बहिणीबहिणींतला हा बेबनांव जितक्या आकस्मिकपणें झाला तितकाच विनाकारण संपलाही.

बिस्किटं खायला मिळालीं, चहा प्यायला मिळाला तेव्हां मैना ताळ्यावर आली. अचलेनं डबा उघडून तिला टॉफी दिली आणि तिच्यासाठीं आणलेली मोटर कशी धावते तें दाखविलं तेव्हां तर ती पुरतीच खुषींत आली. चंद्रनिवासाच्या मधल्या प्रशस्त लांबटसर चौकाच्या बाजूला ब्लॉकची आगाशी होती तिकडे अचला गेली,

तेव्हां तिच्या कडेवर चढून मैना गुलुगुलु गोष्टी बोलूं लागली. चौकाची सबंद जागा मुद्दाम तयार केलेल्या हिरवळीनं झाकलेली होती. हिरवळीच्या कडेनं चारी बाजूंस मोठाल्या लाकडी कुंड्या मांडून त्यांत लावलेलीं नवी रोपं आतां बरींच उगवलीं होती. अचलेच्या कडेवर बसल्या बसल्या मैना सांगूं लागली, " आक्का, ए आक्का, आपल्या चौकांत दोन मोर आहेत बरं का. "

" होय कां ? "

" हो ना ! दोन आहेत म्हणजे एक मोर आहे. मोठ्या पिसांचा. आणि एक लांडोर आहे. अमू आणखी नंदा म्हणतात कीं ती त्याची बायको ! गंमतच आहे, नाहीं ? "

" अमू कोण ? अन् नंदा कोण ?"

" आमच्या बालविकास-मंदिरांतले. माझे मित्र आहेत ते."

" असं कां ? अरे वा ! "

अचलेच्या त्या उद्गारानं मैनाताई खूपच रंगांत आल्या, व अमू आणि नंदा या दोन थोर व्यक्तींची माहिति त्या तिला देऊं लागल्या.

तिच्या रिपोर्टाचा एकंदर रोख असा होता कीं अमू आणि नंदा हे दोघे तिच्याइतके हुशार नव्हते, आणि शहाणेही नव्हते. बाल-विकास-मंदिरांत ते आपल्या जागीं बसून रहात नसत व बाईंच्या शिकविण्याकडे मुळीदेखील लक्ष देत नसत. बाईंनीं कितीही नको म्हटलं तरी डेऱ्यांतलं पाणी सारखं पीत, रंगाच्या कांड्या मिळाल्या कीं पाटीवर लिहिण्याऐवजीं डेस्कावर रेघोट्या ओढीत, थुंकी लावून पुसून टाकीत, बाईंची नजर चुकवून एकमेकांशीं कुस्ती खेळत. " बाई त्याना नेहमीं म्हणतात," मैना म्हणाली " तुमचीं दोघांचीं नांवं काढून टाकतें थांबा. पण बाईंनीं असं म्हटलं कीं अमू आणि नंदा बरं बरं म्हणून हंसायला लागतात, आणि बाईंनीं तोंड फिरवलं कीं वेडावून दाखवतात. असं वेडावून दाखवावं कां ग बाईंना ? " तिनं अचलेची हनुवटी ओढून तिला आपल्याकडे बघायला लावून आपल्या प्रश्नाची निकड वाढविली. " छे छे ! शहाणीं मुलं असं

नाहीं करीत" असं म्हणून तिच्या मताला पुष्टि देणं अचलेला भागच होतं. अमू आणि नंदा शहाणे नव्हते याचा अर्थ उघडच असा होता कीं मैना स्वतः फार शहाणी होती. अचलेच्या उत्तरान उत्तेजित होऊन अमू-नंदाच्या आणखी कित्येक दुष्कृत्यांचा पाढा मैनानं वाचला. मैनाचे वडील डॉक्टर असल्यामुळें इंजेक्शनच्या छोट्या छोट्या फुगेदार कांचेच्या रिकाम्या बाटल्या, टिनच्या चपट्या डब्या, असलं साहित्य तिला पुष्कळ सांठवितां येत असे. आपली ती संपत्ति बालविकास-मंदिरातल्या मुलामुलींना दाखविण्यांत व 'मला दे, मला दे' म्हणून आपल्या मागं त्याना लावण्यांत मैनाला नेहमींच मौज वाटे. "अमू-नंदाला मात्र बाटल्या आणि डब्या मी कधीं दाखवीत नाहीं" मैना सांगूं लागली. "दाखविल्या कीं ते हिसकूनच घेतात, आणि दिलं नाहीं तर म्हणतात होते आहे कां कुस्ती? मुली कधीं कुस्ती खेळतात कां ग?" "छे छे! मुली नाहीं कुस्ती खेळत!" असं उत्तर देणं अचलेला भागच होतं. मैना म्हणाली "म्हणून आतांशा बाटल्या अन् डब्या मी शाळेंत नेतच नाहीं."

अचला म्हणाली, "फारच द्वाड दिसताहेत हे अमू आणि नंदा!"

मैना म्हणाली, "मी पुष्कळदां गट्टी फू करतें त्या दोघांशीं. पण मग तेच येतात माझ्याकडे अन् म्हणतात गट्टी जोडूं या पुन्हां. मग त्यांच्याकडून पतंग घेतल्याशिवाय मी नाहीं गट्टी जोडीत. तुला पतंग उडवतां येतो कां ग आक्का?"

"अंहं!"

"हुर्यो रे! एवढी मोठी झालीस आणि पतंग नाहीं उडवितां येत! अमू छान उडवितो. अमूपेक्षांही नंदा. तो बघ नंदा. ए नंदा! नंदा!" तिनं मोठमोठ्यांदा हांका मारल्या.

अचलेनं पाहिलं तों समोरच्या ब्लॉकमधल्या आगाशींत मैनाच्याच वयाचा एक मुलगा येऊन भिंतीवर अर्धा चढून खालीं वाकून थुंकीची पिचकारी टाकीत असलेला तिला दिसला. तिनं मैनाला

विचारलं " हा तुझा नंदा काय ? "

तिच्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजीं मैनानं हांका मारल्या. " नंदा ! ए नंदा ! " त्या मुलानं मान वर करून पाहिलं तेव्हां मैना ओरडून म्हणाली " पुण्याहून आमची आक्का आली आहे. ही बघितलीस काय ? तिनं टॉफीचा डबा आणला आहे मला. मोठ्ठा ! आणखी एक मोटार. जांभळी जांभळी. तुला कुठें आहे मोटार ? आणि आमच्या आक्कासारखी आक्का तरी आहे कां तुला ? "

नंदानं भिंतीवर वाकल्या वाकल्याच खालीं पिचकारी टाकली आणि कठड्याच्या नक्षी कामाच्या भोंकांत पावलं रोवून उभं राहिल्या राहिल्या तो ओरडून म्हणाला " हॅट ! आक्का काय करायची ? आमच्या दादासारखा दादा आहे कां तुला ? "

मैनाचा चेहरा एकदम पडला. तिच्या बालविकास–मंदिरांतल्या किती तरी मुलामुलींना थोरले भाऊ होते. आपल्याला भाऊ नसावा याचं तिला वाईट वाटत नसे, परंतु आश्चर्य वाटत असे. नानांना आणि आईला तिनं प्रश्न विचारून पाहिलं होत, परंतु त्यांना नीटसं उत्तर देतां आलं नव्हतं. तारा मावशी मात्र एकदां तिला म्हणाली होती, " आतां होईल ना तुला भाऊ. " तिनं विचारलं होतं " केव्हां ? "

तारा मावशी हंसून म्हणाली होती " तें कसं मी सांगूं ? पण होईल. "

" मग त्याला मी दादा म्हणेन हं. "

" वेडी रे वेडी ! त्याला कसं दादा म्हणशील. पाठीवर झालेल्या भावाला दादा नाहीं म्हणत. "

" मग पाठीवर नकोच व्हायला. पोटावर होऊं दे. "

" किती वेडी ग तूं " असं म्हणून तारा मावशीनं तिचे मुके घेतले होते.

परंतु आपल्याला मोठा भाऊ कां नसावा या प्रश्नाचा उलगडा मैनाला व्हायचा राहिलाच होता, व तो नसल्याबद्दलची खंतही तिच्या मनांत कायम होती. त्यामुळें नंदाचा प्रश्न ऐकून तिला

खजील झाल्यासारखं वाटलं. परंतु मनांतला खेद कबूल करण्या ऐवजीं तिनं ओरडून नंदाला म्हटलं,"हॅट! दादा काय करायचाय? आक्काच असावी."

समोरून नंदू ओरडला, " हॅट ! आक्का टक्का बुक्का ! दादाच चांगला !"

मैनानं उलट सरबत्ती केली, " दादा पादा गद्धा !"

त्या उलट सुलट फैरी ऐकून अचला थक्कच झाली. एकमेकाला चिडविण्यांत लहान मुलं इतकी पटाईत असतात याची तिला कल्पना नव्हती. तिनं मैनाच्या तोंडावर तळहात टेकला आणि म्हटलं, " अग अग असं बोलतात कां ?"

समोरून नंदा ओरडला, " शाळेंत ये म्हणजे बडवतों बघ. दादा पादा गद्धा काय ? येशीलच कीं शाळेंत !"

तितक्यांत आंतून सुमारें बावीस वर्षांचा एक तरूण आगाशींत आला व नंदाला आवरून म्हणाला " काय रे, काय चाललंय ?"

नंदा म्हणाला, "ती समोरची डॉक्टरांची मैना बघ चिडवते. दादा पादा गद्धा म्हणाली. आतां भेटूं दे शाळेंत म्हणजे— "

" बरं बरं. खालीं उतर पाहूं आधीं." नंदाच्या थोरल्या भावानं त्याला एक टप्पल दिली. नंदानं डोक्याचा मागचा भाग चोळला. " कां रे दाद्या ?" असं म्हणून तो खालीं उतरला. परंतु उतरण्याच्या आधीं एक पिचकारी टाकल्यावांचून तो राहिला नाहीं. खालच्या चौकांतल्या एका कुंडींतल्या झाडावर नेम धरून थुंकण्याचं प्रॅक्टिस तो करीत असे. रामराव दाणींचं बिऱ्हाड खालच्या मजल्यावर होतं, त्यांचा अमू त्याच्याकडे खेळायला आला म्हणजे थुंकण्याच्या बाबतींत दोघांची शर्यत लागत असे, म्हणून सराव करून ठेवण्याची गरज होती.

थुंकल्याबद्दल आणखी एक टप्पल मारून नंदाचा थोरला भाऊ त्याला म्हणाला, " चल जा पाहूं घरांत."

डोक्याचा मागचा भाग पुन्हां एकदां चोळीत घरांत जाण्यापूर्वी

नंदू म्हणाला " दादा पांदा गद्धा ! " मैनाकडून हें बरं फुकट शिक्षण आपल्याला मिळालं असं त्याच्या मनांत आलं.

नंदूचं पारिपत्य झालेलं पाहून मैनाला अगदीं मनापासून हसूं आलं व तिनं मोठ्यांदा टाळया वाजविल्या.

नंदूच्या दादानं तिच्याकडे पाहून म्हटलं " काय मैनाताई, काय चाललंय ? "

" आमची आक्का आली आहे बघ. "

" असं कां ! छान ! "

" तिनं मला टॉफीचा डबा आणला आहे मोठ्ठा. आणखी एक मोटरगाडी. जांभळी जांभळी. "

" अरे वा ! "

नंदूचा थोरला भाऊ बोलत होता मैनाशीं, पण पहात होता अचलेकडे ! आणि अचला त्याची नजर चुकविण्यासाठीं मैनाचा पापा घेत होती पण त्यांतल्या त्यात नंदूच्या भावाला निरखून पाहून घेत होती. आपण खरं म्हणजे एकमेकांकडे पाहून हंसत आहोंत हें दोघांनाही कळत होतं. " आमच्याकडे येणार काय ?" नंदूच्या दादानं विचारलं. त्याचा तो प्रश्न म्हटला तर मैनाला पण म्हटला तर अचलेला उद्देशून केल्यासारखा होता. हें लक्षांत आल्याबरोबर अचलेचं तोंड एकदम गोरं मोरं झालं, आणि मैनाला घेऊन ती घरांत वळली. तिच्या मनांत आलं, जरा अधिक प्रसंगीच दिसतंय काम. चहाटळ तरुण मुलांचे नमुने तिनं पुण्यास पाहिले होते.

दुपारीं आईशेजारीं अंथरुणांत पडल्या पडल्या तिनं नंदूच्या घरांतली थोडी फार बातमी चौकसपणाचा संशय येणार नाहीं अशा बेतानं तिच्याकडून काढून घेतली... नंदूच्या वडिलांचं नांव दादासाहेब वीरकर होतं, आईचं नांव उमाक्का, आणि थोरल्या भावाचं दिवाकर होतं. मराठी नाटकाचा धंदा जेव्हां ऐन जोरांत होता तेव्हां दादासाहेब वीरकर एका नामांकित संगीत नाटक मंडळीचे भागीदार आणि मॅनेजर होते. नाटकी लोकांत त्यांचं नांव

फार प्रसिद्ध होतं. त्यांची कंपनी ऐन जोरांत होती तेव्हां दादासाहेब वीरकर म्हणजे एक मोठं प्रस्थ होतं. मोठ्या मोठ्या नटांना आणि नाटककर्त्यांना त्यांनीं आपल्या हाताच्या बोटांवर नाचविलं होतं, भागीदारांना सफाई फसवलं होतं, कंपनी नेहमीं कर्जात ठेवली होती पण बँकेंतलं आपलं स्वतःचं खातं चांगलं फुगवलं होतं, सांगली-मिरजेकडे कां कुठेंशी शेतीवाडी केली होती, मुंबईंत हा मोठा ब्लॉक घेतला होता. मराठी नाटकांचा पडता काळ आला तेव्हां एके काळीं गाजलेली त्यांची नाटक कंपनी डबघाईला आली होती. पण जुन्या नटांचे संयुक्त प्रयोग करणं, जिचा बाजारभाव खलास झाला आहे अशा एखाद्या सिनेमा नटीला मुख्य भूमिका देणं, अशा नाना युक्त्या करून दादासाहेब वीरकरांनीं स्वतःची कमाई ढासळूं दिली नव्हती. चार संपादकांकडे हेलपाटे घालून, त्यांची खुशामत करून, त्यांना चहापाणी पाजून वृत्तपत्र खिशात कशीं ठेवावीं ही विद्या त्याना चांगली अवगत होती. त्यामुळें नाटकाचीं कंत्राटं करणाऱ्या, याची टोपी त्याला घाल त्याची याला घाल अशा लटपटी करणाऱ्या दादासाहेबांचं वर्णन वर्तमानपत्रवाले करीत तें "मराठी रंगभूमीचा उद्धार करणारे कळकळीचे जुने धाडसी कार्यकर्ते" अशा शब्दांनीं. मुंबईंत नाटकांचं एक थिएटर बांधण्याच्या गप्पाही ते खाजगी संभाषणांत, व्याख्यानांत, व संपादकांना घरीं चहाला बोलावून दिलेल्या मुलाखतींत मारीत असत. त्याबाबत त्यांनीं थोडा फार फंडही गोळा केला होता, व फंडाचे हिशोब विचारायसाठी नेहमीं टपून बसलेल्या सार्वजनिक फुकट फौजदारांनी त्रास देऊं नये म्हणून काँग्रेस श्रेष्ठींपैकीं एका बड्या धेंडाला फंडाचे अध्यक्ष करून टाकलं होतं. एक उत्तमपैकीं नवीन नाटक कंपनी काढण्याचेही त्यांचे बेत नेहमीं चालू असत, व त्यामुळे जुने नवे नाटककार, पेन्शनींत निघालेले व होतकरू नटनटी, बेकार नाटकी लोक अशांची बैठक त्यांच्या घरीं नित्य पडलेली असे. नाटकाच्या मुख्य उद्योगाच्या जोडीला पुढाऱ्यांच्या व साहित्यिकांच्या पुण्यतिथी, सत्कार समारंभ, चर्चासभा, असले

परचुरण समारंभ गाजविण्याचा धंदाही ते करीत असत. सारांश, समोरच्या ब्लॉकमधले दादासाहेब वीरकर म्हणजे 'कांहीं करा पण मला पुढारी म्हणा' अशा ध्येयानं नित्य कांहीं तरी लटपटी करण्यांत यश मिळविणारीं व दुनियेला झुकविणारीं जीं माणसं सध्यां समाजांत वावरतात त्यांचा एक नमुना होते... चंद्रनिवासांतल्या महिला मंडळांत बायकांच्या गप्पांच्या ओघांत मिळालेली वीरकराबद्दलची ही माहिती लेकीला सादर करून अनुताईनीं शेवटीं शेरा मारला, "चांगलीं माणस नाहींत तीं. किती झालं तरी नाटक्याचं घर!"

"असं!" असा उद्गार काढून अचलेनं एक मासिक उघडून वाचायला आरंभ केला... सकाळीं वीरकरांच्या थोरल्या मुलानं "आमच्याकडे येणार काय?" असं विचारण्याचा जो चहाटळपणा केला होता त्याचा उलगडा झाल्यासारखं तिला वाटलं. नाटकी बापाचा मुलगा होता दिवाकर! मग बरोबर आहे...परंतु दिवाकरविषयीं तिचं मत वाईट होईना...त्याचा बाप कसाही असो, पण दिवाकर तिला देखणा वाटला होता! अचलेच्या दृष्टीस तो पडला तेव्हां त्यानं परीटघडी पांढरा शुभ्र लेंगा घातला होता, त्याच्या अंगांत तलम मलमलीचा सदरा होता त्यांतून घट्ट सँडो गंजिफ्रॉक दिसत होता, डाव्या मनगटावर सोनेरी घड्याळ चमकत होतं, डोक्यावरच्या काळ्याभोर केसांचा भांग रेखून पाडलेला होता. असा तरुण मुलगा अचलेनं आजपर्यंत कधीं पाहिला नव्हता. पुण्याच्या कॉलेजांत शिकणारी ती मुलगी अगदीं सोवळी आजीबाई थोडीच होती? सूचक रीतीनं "आमच्याकडे येणार काय?" असं कुणी विचारलं तर त्यांत आपला विनयभंग झाला असं समजण्याइतकी ती कांहीं जुनाट नव्हती. शिवाय प्रश्न विचारणारा तरुण काळा कुरूप असता तर गोष्ट निराळी होती. सुंदर तरुणाच्या तोंडून तो प्रश्न बाहेर पडल्यावर त्याची किंमत निराळी नव्हती काय? देखण्या पुरुषाला थोडा चहाटळपणा करण्याइतकं आपलं आकर्षण वाटावं या जाणिवेचं सुख दूर लोटणं अचलेच्या वयांतल्या

तरुण मुलींना सोपं नसतं... दिवाकराचा तो प्रश्न ऐकल्याबरोबर नापसंती दाखविण्यासाठीं ती झटकन् घरांत परत फिरली होती, खरी, परंतु त्या प्रश्नानं तिच्या अहंकाराला गुदगुल्या झाल्या होत्या, व आपण मुरका मारून झपाट्यानं आगाशींतून दूर झालों या गोष्टीचा योग्य तोच अर्थ दिवाकर घेईल यावद्दल तिची खात्री होती. मागं मागं करणाऱ्या तरुण विद्यार्थ्यांचा थोडा फार अनुभव तिला पुण्यांत मिळाला होता. त्यांना झुलवीत ठेवण्याचं शास्त्र तिला कांहीं अगदींच अज्ञात नव्हतं...

संध्याकाळीं मैनाला कडेवर घेऊन खालच्या हिरवळीवरचे मोर दाखविण्याच्या निमित्तानं अचला पुन्हां आगाशींत जाऊन उभी राहिली. परंतु बराच वेळ उभं राहूनही तिला दिवाकर दिसला नाहीं. नंदूच्या ब्लॉकमधल्या आगाशीजवळच्या दालनांत सात आठ माणसं जमलेलीं तिनं पाहिलीं. त्यांच्या मोठमोठ्यानं चाललेल्या गप्पा तिला मधूनमधून ऐकूं आल्या.हंसण्याच्या उकळ्या वरचेवर फुटल्या त्याही तिनं ऐकल्या. पांढऱ्या शुभ्र केसांचे एक गृहस्थ आंतल्या लोकांशीं बोलतां बोलतांच बाहेर आगाशींत येत, वाकून वघन, शर्टखालीं दोन्ही हात घालून कमरेचं धोतर घट्ट करीत, व पुन्हां आंत जात, तेही तिच्या दृष्टीस पडले. हेच दादासाहेब वीरकर असले पाहिजेत असं तिला सहज ओळखतां आलं...परंतु दिवाकर कांहीं तिच्या दृष्टीस पडेना...शेवटीं ती कंटाळली, आणि घरांत परत शिरली.

दुसऱ्या दिवशीं सकाळींदेखील तिचं आगाशींत उभं राहणं वाया गेलं...मग तिनं मनाशीं निश्चय केला, दिवाकराला पाहण्याचा प्रयत्न पुन्हां नाहीं करायचा !...प्रयत्न फसल्यामुळें तिच्या नीतीच्या कल्पनाही जाग्या झाल्या. "असं करण मला शोभतं काय ?" ती मनाशीं म्हणाली...

परंतु मैना बालक-मंदिरांत गेली, डॉक्टर दुपारच्या जेवणासाठीं घरीं परत यायला अवकाश होता म्हणून बाहेरच्या बैठकीच्या खोलींत एका इंग्रजी मासिकांतलीं चित्रं पहात ती बसली. दार उघडी

घंटा वाजलेली तिनं ऐकली. सारजा जाईल आणि उघडील दार अशा विचारानं ती जागच्या जागींच बसून राहिली. थोड्याच वेळांत बैठकीच्या खोलींत डोकावून सारजानं तिला सांगितलं, " समोरचे दिवाकर आले आहेत वाटतं. " तिच्या मागोमागच सूट बूट घातलेला दिवाकर दारावरच्या पडद्याचा झोळ धरून उभा राहिलेला अचलेला दिसला. ' डॉक्टर आले आहेत कीं नाहीं घरीं ? " त्यानं तिला विचारलं.

ती चटकन् पुस्तक टाकून उठली व वेणीचा शेपटा पुढें होता तो पाठीमागें टाकीत म्हणाली, " नाहीं, अजून नाहीं आले. "

" केव्हां येतील ? "

त्याच वेळेस आंतून अनुताईनीं विचारलं " आक्का, कोण ग आलंय ? "

आईच्या आणि दिवाकराच्या प्रश्नांना एकदम उत्तर द्यायचं म्हणजे मोठी पंचाईतच होती. त्यामुळें कुणाच्याच प्रश्नाला उत्तर न देतां अचला गप्प राहिली.

बाहेर कोण आलं आहे त्याबद्दल नुसता प्रश्न करून घरांतल्या बायका कधीं स्वस्थ राहिल्या आहेत ? प्रश्नाच्या मागोमाग स्वतः अनुताईच डोकावल्या. दिवाकर दृष्टीस पडतांच त्या हंसून म्हणाल्या " तुम्ही आलां आहांत होय ? " अचलेची पेंचांतून आपोआप सुटका झाली. कारण मग दिवाकराचा तिच्या आईशींच संवाद सुरूं झाला.

" डॉक्टरांकडे आलों होतों जरा. "

" होय कां ? पण अजून आले नाहींत दवाखान्यांतून. "

" फार अवकाश आहे कां यायला ? "

" कुठें दूरच्या व्हिजिटला गेले असले तर कुणास ठाऊक, पण नेहमींच्या वेळेप्रमाणें म्हणजे आतां इतक्यांत यायलाच हवेत. "

" वाट पहात बसूं काय मी ? "

देखण्या तरुण पुरुषांचं हंसणं म्हणजे एक अमोघ शस्त्र आहे ! तरुण मुलीच नव्हे, वय झालेल्या लेकुरवाळ्या बायकासुद्धां त्या

शस्त्रानं घायाळ होतात. " दादासाहेब वीरकरांची माणसं कांहीं चांगलीं नाहींत " असा महिलामंडळानं पुरस्कृत केलेला शेरा लेकीजवळ मारणाऱ्या आनुताईंवर सुटाबुटांत अधिकच सुंदर दिसणाऱ्या तरुण दिवाकराच्या हास्याचा परिणाम झाला. वीरकरांच्या कुटुंबांतलीं माणसं वाईट आहेत या मताचा त्यांना त्या क्षणीं विसर पडला. दिवाकराचं रूप आणि त्याच्या गोऱ्या पान तोंडावरचं हंसूं एवढ्या दोनच गोष्टींची जाणीव त्यांना त्या क्षणीं राहिली. त्या हंसत म्हणाल्या " हो हो बसा ना ! हें काय विचारणं ? " दिवाकर अचलेकडे बघत आहे हें लक्षांत आल्यावर त्यांनीं ओळख करून दिली," ही माझी थोरली लेक अचला. पुण्याच्या कॉलेजांत असते. सुटींत आली आहे. "

आतां अचलेकडे अगदीं राजरोस पाहायला हरकत नाहीं असा विचार करून दिवाकरानं त्या संधीचा भरपूर फायदा घेतला आणि नमस्कार केला.

अनुताईंनीं अचलेला त्याची ओळख करून दिली, व त्या म्हणाल्या " यांच्या नंदूची आणि आपल्या मैनाची फार गट्टी आहे."

आतां कोचावर व्यवस्थित स्थानापन्न झालेला दिवाकर म्हणाला " मैनाताईच्या एकेक गंमती नंदू सांगत असतो आमच्या घरांत. तिच्याकडून घेतलेल्या इंजेक्शनच्या रिकाम्या बाटल्या आणि चपट्या डब्या तो घरांत कुठें टाकील त्याचा नेम नसतो. " दिवाकर हंसला.

त्याच्या त्या बोलण्यांत आपल्या लेकीचंच कौतुक झालं असं वाटून अनुताईदेखील हंसल्या व म्हणाल्या " होय ना ! "

अचलेला भीति वाटली कीं आतां आपली आईच दिवाकराशीं गप्पा ठोकीत उभी राहणार. त्यामुळें सैंपाक घरांतून सारजानं हांक मारली व " आलें ग आलें " असं म्हणून अनुताई गेल्या तेव्हां अचलेनं सुटकेचा श्वास टाकला. तिनं दिवाकराला विचारलं " काय काम आहे नानांशीं ? "

तिच्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजीं दिवाकरानं तिला विचारलं "तुम्ही बसतां कां मी उभा राहूं ?"

त्याच्या त्या प्रश्नाचं अचलेला चांगलंच हंसू आलं. "असं होय? असा उद्गार काढून ती त्याच्यासमोर बसली व म्हणाली "आतां झालं ?"

दिवाकर हंसला आणि म्हणाला "झालं तर! आतां देतों तुमच्या प्रश्नाचं उत्तर."

"द्यायलाच पाहिजे असं नाहीं. सहज विचारलं."

"मी देखील सहजच सांगतो कीं." तो हंसला.

अचलेच्या मनात आलं काय तरी याची बोलण्याची गंमतीची तऱ्हा! एक शब्द कांहीं खालीं पडूं देत नाहीं!...

दिवाकर म्हणाला "तुमच्या नानांना विचारणार आहे आमच्या कंपनीची एखादी पॉलिसी घेता का ?"

"म्हणजे!—"

"होय, माझा मुख्य उद्योग निराळा आहे, पण साइड बिझिनेस म्हणून एका मोठ्या विमा कंपनीचं काम करतों मी."

"अस्सं!"

"विम्याच्या कामाबद्दल वाईट मत असल्यासारखा उद्गार काढलात तुम्ही"

"मी ? नाहीं बाई! मला विम्यातलं कांहींच कळत नाहीं. तें काम चागलंही असेल, वाईटही असेल."

"अगदीं बरोबर बोललांत. काम करणाऱ्यावर आहे."

"होय तर काय!"

"माझे कांहीं स्नेही मला विचारतात तूं हें विम्याचं काम कशाला करतोस ? विनोदाखातर मी त्यांना काय उत्तर देतों माहीत आहे कां ?"

"तुम्ही सांगितल्याशिवाय मला कसं माहीत असणार ?"

दिवाकराला हंसू आलं व तो मनाशीं म्हणाला, चार विनोदी उत्तरांची झटापट करण्याइतकी हुशारसुद्धां आहे म्हणायची ही

सुंदर मुलगी! आपली कोटी हिला खात्रीनं आवडेल अशा विचारानं उत्तेजन वाटून तो म्हणाला, "मी माझ्या मित्रांना सांगतों कीं विमा विक्रीच्या धंद्याचे इतर काय फायदे असतील ते असोत अगर नसोत, पण एक फारच मोठा फायदा उघड आहे—"

"कोणता?"

"ज्यांची मुळींदेखील ओळख नाहीं आणि करून घ्यावी म्हटलं तरी कठीण अशांच्या घरांत खुशाल शिरता येतं. असभ्य म्हणवून न घेतां! कां आलांत म्हणून विचारलं कीं सागतां येतं पॉलिसीच विचारायला आलों म्हणून."

"अस्सं! आत्ताच्या येण्यांतसुद्धां हीच पॉलिसी तर नाहीं ना?"

तिनं इतकी सुंदर कोटी केलेली पाहून दिवाकर अगदीं खूष झाला व हंसला. तो म्हणाला "कोर्टांत उभं राहिल्याप्रमाणें शपथेवर खरं सांगायचं असेल तर थोडीशी आहे. डॉक्टराना एकदां पॉलिसीबद्दल विचारण्याचं माझ्या मनांत बरेच दिवस होतं हें कांहीं खोटं नाहीं. पण अगदीं आजच आणि आत्तांच आलों तो तुमची भेट होईल व ओळख करून घेतां येइल या हिशोबानं,"

त्यानं अचलेकडे इतकं रोखून पाहिलं कीं अचलेनं नजर खालीं केली. त्याचं बोलणं तिला फार आवडलं होतं. परंतु त्यामुळें ती गोंधळून गेली होती. पुन्हां वर मान करून त्याच्याकडे बघण्याचा धीर आपल्याला होईलसं तिला वाटत नव्हतं...

तितक्यांत दारावरची घंटा खणाणली.

"नाना आले वाटतं" असं म्हणत अचला उठली आणि दाराकडे पळाली.

जेवतांना बायकोला आणि मुलीला उद्देशून डॉक्टर म्हणाले, "वीरकरांचा दिवाकर म्हणत होता, आमच्या कंपनींत विमा उतरा. मी सांगितलं, बाबा मोठ्या रकमेचा विमा मीं आधींच उतरलेला आहे. त्यावर तो म्हणाला, मग काकूंचा उतरा—"

अनुताईनीं विचारलं "काकू म्हणजे कोण?"

" अग हें काय विचारतेस ? तुलाच तो काकू म्हणाला. "

" मला ? इश्श ! " अनुताईंनीं अगदीं तीव्र नापसंतीचा उद्गार काढला. तरुण देखण्या दिवाकरानं म्हाताऱ्या बाईला शोभणारी काकू ही पदवी आपल्याला द्यावी याचा त्यांना फार विषाद वाटला.... अनुताईच्या वयाच्या बायकांना लोकांनीं आपल्याला तरुण समजावं अशी फार इच्छा असते, व अंतर्यामीची ती इच्छा दुखावली गेली कीं तें त्यांना सहन होत नाहीं. त्या फणकाऱ्यानं म्हणाल्या. " कांहीं नको माझा विमा आणखी ठिमा ! " थोड्या वेळापूर्वी त्यांना दिवाकराविषयीं फार आकर्षण वाटलं होतं. पण आतां त्याच्यावर त्या चांगल्याच रुसल्या होत्या ...काकूंचा विमा उतरा म्हणे !

डॉक्टर म्हणाले " दिवाकर आणखी म्हणत होता कीं मैनाच्या शिक्षणाची म्हणून मोठ्या रकमेची पॉलिसी घेतां येईल—"

" तें तुम्ही जाणे अन् तुमची लेक जाणे ! वाटलं तुम्हांला तर घ्या—" अनुताईच्या मनातली धुसफुस अजूनही संपली नव्हती

त्यांच्या फणकाऱ्याचं गुप्त कारण डॉक्टरना समजलं नव्हतं, परंतु तो पाहून त्यांची करमणूक होत होती.. ते हंसून म्हणाले, " अग, घ्या आणि नका घेऊं काय सांगतेस ? इथें कोण लगेच विमा उतरायला निघालं आहे ? वीरकरांचा दिवाकर कशासाठीं आला होता तें गंमतीनं सांगत होतों एवढेंच. ज्या कंपनीचं काम तो करतो ती कंपनी कुठें आहे मोठी चांगली ? डबघाईला आलेली लबाड लोकांचीच आहे ती कंपनी. वीरकरांचा दिवाकर तिचा एजंट आहे यावरनच काय तें ओळख. "

बापाचं तें बोलणं अचलेला आवडलं नाहीं. ' चांगलीं नाहींत तीं माणसं. बोलून चालून नाटक्यांचं घर ' असा शेरा तिच्या आईनं मारला होता. आतां नाना असं खवचट बोलत होते. तिचं स्वतःचं मत तर दिवाकराविषयीं विलक्षण अनुकूल झालं होतं. असा देखणा, हुशार चुणचुणीत आणि विनोदी बोलण्यांत पटाईत तरुण तिनं पूर्वी कधीं पाहिला नव्हता. ज्या विमाकंपनीचं काम तो करीत होता ती चांगलीच असली पाहिजे, लबाडांची असायला काय

झालं ! तसं म्हटलं तर साऱ्याच विमाकंपन्या लबाडांच्या कां म्हणूं नयेत ! नाना कधीं कधीं उगीच टीका करतात. आणखी पुन्हां दिवाकर विम्याचा धंदा करीत होता तो उगीच साइड बिझिनेस म्हणून. तो कांहीं त्याचा मुख्य उद्योग नव्हता. नानांकडे रागावून बघावंसं तिला वाटलं. पण तिनं खालीं घातलेली मान वर न करतां घास घेतला. तिला वाटलं दिवाकराचा विषय एवढ्यावरच संपेल तर बरं होईल.

परंतु डॉक्टरांना काय लहर आली होती कुणास ठाऊक ? ते दिवाकराबद्दलच बोलत राहिले. आणि तें अशा थाटात कीं जणुं त्याच्याविषयीं त्यांना जी कांहीं माहिती होती ती वाईटच. वाईट वर्तनाबद्दल कॉलेजांतून त्याला कसा हाकलला होता, दोन चार ठिकाणच्या नोकरींत त्यानं कोणते प्रताप केले होते, इत्यादि इतिहास त्यांनीं निवेदन केला व ते म्हणाले " सध्या डिकिन्सन अँड को. नांवाच्या कागदाच्या मोठ्या व्यापारी कंपनींत तो नोकरीला आहे म्हणे. किती दिवस टिकते स्वारी बघूं या..."

अचलेनं मनांतल्या मनांत त्यांना टोला दिला, बरं बरं हो, नाहीं टिकला तरी जेवायला घाला म्हणून तुमच्या दाराशीं कांहीं येणार नाहीं तो !... दिवाकर रूपानं अगदीं असामान्य होता, व त्याच्या अंगीं कांहीं दुर्गुण असतील हें मान्य करायला अचलेची मुळींच तयारी नव्हती. किंबहुना तिचे वडील जों जों दिवाकरावर टीका करीत होते तों तों ती मनांतल्या मनांत त्याचा अधिक कैवार घेत होती. माणसाचं एकदां कानफाट्या म्हणून नांव पडलं कीं ज्यानं उठावं त्यानं त्याच्याविषयीं वाटेल तें बोलावं, असं होतं पुष्कळदां. त्यांतलीच दिवाकराची गोष्ट असावी असं तिनं मनाशीं ठरविलं. दिवाकर तिला एकदम आवडला होता. तिच्या वयाच्या मुली एखाद्या तरुण पुरुषावर एकदां फिदा झाल्या कीं त्यांच्या मनांत प्रीति उत्पन्न होते ती नाजुक रोपट्यासारखीं नसते. उगवतांक्षणींच तिची पाळंमुळं खोलवर जाऊन दृढ झालेलीं असतात.

संध्याकाळीं नंदा आणि अमू दोघे मैनाकडे आले व म्हणाले "पार्कात जाऊं या खेळायला. येणार काय?" अमूनं आपली क्रिकेटची छोटी बॅट आणि चेंडू आणला होता. नंदानं पतंग आणला होता. मैना पार्कात जायला तयार झाली अन् म्हणाली, "आक्कानं आणलेली माझी नवी मोटार घेऊं?" अनुताईनीं नंदाला विचारलं "अरे तुम्ही तिघंच कशी जाणार? कुणी तरी मोठं माणूस पाहिजे तुमच्याबरोबर. सारजाला देऊं कां?" नंदा आगाशीच्या कठड्यावरून वांकला होता व या बाजूच्या खालच्या कुंडीवर नेम धरून पिचकारी मारून बघत होता. पिचकारी मारून झाल्यावर त्यानं उडी टाकली व तो अनुताईना म्हणाला, "सारजा नको आमच्याबरोबर जायला. पार्कात देसायांचा गोपाळ गडी येतो त्याच्याशींच ती तंबाखू खात गप्पा मारीत बसते. अहो आक्का, तुम्ही चला कीं आमच्याबरोबर मैनाताईला घेऊन." अनुताई अचलेला म्हणाल्या "जा बाई!" लहान मुलांना घेऊन पार्कात खेळायला नेण्यांत अचलेला कमीपणा वाटत होता. पण मैनानं तिची साडी ओढून आग्रह केला तेव्हां ती नाखुषीनं कां होईना पण तयार झाली. "चला बाबांनो" असं म्हणून ती निघाली.

पार्काच्या अलीकडच्या कोपऱ्यावर दिवाकर उभा राहिलेला दृष्टीस पडतांच ती चमकली. त्याच्याशीं बोलावं कीं न बोलावं याबद्दल तिच्या मनाचा क्षणमात्र गोंधळ उडाला. पण तोच हसत तिच्याकडे आला व जवळ येऊन म्हणाला "माझी गोळी लागू पडली म्हणायची. खात्री नव्हती मला."

अत्यंत आश्चर्यानं त्याच्याकडे पाहतां पाहतां अचलेला हंसूं फुटलं. "म्हणजे!" एवढाच उद्गार काढून तिनं आपलीं नाजुक बोटं ओठांवर टेकलीं.

दिवाकर म्हणाला "नंदा आपण होऊन मैनाकडे आला असं वाटलं कीं काय तुम्हांला? मींच पाठविला त्याला. मैनाबरोबर आक्कालाही आणण्याचा मंत्र मीं त्याला शिकविला होता, अन् माझं नांव सांगूं नकोस म्हणून बजावलं होतं. नंदानं फार हुशारीनं

आपलं काम पार पाडलंसं दिसतंय. ''

अचला हंसली आणि म्हणाली '' भाऊ कोणाचा आहे तो ? ''

तिन्ही छोटीं मुलं हातांत हात घालून पुढें चालली होतीं. दिवाकर अचलेबरोबर पावलं टाकीत होता. कांहीं वेळ दोघंही कांहींच बोललीं नाहींत.

मग दिवाकरानं विचारलं '' रागावलां नाहींत ना ? ''

'' छे ! रागावते कशाला ? '' अचला म्हणाली. मग एकदम मान वर करून तिरप्या नजरेनं त्याच्याकडे बघत तिनं म्हटलं, '' इतके असाल असं वाटलं नव्हतं. ''

'' इतके म्हणजे ? इतके असभ्य ? कीं इतके लबाड ? कीं — ''

'' दोन्ही ! ''

'' माझ्याविषयीं तुमचा गैरसमज होऊं देऊं नका.मी स्वभावतः असभ्यही नाही आणि लबाडही नाहीं. ''

'' छे छे ! फार साळसूद आणि सभ्य— ''

'' चेष्टा नका करूं. स्वभावत मी अगदीं सरळ माणूस आहे. पण प्रेमात सांपडलं की लबाड्या कराव्याच लागतात. ही मोठी माणसं असतात ना. त्यांच्यासाठीं कपट करावंच लागतं. तुम्हीच सांगा काल तुमच्या घरात येण्याची युक्ति मीं केली नसती तर तुमची ओळख करून घेता आली असती कां मला ? आणखी आत्तां नंदूला धाडून तुम्हांला बाहेर काढण्याची युक्ति केली नसती तर तुमची माझी भेट झाली असती कां ? आतां रोज गांठभेट घेण्याचा एक राजरोस मार्ग आपल्याला खुला झाला— ''

'' अय्या ! '' असा उद्गार काढून साडीच्या पदराचा बोळा अचलेन तोंडांत घातला. कसल्या तरी नवीनच सुखाच्या आघातानं तिची छाति धडधडत होती. '' म्हणजे ? आपण असं रोज भेटायचं म्हणतां कीं काय ? ''

दिवाकरानं हसून विचारलं, '' कां ? तुम्हांला नाहीं आवडायचं ? ''

अचलेन मान वेळावून म्हटलं, '' मी नाहीं सांगत. ''

" बरं नका सांगूं. तुम्ही न सांगतांच मलां समजलंय. "

अचलेच्या मनांत येत होतं आपल्याला दिवाकर भेटणार आहे हें आधीं माहीत असतं तर जरा चांगली साडी नेसून नसतों कां आलों आपण ? आपण परीट घडीचं पोलकंही घातलं नाहीं, केसही नीट केले नाहींत, पावडर, लिपस्टिक कांहीं न लावतां आलों, ह्याची तीव्र जाणीव तिला झाली . . .

पण दिवाकर तिला म्हणाला " ही साडी किती शोभते तुम्हाला ! "



त्याच्या बोलण्याचं अचलेला एकदम हसूं आलं. ती म्हणाली " ही ? झालं ! अहो साधी डाकऱ्याची साडी आहे ही !—"

" पण तुम्हांला ती शोभते त्याला मी काय करूं ? " तितक्यांत कसली तरी आठवण झाल्याप्रमाणें चेहरा करून तो तिला म्हणाला, " एक खबरदारी मात्र घ्यायची बरं कां, मी तुम्हांला भेटलों असं मना एखादे वेळेस घरीं सांगेल. न सांगण्याबद्दल तिला बजावून ठेवा समजलं ना ? "

" हं. "

" उद्या चहाला बोलावूं कां त्याला ? "

" तुला वाटलं तर बोलाव. "

" मला वाटून काय उपयोग ? तुला वाटत असेल तर बोलावतों. तुझं कांहीं ठरलं कीं नाहीं ? "

तारानं वळून भावाकडे पाहिलं आणि अतिशय गंभीर व्रयेनं ती म्हणाली, " मीं गांवीं गेलें तेव्हां तूं हाच प्रश्न मला विचारला होतास. तेव्हां मी काय सांगितलं लक्षांत नाहीं कां तुझ्या ? वसंतरावाबद्दलचा प्रश्न कांहीं दिवस नकोच. त्याबद्दल विचारच नकोसा वाटतो मला ! "

" बरं तसं कां होईना. पण वसंतराव चहाला आला तर तुझी कांहीं हरकत नाहीं ना ? "

" हरकत कसली ? जेवायलासुद्धां येईना कां तो ? पण तो विषय मात्र काढायचा नाहीं. "

" बरं बरं. समजलं " असं बहिणीला म्हणतांना आबासाहेबांनीं हंसण्याचा प्रयत्न केला व ते निघून गेले.

अत्यंत अस्वस्थ झाल्याप्रमाणें लोटलेल्या दाराला पाठ लावून तारा उभी राहिली. तिनं आपल्या तोंडावरून दोन्ही हात चोळले व मग ती आंत गेली. मैना खेळण्यांत इतकी गुंग झाली होती कीं तिनं तिच्याकडे बघितलंही नाहीं. तारा कॉटवर पडून राहिली. पोलीस लोक दंडुक्यान गर्दी हटवितात त्याप्रमाणें मनाच्या विचारांची गर्दी हटवितां येईल तर बरं होईल असं तिला वाटलं...आपल्या आयुष्यात हा विचित्र पेचप्रसंग कशाला निर्माण झाला असं तिच्या मनांत आलं...तिचं एक मन म्हणालं, पेचप्रसंग निर्माण करणारी तूंच आहेस. तो नाहींसा करणं तुझ्याच हातांत आहे. दुसऱ्या मनानं प्रतिपादिलं, होय रे बाबा, सगळं कळतंय मला, पण वळत नाहीं त्याला मी काय करूं ?... वसंतरावाशीं पुनर्विवाह करणार होतीस तो करून टाक म्हणजे झालं... करावासं एकदां वाटलं होतं. पण आतां... आतां...

ताराचं लग्न झालं तेव्हां ती पुरती अठरा वर्षांची देखील नव्हती. तिला स्थळ फार चांगलं मिळालं होतं. आबासाहेबांनीं खूप खर्च करून लग्न लावून दिलं होतं. दक्षिण आफ्रिकेंत व्यापार करणाऱ्या मुलाला कशाला देतां बहीण असं आबासाहेबांच्या कांहीं मित्रांनीं म्हटलं होतं. परंतु मुलगा कर्तबगार, मोठ्या श्रीमंतीच्या वाटेला लागलेला, हौशी, असेना कां दूर देशांत राहाणारा, असा विचार आबासाहेबांनीं केला होता. तारा आपल्यापासून फार दूर जाईल, पण पैसेवाल्या नवऱ्याची बायको म्हणून सुखांत आणि मजेंत राहील यांची त्यांना खात्री वाटली होती. परंतु ज्याची कल्पनाही नव्हती असं विपरीत घडलं होतं. लग्नानंतर ताराचा नवरा महिनाभर हिंदुस्थानांत राहिला होता, परंतु ज्या दिवशीं ताराला घेऊन परत दक्षिण आफ्रिकेला जावयासाठीं तो निघणार होता त्याच्या आधीं चारच दिवस तो एकाएकीं छातींत कळ येऊन मरण पावला होता. आबासाहेबांना प्रचंड दुःख झालं होतं. तारा तर शोकानं भांबावून बधिरच झाली होती. "मीं समजुं तरि काय, भुले मन मी" असा आक्रोश करणाऱ्या 'शारदा' नाटकांतल्या शारदेला आपलं लग्न खरोखर झालं कीं झालं नाहीं, आपण कुमारी आहोंत कीं विधवा आहोंत तें कळेनासं झालं होतं, तशीच ताराची अवस्था झाली. आबासाहेबांना वाटलं आपली बहीण कांहीं या बेहोषींतून कधीं बाहेर येणार नाहीं...

पण काळाच्या ओघांत माणसाचं सुख झिजतं त्याप्रमाणें दुःखही झिरपतं ! विस्मरणाची माती सुखदुःखाचा किती ओलावा जिरवील त्याला खरोखर मर्यादा नाहीं ! ..तारा हळूहळूं दुःखाच्या कोशांतून बाहेर पडली. आतां सारा जन्म वैधव्यांत काढणं आपल्या नशिबांत आहे खरं असं मानून ती वागूं लागली ... पण तिनं जन्मभर विधवा रहावं हें आबासाहेबांना पसंत नव्हतं. त्यांनीं बेता-बेतानं तिचं मन वळविलं. वसंतराव बर्वे म्हणून त्यांचे एक स्नेही होते. त्यानीं ताराशीं लग्न करण्याची इच्छा दर्शविली. ताराही त्या गोष्टीला संमति देईल असं वाटूं लागलं होतं ... पण गेल्या

तीन महिन्यांत ताराचं मन पालटत चालल्याचा त्यांना संशय येऊं लागला होता. अशी कां ही बदलू लागली म्हणून ते मनाशीं आश्चर्य करीत. वसंतराव अधून मधून त्यांच्याकडे येत असे. ताराला एकटीला भेटत असे. पण वसंतरावाविषयीं तिला पूर्वींसारखं आकर्षण वाटेनासं झालं होतं, हें आबासाहेबांना दिसत होतं. तारा आपल्याशीं मनमोकळेपणानं बोलत नाहीं अशी शंका आबासाहेबांना येऊं लागली होती. तुझ्या मनांत काय तें मला एकदां सांग कीं अशा अर्थाच्या मुक्या नजरेनं ते तिच्याकडे कधीं कधीं बघत...

त्यांच्या त्या नजरेचा अर्थ ताराला कळत नसे असं थोडंच होतं ? भावाची ती नजर ती बघे आणि ती मनाशीं म्हणे, काय सांगूं तुला, जें माझ्या मनांत आहे तें तुला कळलं तर मला मूर्ख म्हणशील...

होय, आपण मूर्ख आहोंत हें ताराला स्वतःला कळत होतं. पण हातांभोंवतीं बेडी पडली कीं हात सोडवितां येऊं नये त्याप्रमाणें त्या मूर्खपणानं तिच्या अंतःकरणाभोंवतीं विळखा घातला होता... तीन महिन्यांपूर्वीच वसंतरावांनीं जरा अधिक आग्रह केला असता तर तिनं त्यांच्याशीं पुनर्विवाह केला असताही ! ... पण आतां नाहीं ! ... आतां नाहीं !

" मावशी, हा विदूषक आतां उड्या मारीत नाहीं बघ" असं म्हणत मैना कॉटजवळ आली, तेव्हां तारा आपल्या विचारांतून जागी झाली. तिनं आपले डोळे पुसले. तें पाहून मैनानं विचारलं, " डोळ्यांत बाऊ गेला होय तुझ्या ? " " होय रे राजा " असं म्हणून तारानं तिला जवळ घेतलं आणि तिचा विदूषक आपल्या हातीं घेत ती म्हणाली, " आपण याला पुन्हां उड्या मारायला लावूं हं. "

## : : ३ : :

मैना संध्याकाळीं निजली आणि रात्रीं साऱ्यांचीं जेवणं झाल्यावर उठली कीं तिला जेवूं घालणं म्हणजे मोठ कठीण काम असे. ती अर्धवट जागी असे, अर्धवट झोपेंत असल्याप्रमाणें पुन्हां पुन्हां रेंगू लागत असे. ताटलींत जें असेल तें तिला नको असे. बटाट्याची भाजी पाहिजे म्हणून हट्ट करी, किंवा ताजीं भजीं करून घाल म्हणून अडून बसे. " उद्यां करूं हं " असं सांगून अनुताईनीं घास तिच्या तोंडांत पुढें न्यावा, आणि तिनं " अं... " करून मान फिरवावी, किंवा तोंडावर हात गच्च धरावा. " नसलं जेवायचं तर नको जेवूंस जा " असं फुसफुसून अनुताईनीं हातांतला घास ताटलींत आपटावा, हट्टी मुलीचा चांगला एक गालगुच्चा घ्यावा अशा विचारानं शिवशिवणारीं बोटं आवरून धरावीं, आणि दूर व्हावं. पण जेवूं घातल्यावांचून मुलीला कशी ठेवायची असा विचार मनांत आला कीं त्यांनीं मुकाट्यानं चुलीच्या गॅसची चावी फिरवावी, लहानशा कढईंत चार भजीं तळून काढावींत, आणि " आतां तरी जेवणार ना ? " म्हणून घास मैनापुढें करावा.

अशा थाटांतच आज रात्रीं मैनाताईचं जेवण चाललं होतं. इतक्यांत बाहेरून कुणीशा हाका मारल्या, " डॉक्टर ! डॉक्टर आहेत कां ? " अनुताईनीं विचारलं " कोण आहे ? " "मी" असं उत्तर देतां देतां समोरच्या रामराव दाणींचा छोटा अमू पुढच्या खोलींत गेला. त्या खोलींत डॉक्टर त्याला दिसले नाहींत म्हणून तो आंत सैपाकघरांत आला. आल्याबरोबर त्यानं हातांतली छोटी काचेची कुपी तोंडाला लावली आणि मोठ्यांदा शिटी वजावली. अनुताईनीं त्याला विचारलं, " हें रे काय अमू ? " तो म्हणाला

नानांना, तारा मावशीला ती नेहमी प्रश्न करी, " मी मोठी झाल्यावर मला मोठी साडी आणायची?" " मी मोठी झालें म्हणजे तुमच्यासारखी सिगारेट ओढायची ? " " मोठं झाल्यावर मला लोकांचीं पत्रं येतील ? " नानांना पत्रं येतात व आपल्याला येत नाहींत यांत तिला फारच कमीपणा वाटे. मग कांहीं रंगीत कॅटलॉगांच्या घड्या आणि औषधी कंपन्यांकडून आलेलीं छापील पत्रं नाना तिला देत, व सांगत " हीं तुला आलेलीं पत्रं बरं काय. " रोजच्या टपालांत आपलं एक तरी पत्र आलेलं असावं अशी तिची इच्छा असे. नानांच्या हातीं टपाल देतांनाच एखादं कार्ड किंवा पाकिट काढून घेऊन ती विचारी "नाना हें माझं पत्र कीं नाहीं ?" ते त्या पत्राकडे नीट बघत व " हो " म्हणत किंवा तें काढून घेऊन दुसरं तिच्या हातांत देत सांगत " हें तुझं." आपल्याला आलेलीं पत्रं ती साठवून ठेवी. कांहीं दिवसांनीं त्यांचा तिला विसर पडला कीं तीं कुठें नाहींशी होत. पण तोंवर पत्रांचा दुसरा गठ्ठा ती सांठवूं लागलेली असे...

अशा अनेक उपायांनीं आपण मोठ्या झालोंच आहोंत असं स्वतःला आणि इतरांना ती भासवीत असे. तथापि मनांतल्या मनांत ती हें जाणून होती कीं हें कांहीं खरं मोठेपण नव्हे. खऱ्या मोठेपणासाठीं नानांएवढं, आईएवढं, तारामावशीएवढं, निदान आक्काएवढं तरी व्हायला हवं. तेवढं व्हायला कित्येक वर्षांचा अवकाश असावा याचं तिला वाईट वाटे. केव्हां एकदां आपण निदान आक्काएवढ्या तरी मोठ्या होतों अशी घाई तिच्या अंतर्यामीं होती... आणि या घाईप्रमाणेंच आपण मुलगा असायला हवं होतं ही इच्छा !...

तोंड बंद झालं असल्यामुळें किती चांगला दिसतोस रे असं अमूला ती म्हणूं शकली नाहीं. परंतु ती त्याच्याकडे अगदीं डोळे भरून बघत राहिली.

अनुताईही त्याच्याकडे बघत राहिल्या. आपलं मूल तेवढं देखणं, दुसऱ्याचं मूल देखणं असणं शक्यच नाहीं, अशी साऱ्याच आयांची

समजूत असते. " किती सुंदर दिसतो आहेस रे " असा उद्‌गार त्यांच्या तोंडून निघणं शक्यच नव्हतं. तथापि अमूचे कपडे विशेषच शोभिवंत होते एवढं त्यांनीं मनाशीं मान्य केलं, व अमूला विचारलं, " काय अमू, आज अगदीं थाट केला आहे ?"

अमूनं आर्धी बाटली फुंकून शिटी वाजविली आणि मग उत्तर दिल, " आमच्या घरीं आज मोठी गंमत आहे. "

" होय? काय आहे ?

काकासाहेब दाणींच्या घरांत आज रात्रीं मंत्रजागार होता. परंतु अमूला हा अवाढव्य संस्कृत शब्द अर्थासकट समजण्यासारखा नव्हता म्हणून काकासाहेबांनीं जें त्याला सांगितलं होतं तेंच त्यानं अनुताईना सांगितलं. तो म्हणाला " आमच्या घरी भटजींचं गाणं आहे. "

" म्हणजे काय रे ? "

" पुष्कळ भटजी आले आहेत, ते समोरासमोर रांगा करून बसले आहेत, आणखी एकमेकांवर ओरडून गायला लागले आहेत. आमच्या घरांत खूप पेढे आणले आहेत. . ."

मैना एकदम म्हणाली " अमू, मी येणार रे तुझ्याकडे."

तेवढ्यांत शेजारच्या खोलींत गजरे करीत बसलेली अचला जवळ आली होती. ती म्हणाली " न बोलावतांच जाणार तूं ! आगंतुक रे आगंतुक ! "

" तूंच आगंतुक ! तुझा नवरा आगंतुक ! " मैनानं बहिणी-वरचा राग काढला व मग आईला विचारलं " मी जाऊं ना ग ?"

अनुताई म्हणाल्या, " जा."

मग अमूला आठवण झाली व त्यानं विचारलं, " डॉक्टर कुठें आहेत ! काका म्हणाले त्यांना बोलावून आण. म्हणून मी आलों. कुठें आहेत डॉक्टर ? "

तो प्रश्न ऐकतांच अनुताईंची चर्या पालटली. त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या. त्यांनीं म्हटलं, " कुठें आहेत मला माहीत नाहीं बाबा. सांगून जाण्याची रीत कुठें आहे आमच्या घरांत ? " डॉक्टर

समोर फाटकांच्या घरांत गेले असले पाहिजेत हें त्यांना माहीत होतं, व त्याबद्दलच्या घुश्शांतच त्या होत्या.

अचलेनं अमूला सांगितलं "मला माहीत आहे. नाना समोर फाटकांकडे आहेत."

तें ऐकतांच अमू बाटलीची शिटी वाजवीत पळाला.

"हिला झगा बिगा घाल बाई" असं म्हणून अनुताईंनीं मैनाला अचलेकडे लोटलं, आणि तिला उचलून घेऊन अचला गेली तेव्हां त्यांनीं डोळ्यांना पदर लावला... बहुधा रोज रात्रींचं जेवण झाल्यावर डॉक्टर फाटककांडे जात असत, व ते गेले कीं नाहीं नाहीं ते विचार अनुताईंच्या मनांत येऊं लागत. त्यांना जी शंका वाटत होती तिचा कोणताच पुरावा त्यांना देतां आला नसता. पण तरीदेखील त्यांच्या मनांत शंका दृढ होत होती खरी. प्रत्यक्ष डोळ्यांना कांहींच दिसलं नव्हतं, परंतु त्यामुळेंच कल्पनाशक्ति वेगानं चालत असे. आबासाहेब घरांत असल्याखेरीज डॉक्टर समोरच्या ब्लॉकमध्यें सहसा जात नसत, आणि गेले तरी कांहीं घटकान् घटका बसत नसत. परंतु अनुताईंच्या मनांत येई माणसांनीं वावग्या गोष्टी करावयाचा ठरल्यावर त्यांना हजार मार्ग सापडतात... डॉक्टर जातात कीं न जातात या पाळतीवरच त्या असत. त्यांच्या जाण्याची चाहूल समजली व फटकांचं दार बंद झाल्याचा आवाज ऐकला कीं वाईट साईट दृश्यांचीं चित्रं त्यांच्या कल्पनाचक्षूंना दिसूं लागत... हें कसं सहन करूं असा उद्गार त्यांचं मन काढूं लागे...त्यांना रडूं आवरेनासं होई...

डॉक्टर अमूबरोबर आले व कोट घालण्यासाठीं खोलींत गेले. त्यांची चाहूल लागल्याबरोबर मैना ओरडली "नाना, मी येणार आहे बरं कां तुमच्याबरोबर..." अनुताईंनीं चटकन् डोळे पुसले आणि सैंपाकघराच्या मागच्या खिडकींत जाऊन त्या उभ्या राहिल्या. थोड्या वेळानं डॉक्टरांचा आवाज त्यांना ऐकूं आला, "समोर काकासाहेब दाणींच्या घरीं जाऊन येतों. मैनाला नेतों आहे हं." परंतु त्यांनीं हुं म्हटलं नाहीं कीं वळून पाहिलं नाहीं. मागच्या आंगणांत एक ड्रायव्हर मोटार धूत होता त्याकडे त्या बघत राहिल्या.

अमूच्या घरांत इतकी मजा असेल अशी मैनाची कल्पना नव्हती. घरभर विजेचे दिवे लागले होते. भटजींच्या दोन रांगा बसल्या होत्या. एकमेकांना मारण्यासाठीं उगारल्याप्रमाणें ते हात हालवीत होते आणि आळीपाळीनं ओरडत होते. मधल्या मोठ्या खोलींतलं सारं सामान बाहेरच्या आगाशींत रचलं होतं. काकासाहेबांनीं अमूला बजावलं होतं "लहान मुलांनीं आगाशींत बसायचं बरं काय? खोलींत यायचं नाहीं." तें लक्षांत ठेवून अमूनं मैनाला आगाशींत नेलं. तिथें घरांतल्या साऱ्या गाद्या रचल्या होत्या. त्यांवर मैनासकट चढून बसतां बसतां तो तिला म्हणाला, "आपण आगगाडी आगगाडी खेळूं या." बोगदा आला अशी त्यानं कल्पना केली आणि बोगद्यांत गाडी शिरली कीं सारख्या शिट्या वाजविते अशी त्याची कल्पना असल्यामुळें त्यानं बाटली मोठमोठ्यांदा वाजवायला प्रारंभ केला. काकासाहेब बाहेर धांवत आले व त्याला एक थप्पड देऊन म्हणाले, "अरे गडबड नाहीं करायची. गप्प बसायचं..." मग गाद्यांच्या भाराखालचा एक टिनचा डबा अमूनं काढला व तो उघडतां उघडतां तो म्हणाला, "आपण निम्मी निम्मी चित्रं वाटून घेऊन खेळूं या काय?"... धोतरांच्या आणि कापडांच्या ताग्यांवरचीं तऱ्हेतऱ्हेचीं रंगीत लेबलं तो दुकानांत जाऊन हळूंच काढून आणीत असे. त्याचा तो डबा असल्या लेबलांनीं गच्च भरला होता...

"हं चला मैनाताई घरीं" असं म्हणत नाना आगाशींत आलेले पाहतांच मैनानं तोंड वाईट केलं. वीरकरांचा नंदू, साठ्यांची मंदा, गणपुल्यांचा बाळ, अशी चांगली अर्धा पाऊण डझन मुलं एव्हांना आगाशींत गोळा झालीं होतीं, आणि त्यांचा एकमेकांतला खेळ अगदीं रंगांत आला होता. सगळ्यांना नुकतेच दोन दोन पेढे मिळाले होते, त्यांचा बोकणा भरूनच त्यांचीं बोलणीं चाललीं होतीं, आणि पेढ्यांबरोबरच गुलाबाचीं फुलंही मिळालीं, त्यांच्या पाकळ्या करून एकमेकांवर उधळण्याचा त्यांचा उद्योग चालला होता. परंतु रंगांत आलेल्या बाबा लोकांच्या त्या खेळावर वडील माणसांची

एकाएकीं टोळधाड पडली. सगळ्यांच्याच बापांनीं "चलो घर" घोषणा केली व आपापल्या पिलाचा ताबा घेतला. एकेक मूल हिरमुसलं तोंड करून आपापल्या पालनकर्त्याबरोबर निघालं. इतराप्रमाणेंच मैनाही निघाली...जिना उतरतां उतरतां डॉक्टरांनीं आपल्यांतला एक पेढा दिला तेव्हां मात्र खेळ टाकून यावं लागल्याच दुःख मैना विसरली व बापाशीं गोड गोड बोलूं लागली.

मधलं आंगण ओलांडून डी ब्लाकचा जिना चढायच्या वेळेस नानांनीं तिला उचलून कडेवर घेतलं तेव्हां ती अधिकच खुषींत आली. आपला बाप आपल्यावर फार ममता करतो याची तिला खात्री वाटली. एकदम आठवण झाल्याप्रमाणें ती डॉक्टरना म्हणाली. "नाना, तुम्ही सांगा ना आक्काला?"

"काय सांगूं?"

"ती उद्यां परत पुण्याला जाणार म्हणते—"

डॉक्टरना वाटलं आक्कानं जाऊं नये अशी मैनाची इच्छा असावी म्हणून तिची समजूत घालण्यासाठीं ते म्हणाले, "तिची सुटी संपली. मग जायला नको तिला पुण्याला?"

"पण तुम्ही सांगा ना तिला. ती माझं ऐकत नाहीं. नको म्हणते—"

अजूनही तिच्या बोलण्याचा बोध डॉक्टरना झाला नाहीं, म्हणून त्यांनीं विचारलं, "काय सांगूं?"

"मला बरोबर न्यायला सांगा. मी जाणार आक्काबरोबर."

"कुठें जाणार? पुण्याला?"

"हुं."

"हत्! वेडी कां काय तूं?"

"अं...मी जाणार."

"तूं कशी जाणार? पुण्याला राहशील कुठें तूं?"

"आक्काकडे राहीन."

"आक्का बोर्डिंगांत राहते."

"बोर्डिंगांत घर नसतं?"

मैनाच्या त्या प्रश्नाचं उत्तर देणं कठीण वाटून डॉक्टरनीं विचारलं, " जेवशील कुठें तूं ? "

" आक्काच्या ताटांत ! नाहीं तर माझी ताटली घेऊन जाईन कीं. "

" पण पुण्यास गेलीस कीं तिथें मी नाहीं आई नाहीं—— "

" तुम्हांला आणखी आईला घेऊन जाईन मी ! तारा-मावशीलासुद्धां ! "

" अरे बाप रे ! खूपच मोठा बेत आहे म्हणायचा. " डॉक्टर मोठ्यांदा हंसले.

त्यांची हनुवटी वळवून मैनानं पुन्हां पहिलं पालुपद म्हटलं, " तुम्ही सांगा ना आक्काला मला न्यायला ! मी जाणार ! जाऊं ना ? "

" बरं बरं जा " असं बापाचं आश्वासन ऐकल्याबराबरोबर मैनाला विलक्षण आनंद झाला.

घरांत ती डॉक्टरांच्या कडेवरून उतरली ती धांवतच आंत गेली. कॉटवर एक मासिक वाचीत पडलेल्या अचलेला ओढून ती म्हणाली, " नानांनीं तुला सागितलंय मला पुण्याला न्यायला. "

बाहेरच्या खोलींत डॉक्टर होते त्यांना तिनं ओरडून विचारलं, " हो कीं नाहीं हो नाना ? " नानांनीं बाहेरून ओरडून सांगितलं " होय होय. आक्का, मैनाताईला घेऊन जा हं तुझ्याबरोबर पुण्याला." मग अचलेला जास्तच जोरानं ओढून मैना म्हणाली " बघ. नाना सांगताहेत. मला न्यायला पाहिजे. ऊठ ! "

अचला हंसून म्हणाली " अग ऊठ म्हणजे काय ? आत्तां निघालें आहे कीं काय मी पुण्याला ? उद्यां जायचं बाबी. "

" पण माझं सगळं सामान ठेव कीं भरून तुझ्या बॅगेंत. नाहीं तर माझी निराळी बॅग घेऊं या काय ? " मैना एवढं विचारूनच राहिली नाहीं. बाजूच्या मोठ्या कपाटाखालची एक छोटी कातड्याची जुनी बॅग तिनं ओढून काढली, आणि ती उघडून पालथी करून त्यांतलं सारं सामान तिनं खळकन् ओतलंसुद्धां ! " माझं सारं

सामान घ्यायला ही छान आहे नाहीं ? "

" अग अग बया ! " म्हणत अचला कॉटवरून उठली. मैनाच्या हातांतली बॅग दूर करीत ती म्हणाली, " तुला मी पुण्याला नेणार ग. कबूल. पण बॅगेंत तुझं सामान भरायचं तें उद्यां भरूं. आतां तूं नीज पाहूं. निजलीस तरच मी नेईन. जागी राहून त्रास दिलास तर नाहीं न्यायची. "

या करारनाम्यावर मैनानं आनंदानं सही केली. अचलेनं तिला आपल्या कुशींत घेतल्याबरोबर तिनं डोळे मिटले.

परंतु दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर तिनं अचलेला प्रश्न केला " नेणार ना तूं मला पुण्याला ? आतां भरायची ना माझी बॅग ? "

आतां तिच्या समजुतीखातर तिची बॅग भरणं अचलेला भागच होतं. तिनं ती छोटी बॅग आपल्या सूटकेसपाशीं मांडली व मैनाला म्हटलं " हं, तुझं काय काय सामान घालायचं ? आण सारं."

मैनानं हातीं लागले तेवढे फ्रॉक चड्या तर आणल्याच, पण रंगीत चित्रांचीं बुकं, खेळणीं वगैरेंचाही ढीग अचलेपुढें ठेवला. अचलेनं विचारलं, " अब्ब ! इतकं सगळं न्यायचं कीं काय पुण्याला ? " " हो. सगळं न्यायचं " म्हणत मैना नाचूं लागली. अचलेची सूटकेस भरलेली पण उघडीच होती. त्यांतल्या कांहीं वस्तू आपल्या बॅगेंत असाव्यात अशी मैनाला इच्छा झाली. चांदीची एक डबी उचलून ती म्हणाली " ही माझ्या बॅगेंत असूं दे हं. तुला लागली कीं देईन मी. भांडायची नाहीं. "

तिच्या हातांतून डबी खसकन् हिसकावून घेऊन अचला चिडक्या स्वरांत म्हणाली " असा त्रास नको देऊंस बाई. तुझं सामान भरतें आहे ना मी तुझ्या बॅगेंत ? मग झालं तर. हें हवं तें हवं म्हणालीस तर नेणार नाहीं. "

त्या दहशतीचा परिणाम झाला. मैना स्वस्थ बसून राहिली. परंतु अचलेच्या कांहीं वस्तू आपल्या बॅगेंत घालण्याची तिची इच्छा नाहींशीं झाली नव्हती. ती तिनं मनांत ठेवली होती इतकंच.

अचलेच्या बॅगेंतल्या जिनसा ती न्याहाळून बघत होती. केव्हां तरी हळूंच त्यांतली हवी ती वस्तू काढून आपल्या बॅगेंत घालण्याचा बेत ती मनाशीं करीत होती.

सारं सामान छोटया बॅगेंत भरून झाल्यावर ती बंद करतां करतां अचला म्हणाली "झालं ना आतां? मला आंघोळीला जाऊं दे पाहूं." ती उठली, परकर, काचोळी, साडी तिनं दांडीवरून ओढून घेतली, आणि ती न्हाणीघरांत गेली. तिनं गरम पाण्याचा नळ पाण्यांत सोडला आणि घाईनं दार बंद केलं. केव्हां एकदां एकान्त मिळेल असं तिला झालं होतं...

अंगावरचीं वस्त्रं काढून ती खालच्या गुळगुळीत फरशीवर बसली. स्वतःचं उघडं अंग तिनं निरखून पाहिलं. "दिवाकर!" असा उद्‌गार तिच्या तोंडून बाहेर पडला. तिनं दोन्ही हातांनीं आपलं तोंड झांकून घेतलं तिला हुंदके आवरेनात... पुण्यास परत जाण्याचा दिवस अखेर येऊन ठेपला होता. जाणं तिला भागच होतं.

पुण्याचं कॉलेज सोडून मुंबईच्या एखाद्या कॉलेजांत नांव घालतें असं नानांजवळ म्हणण्याची कल्पना तिच्या मनांत दोन चार वेळां येऊन गेली होती. परंतु ती कल्पना नानांना पटविणं कठीण होतं हेंही तिला माहीत होतं. पुण्याच्या कॉलेजांतले अमके प्रोफेसर वाईट आहेत म्हणण्याची सोय नव्हती. नानांच्या प्रोफेसरांत ओळखी होत्या. पुण्याची हवा मानवत नाहीं अशी सबबही चालण्यासारखी नव्हती. गेलीं चार वर्षं ती पुण्यास होती, व मुंबईपेक्षां पुण्याची हवा तिला मानवते आहे हें पुरतं सिद्ध झालं होतं. पुण्यास परत जाणं तिला चुकवतां येण्यासारखं नव्हतं. एरवीं ती नेहमींप्रमाणेंच आनंदानं परत गेली असती. परंतु आतां तिचं मन पुण्यांत नव्हतं. दिवाकराच्या सहवासापुढें तिला कशांतच गोडी उरली नव्हती... त्याची चोरून भेट घेतल्यावांचून तिचा एकही दिवस आतांशा गेला नव्हता. एकेका भेटीनंतर त्याच्या सहवासाची तिची भूक कमी होण्याऐवजीं वाढत गेली होती...

अगदीं पहिल्यांदा संध्याकाळीं तो तिच्याबरोबर पार्कात गेला त्या दिवशीं घरीं परत जातांना तिचं अंतःकरण एका नव्याच आनंदानं भरलं होतं, पण ती पुष्कळशी भ्यालीही होती. आपल्या रहस्याचा स्फोट मैना घरीं करील कीं काय या भीतीनं तर ती अस्वस्थ झाली होतीच, परंतु शिवाय तिला वाटत होतं, रोजच्या रोज दिवाकरची भेट घेण्याचं कपट आणि साहस आपल्याला नाहीं साधायचं. ज्या वाटेनं उघड उघड जातां येत नाहीं ती वाट नकोच आपल्याला. पण प्रेमाची भावना माणसाच्या मनांत उचंबळून आली कीं वाकड्या वाटेनंही गेल्यावांचून राहवत नाहीं, आधीं जें साहस वाटलं तें संवयीनं वाटेनासं होतं, याचा अनुभव अचलेला आला...ती रोज दिवाकराला भेटत राहिली. मुलांना पार्कात घेऊन जाण्याच्या निमित्ताची एक दोन दिवसांनंतर गरजच संपली. दिवाकरानं तिची वाट बघत कुठें थांबायचं तें एकदां ठरल्यानंतर संध्याकाळीं फिरायला म्हणून ती एकटीच बाहेर पडूं लागली... कांहीं कारणानं घरांतून निसटायला उशीर झाला कीं रस्त्यांतून घाईघाईनं पावलं टाकतांना तिला वाटे धावूं कीं पळूं, वाट बघून बघून दिवाकर गेला असला म्हणजे ? पण चंद्रनिवासपासून दूरच्या बसच्या टप्प्यावर दिवाकर उभा राहिलेला तिला दिसे. ती त्याच्या जवळ गेली कीं हळूंच म्हणे "फार वाट पाहिलीस ? रागावलास ?" तो हंसून म्हणे, " पहिल्या प्रश्नाचं उत्तर होय आणि दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर नाहीं." सदा कसं याचं बोलणं गोडच असं तिच्या मनांत येई. ती विचारी "कध्दीं कध्दीं रागवणार नाहींस माझ्यावर ?" तो म्हणे " राग कशाशीं खातात बुवा ?" ती पुन्हां हंसे व त्याच्याजवळ उभी राही. त्याच्याबरोबर आपल्याला कुणी बघेल कीं काय या भीतीनं तिचं अंतःकरण धडधडत असे. बस आली कीं ती चटकन् चढून आंत शिरे, व वरच्या मजल्यावर जाई. दिवाकर तिच्या मागोमाग येई. एका बाकावर एकत्र बसल्यावर आणि बस जोरानें सुरूं झाल्यावर तिला वाटे, सुटलें, आतां नाहीं कसली भीति. तिचं तें वाटणं वेडेपणाचंच होतं. बसमध्यें माणसं नसत कीं काय ? किंवा ज्या दूरच्या जागीं तीं दोघं जाऊन बसत तिथें तरी

माणसं नसत कीं काय ? परंतु बस धांवूं लागली कीं तिला सुरक्षितपणा वाटे खरा. मग ती दिवाकराला आपला हात धरूं देत असे, बोलतांना त्यानं तोंड कितीही जवळ आणलं तरी नको म्हणत नसे, एखाद्या आनंदी पाखराप्रमाणें ती स्वत: बडबड करूं लागत असे.

' हँगिंग गार्डन ' मधील हिरवळीवर किंवा समुद्रकांठच्या वाळूंत त्यांतल्या त्यांत गर्दीपासून दूर अशा बाजूच्या एकान्त ठिकाणीं त्याच्याबरोबर बोलत बसल्यावर अचलेला वेळेचं भान रहात नसे. स्वतः फारसं बोलण्याऐवजीं त्याचंच बोलणं ऐकत राहवं असं तिला वाटे. परंतु ती फार वेळ गप्प राहिली कीं तो म्हणे " गप्प कां राहिलीस ? बोलत कां नाहींस ? " ती विचारी " काय बोलूं ? " तो म्हणे, " तुमच्या घरीं आज दुपारीं भाजी कसली केली होती तें सांग. म्हणे काय बोलूं ? " त्याच्या बोलण्याचं तिला हंसूं येई, आणि मग ती बोलूं लागे. मात्र पुस्तकांचा विषय निघाला कीं त्याच्या तोंडाला थोडी खीळ पडल्यासारखं होई, "वाचनाची मला फारशी आवड नाहीं" म्हणून तो सरळ कबुली देत असे. एकदां समुद्राच्या पाण्याच्या सीमारेषेच्या आसपास सूर्यास्ताच्या वेळचे रंग उधळल्याखे पसरले होते, त्यांकडे पाहतां पाहतां अचलेला एका कवितेची आठवण झाली तिचे पहिले दोन चरण म्हणून दाखवून तिनं दिवाकरला विचारलं, "माहीत आहे का तुला ही कविता !" तो हंसला. "मला ! एकदेखील कविता मीं कधीं पाठ केलेली नाहीं. अगदीं शाळेंत असल्यापासून काव्याकडे पाठ केलेली आहे मीं."

" पण बोलतो आहेस एखाद्या कवीसारखंच कीं. "

" तूं बसली आहेस ना समोर ? तुझा गुण ! "

"अरे वा वा !" तिनं मान वेळावली, आणि हातांत गोळा केलेल्या वाळूंतला एक बारीकसा खडा त्याच्या अंगावर फेकून मारला.

तो म्हणाला, " तुझा गुण म्हणतों तें कांहीं खोटं नाहीं. शाळेंत मास्तर कविता वाचून दाखवूं लागले कीं मी कानांत खुंट्या घालून बसत असे व वर्गाच्या खिडकींतून समोरच्या छपरावरचीं कबूतरं पहात असे. पण आतां तूं कविता म्हणून दाखविलीस ती मला

विलक्षण आवडली. पुढच्या ओळी म्हणून दाखव."

मान हालवून ती म्हणाली, "नको. 'अरसिकेषु कवित्व निवेदनम्—' माहीत आहे ना? आमची कविता कांहीं वर आली नाहीं बरं कां?"

"असं काय? म्हणून दाखव ना." म्हणून त्यानं तिचा हात धरून दाबला. मग तिनं सबंद कविता म्हणून दाखविली.

परंतु एकंदरींत काव्याची आवड त्याला कमीच होती, आणि कादंबऱ्या वाचण्याचाही त्याला फारसा षोक नव्हता. त्याचं बहुतेक बोलणं 'हा बिझिनेस करायचा, तो बिझिनेस करायचा' या वळणाचं असे. श्रीमंत होण्याचीं त्याचीं स्वप्नं होतीं...त्याबद्दलचं त्याचं बोलणं ऐकतां ऐकतां अचलेला वेळेचं भान रहात नसे. परंतु आजूबाजूस दिवे लागल्याचं लक्षांत आल्याबरोबर ती चमकून म्हणे "आतां जाऊं या." तो म्हणे "जाऊं या? बरं" तो उठून चालू लागे. चालतां चालतां तो म्हणे. "तुला घेऊन तासन् तास बसावंसं वाटतं. परंतु तुला घरीं वेळेवर जायला हवं हेंही मी लक्षांत ठेवायला हवं."

त्याचा समजूतदारपणा तिला आवडे. आसपास कुणीही नाहीं अशा ठिकाणीं बसून बोलतांना त्याच्या डोळ्यांत कशाबद्दलची अधीरता चमकत असे तें तिला ओळखतां येत होतं. त्याची ती नजर पाहिली कीं तिलाही कसली तरी ओढ वाटे. ती आपल्या मनाला विचारी 'ही कशाची ओढ? कशाची ओढ?...' तिला समजत नसे, परंतु अंतर्यामींच्या उत्कंठतेची धार तिला घायाळ करी. दिवाकराची किंचित् भीति तिला वाटे. परंतु त्यानं एकान्ताचा वावगा फायदा कधीं घेतला नाहीं...अचलेच्या मनांत येई, त्याला वाईट कशासाठीं म्हणायचं? याच्याबद्दल नानांचं मत चांगलं नाहीं. पण त्यांचं तें वाईट मत केवळ ऐकीव माहितीवर आधारलेलं. तें कसं चुकीचं आहे तें मी त्यांना खचित पटवून देईन. दिवाकर वाईट नाहीं. चांगला आहे. त्यानं एखादे वेळेस तिला जवळ ओढली असती, तिचा मुका घेतला असता तरीदेखील तिनं त्याला वाईट ठरविलं नसतं. तो तसं कांहीं करीत नसे. हा तिला त्याचा चांगुलपणा वाटे.

परंतु क्वचित् एखादे वेळेस त्यानं तसं कांहीं करावं अशी इच्छा तिच्या मनांत स्फुरत असे. तिला एकदम लाजल्यासारखं होई आणि ती गप्प राही...

पुण्यास परत जाण्याचा दिवस जवळ आला तेव्हां ताटातुटीच्या अपेक्षेची छाया त्या दोघांच्या बोलण्यावर पडूं लागली. दिवाकरानं म्हणावं " चार दिवसांनीं जाणार तूं. " तिनं म्हणावं, " तीनच दिवस उरले. " तिहींचे दोन झाले, दोहोंचा एक झाला...काल संध्याकाळची त्यांची भेट जितकी सुखाची तितकीच दुःखाची होती. वरचेवर पुण्यास येऊन तिला भेटण्याचं वचन दिवाकर तिला पुन्हां पुन्हां देत होता. " आठ पंधरा दिवस पुण्यास येऊन राहणं–देखील सहज शक्य होईल मला " असं त्यानं तिला वरचेवर सांगितलं. " ही आपली शेवटची भेट म्हणजे इथली मुंबईतली शेवटची. डोळे पूस बघूं. " परंतु अचलेच्या मनाचं दुःख कांहीं संपेना. ती पुनः पुन्हां म्हणत होती, " पण तूं रोज कसा दिसशील मला? या सुखाची ही चटक कशाला लावलीस मला? " त्याचा एक फोटो तिनं त्याच्याकडून मागून घेतला होता. तो फोटो आणि रोज गाठ भेट होत असूनही एखादे दिवशीं ती जशी त्याला पत्र देई तशीच त्यानंही तिला दिलीं होतीं. तीं पत्रं त्यानं तिला भेट म्हणून दिलेल्या एका सुंदर मऊ कातड्याच्या छोट्या बॅगेंत घालून ठिवलीं होतीं. ती बॅग ती आपल्याबरोबर नेणार होती. आपल्या सूटकेसमधें तिनं ती घालून ठेवली होती, परंतु ती म्हणत होती " नुसतं तुझ्या फोटोकडे पाहून आणि पत्रं पुन्हां पुन्हां वाचून कितीसं समाधान होणार माझं? तुझ्या प्रत्यक्ष भेटीवाचूनचा एकेक दिवस मला नकोसा होईल. "

" फार दिवस वाट पाह्यला लावणार नाहीं तुला. "

" लवकर येशील? "

" येईन! येईन. "

" माझ्या गळ्याची शपथ घे. " तिनं त्याचा हात उचलून आपल्या गळ्याकडे नेला होता.

आणि मग मात्र दिवाकरानं सारा संयम टाकून दिला होता.

त्या वेळचा त्याचा स्पर्श–तिच्या अंगावर फिरणारीं त्याचीं बोटं व तोंडावर टेकलेले त्याचे ओठ यांचा स्पर्श–आतां न्हाणी घरांत उघड्या अंगानं बसलेल्या अचलेला इतक्या तीव्रतेनं आठवला कीं काल संध्याकाळीं तिच्या सर्वांगावर जसे सुखाचे रोमांच उभे राहिले होते तसेच ते आतां पुन्हां उभे राहिले. त्या वेळच्यासारखीच बेहोषी तिनं पुन्हां अनुभविली. आपली स्वतःचीं बोटं म्हणजे दिवाकराचींच बोटं आहेत अशी कल्पना करून तिनं तीं आपल्या उघड्या अंगावर दाबून धरलीं. " दिवाकर ! दिवाकर ! " असा उद्गार काढतांना तिनं डोळे मिटले.

तिला स्टेशनवर पोचविण्यासाठीं निघण्याच्या अगोदर टॉफीचा मोठा डबा आणण्यासाठीं म्हणून नानांनीं मैनाची सारजाबरोबर बाजारांत रवानगी केली. मैना परत आल्यावर आक्का गेली असं कळलं कीं ती मोठ्यांदा भोकाड काढील हें त्यांना माहीत होतं. पण जाण्याच्या वेळेस दंगा नको असा त्यांनीं हिशोब केला. सारजानं मैनाला दुकानांत नेऊन डबा तर घेऊन दिलाच, पण शिवाय सुतारमामांनीं फर्निचरचं एक लहानसं दुकान नव्यानं थाटलं होतं तेंही बघायला नेलं. तिथें मैनाला जुना दोस्त सदू भेटला, त्याच्या बरोबर मनसोक्त खेळण्यांत तिनं दोन घटका घालविल्या, त्यामुळें ती घरीं परत आली तेव्हां इतक्या खुषींत होती कीं आक्काबरोबर आपण पुण्यास जाणार होतों याची आठवणही तिला राहिली नाहीं. आक्का गेली कीं न गेली याची चौकशीदेखील तिनं केली नाहीं. सदूनं लाकडाची एक छोटी रंगीत होडी तिला बक्षिस दिली होती ती दाखवितांना ती अनुताईपुढें नाचली, व तिनं विचारलं, " मावशीला दाखवायची होडी ? मी जाऊं तिच्याकडे ? " तो प्रश्न अनुताईना आवडण्यासारखा नव्हता. पण त्यांनीं नको जाऊं असंही म्हटलं नाहीं. आईच्या परवानगीची वाट पाहण्याची मैनाची रीत नव्हतीच. तिनं हातांतली होडी नाचवीत मावशीकडे धूम ठोकली.

अचलेला निरोप दिल्यावर डॉक्टर घरीं येणार नव्हते, कुठेंसे जाणार होते व तेथून परस्पर दवाखान्याकडे जाणार होते. अचला गेल्यामुळें घर रिकामं भासत होतं. सारजा रजा मागून गेली होती. अनुताई एकट्या घरांत राहिल्या होत्या. आता - । त्यांची वृत्ति अशी चमत्कारिक झाली होती कीं त्यांच्या मनावर चटकन उदासपणा येई. या खोलींत त्या खोलींत अशा त्या कांहीं वेळ उगाचच फिरल्या. मग त्यांनीं विचार केला मैनासाठीं नवा फ्रॉक शिवायचा आहे तो तरी शिवावा. त्यांनीं कापड काढलं, शिवण्याच्या मशीनवरचं ढापण उचललं, आणि मापासाठीं मैनाचा फिट होणारा जुना फ्रॉक त्या शोधूं लागल्या. शोधाशोध करून सांपडेना, तेव्हां मैनानं आपले सगळे कपडे छोट्या बॅगेंत अचलेकडून घालून घेतले होते ही गोष्ट त्यांना आठवली. मोठ्या कपाटाखालीं ती बॅग त्यांना दिसली. अचलेनं किंवा सारजानं ती सरकवून ठेवली असावी. त्यांनीं ती पुढें ओढून घेतली आणि तिच्यांतला घड्या त्या उसकडून पाहूं लागल्या...

कपड्यांच्या मधोमध ठेवलेली मऊ मऊ कातड्याची एक छोटीशी सुंदर बॅग दिसल्याबरोबर त्यांना आश्चर्य वाटलं 'हें काय?' म्हणत त्यांनीं ती उचलून हातांत घेतली. मैनाला ही वस्तु कोणी दिली त्यांना कळेना. तारामावशीकडच्या त्या वस्तू उचलून ती घरीं आणीत असे याची त्यांना आठवण झाली. त्यांनीं आपला खालचा ओठ दातांनीं चावला. त्या ती बॅग रागानं परत आपटणारच होत्या. परंतु त्यांना वाटलं, बॅगेंत काय आहे तें बघावं तरी. बॅगेच्या तोंडाचा सरकफास त्यांनीं ओढला, आणि बॅग पालथी केली. आंतल्या वस्तू बाहेर पडल्या. त्या पाहतांक्षणींच अनुताई विलक्षण चपापल्या.

एक छोटासा फोटो आणि पांच सहा पत्रं होतीं तीं!

फोटो दिवाकरचा होता!

प्रत्येक पत्रावर अचलेचं नांव अगदीं कोरीव अक्षरांत लिहिलेलं होतं! सारीं पत्रं शक्य तितका कमी भाग कात्रीनं काळजीपूर्वक कापून उघडलेलीं होतीं!

डाव्या हातांतली बॅग आणखी एकदां पालथी धरून अनुताईंनीं

जोरानी हालविली तेव्हां आणखी एक पत्र व तरुम रेशमी रुमालांच्या तीन घड्या खालीं पडल्या !

त्या साऱ्या वस्तूंकडे अनुताई अत्यंत आश्चर्यानं बघतच राहिल्या. ‘ हें काय मी पाहतें.’ असं त्यांच्या मनांत येत होतं. नको त्या वस्तू दृष्टिसमोर असं त्यांना वाटत होतं, परंतु त्यांची नजर वळत नव्हती. दृष्टि खिळवून ठेवण्याचं कांहीं चमत्कारिक सामर्थ्य अशुभांत असतं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं.

एखादा चावणारा किडा दिसला कीं एकीकडे मनांतून भिणाऱ्या लहान मुलाला त्याला बोटांनीं डिंवचल्यावाचून राहवत नाहीं, त्याप्रमाणें दिवाकरचा तो फोटो, पत्रांचीं तीं पाकिटं, ते सुन्दर हातरुमाल पाहतांच अनुताईंच्या मनांत भय आणि तिरस्कार उत्पन्न झाला होता, नजरेलासुद्धां त्या वस्तूंचा स्पर्श नको असं त्यांना वाटत होतं, परंतु तो फोटो आणि एकेक पाकिट त्या हातांत उचलून घेत होत्या, पाकिटांतलीं पत्रं काढून वाचण्याच्या इच्छेशीं त्या झटापट करीत होत्या. तीं प्रेमपत्रं असलीं पाहिजेत हें उघड होतं. केवळ अचलेसाठीं दिवाकरानं तीं लिहिलीं होती. त्यानं तीं लिहायला नको होतीं असं आपल्याला कितीही वाटत असलं, तीं पत्रं म्हणजे दिवाकरच्या वाईटपणाचा व अचलेच्या मूर्ख भोळेपणाचा पुरावाच हातीं पडला असं वाटत असलं, तरी त्यांच्या खासगीपणाचा—म्हणजेच एक प्रकारच्या पावित्र्याचा—मान आपण राखला पाहिजे असं अनुताईंच्या मनांत क्षणभर आल्यावाचून राहिलं नाहीं. अनुताईंचा डॉक्टरांशीं विवाह झाला तो प्रीतिविवाह नव्हता. मुलगी दाखवली, पसंत पडली, लग्न झालं, एवढीच त्यांच्या लग्नाची कहाणी होती त्यांचा संसार इतर चारचौघांच्या संसाराप्रमाणें सुखाचा आणि यशस्वी झाला होता. मुलंबाळं, पैसा, इत्यादि सुखांनीं घर भरलं होतं. परंतु ऐन तारुण्यांतही डॉक्टरांनीं त्यांना कधीं प्रेमपत्रं लिहिलीं नव्हतीं. त्यांचं बायकोवर प्रेम नव्हतं असं नाहीं. ते परगांवाला कधीं जात नसत असंही नाहीं. परंतु विरहव्यथेनं व्याकूळ झालेल्या प्रेमिकाप्रमाणें डॉक्टरांनीं त्यांना कधीं पत्रं पाठविलीं नव्हतीं. “सुखरूप

येऊन पोहोंचलों. प्रवास ठीक झाला. माझी प्रकृति बरी आहे. दोन दिवसांत इथलीं कामं आटपून परत येतों" अशा साध्याच मजकुराचीं त्यांचीं पत्रं नेहमीं असत. डॉक्टरांच्या प्रेमाबद्दल त्यांना खात्री होती. परंतु त्या प्रेमाचं प्रदर्शन पत्रांत झालेलं दिसलं पाहिजे असं त्यांना कधीं वाटलं नव्हतं. पत्रांतल्या सहीच्या शिरोभागीं ते 'तुझा' असं लिहीत, तेवढ्यांत अनुताईंना पूर्ण समाधान वाटे तथापि त्यांनीं व डॉक्टरांनीं एकमेकाला प्रेमपत्रं लिहिलीं नव्हतीं तरी तीं कशीं असतात त्याची अनुताईंना कल्पना होती. दिवाकरानं अचलेला लिहिलेल्या त्या प्रेमपत्रात तरी जगावेगळं असं काय लिहिलेलं असणार?... कशाला वाचायचीं तीं पत्रं? ..

सारांश, तीं पत्रं उघडून वाचलीं तर आपल्या मनाला फार यातना होतील हें अनुताईंना कळत होतं, आणि त्यांतला मजकूरही त्यांना कल्पनेनं ओळखतां येत होता...परंतु तरीदेखील, जणुं त्यांना नकळत, त्यांच्या बोटांनीं एका पाकिटांतला कागद काढला व उघडला आणि त्यांचे डोळे मजकुरावरून फिरूं लागले.

"प्रिय अचले,

मी सध्या इतक्या विलक्षण आनंदांत आहे कीं अंतराळांतून ढगांच्या पायघड्यांवरून चालल्यागत मला वाटतं आहे. जो तो मला विचारतो आहे, लेका, इतक्या खुषींत कशामुळें? माझं रहस्य मी त्यांना कसं सांगूं? माझ्या आनंदाचं कारण तूं आहेस. तुझं प्रेम आहे. तुझं प्रेम मला मिळालं या विचाराच्या मिजाशींत मी आहे. पण हें मी कुणाला सांगूं शकत नाहीं. आणि जो तो आश्चर्य करतो आहे, या वेड्याला झालंय तरी काय इतकं हंसायला खिदळायला? भांग बिंग तर चढली नाहीं? माझं मलासुद्धां कधीं कधीं वाटतं कीं इतका कसला आनंद झाला आहे मला? कारण माझ्यावरचं प्रेम तूं मला सांगितलं आहेस, रोज संध्याकाळीं दोन घटका तुझी माझी भेट होते, यापलीकडे मला काय मिळालं आहे? दोन तास माझ्याजवळ असतेस, पण बावीस तास दूर

घरांत लपलेली असतेस. आगाशींत आलीस आणि दृष्टीस पडलीस तरी हंसतेस अन् घरांत पळतेस. वीज क्षणमात्र चमकावी आणि ढगांत लपावी त्याप्रमाणें ! तुझ्यावांचून काढाव्या लागणाऱ्या घटका किती दुःखाच्या आणि जड वाटतात तें काय सांगू तुला? जे मला आनंदांत पाहतात त्यांनीं या वेळेस मला बघायला हवं म्हणजे मी खरोखर किती दुःखांत आहे तें त्यांना कळेल. तुझ्यावाचून कांहीं सुचत नाहीं. कशांत गोडी वाटत नाहीं. केव्हां एकदां रात्र संपेल, दिवसाचे प्रहर उलटतील, आणि संध्याकाळची तुझ्या भेटीची घटका येईल, असं जिवाला वाटत असतं...आनंदाच्या आणि दुःखाच्या या विचित्र सरमिसळीला काय म्हणायचं ! प्रेम प्रेम म्हणतात तें हेंच काय? हें तीव्र दुःख आणि हें गोड सुख–प्रेमाचेच हे दोन्ही परिणाम ? प्रेम बसलं कीं अशी चमत्कारिक अवस्था वाटयाला येते याची मला कल्पना नव्हती. पूर्वीं कधीं कुणावर मीं प्रेम केलं नव्हतं. 'लव्ह अॅट फर्स्ट साइट' या शब्दांची मी कुचेष्टा करीत असे. परंतु त्या शब्दांचा खरेपणा तूं मला पटाविलास. ज्या वेळेस तुला मीं प्रथम पाहिलं त्या वेळेस–त्या क्षणींच मी तुझा झालों. त्या वेळेस किती सुंदर दिसलीस तूं ! तुझ्या कडेवर मैना होती. उन्हांत तुझं गोरं अंग शोभत होतं. तुझे केस चमकत होते आणि वाऱ्यानं उडत होते. आणि अगदीं गोड गोड हंसू तुझ्या तोंडावर होतं. तुझ्याकडे पाहून मला वाटलं मी जागा आहे कीं स्वप्नांत आहे!..."

अनुताईंनीं कागदाची घडी करून पाकिटांत परत घातली. त्यांनीं दुसऱ्या पाकिटांतला कागद काढून वाचला, मग तिसऱ्या, मग चवथ्या. सगळ्या पत्रांत एकाच साच्याचा मजकूर होता. कांहीं पत्रांत फार सलगीचे शब्द होते, अनुताईंना चहाटळपणाच्या वाटण्यासारख्या गोष्टी होत्या, एका पत्राची सुरवात 'लाडके अचले' अशा मायन्यानं केली होती, आणि दोन तीन पत्रांवर 'डार्लिंग' असा मायना होता...

एखादं जप्त झालेलं राजद्रोही मजकुराचं पुस्तक चोरून वाचीत असल्याप्रमाणें त्या साऱ्या पत्रांवरून घाईघाईनं नजर फिरवितांना अनुताईंची छाति धडधडत होती. जें वाचूं नये तें आपण वाचीत आहोंत ही जाणीव त्यांना मनावेगळी करतां येत नव्हती. आणि त्या जरी आतां चाळीशीच्या जवळपास होत्या, प्रेम म्हणजे कांहीं तरी मूर्खपणाची आणि निषिद्ध गोष्ट आहे असं जरी त्या समजत होत्या, तरी दिवाकराची तीं पत्रं वाचतां वाचतां त्यांना कांहीं एक विचित्र समाधान झालंच, त्यांच्या मनांतल्या कुठल्या तरी सुप्त वासना चाळवल्यासारखं झालंच, हें काय भलतंच सुख आपल्याला होत आहे अशा भयानं त्या धसकल्यासुद्धां ! त्यानीं तीं पत्रं दूर केलीं . . .




मग त्या फोटोच्या आणि त्या पत्रांच्या रूपानं केवढं संकट आपल्यावर येत आहे त्याची जाणीव त्यांना झाली. त्यांची लाडकी अचला प्रेमांत सांपडली होती ! आणि कुणाच्या, तर दिवाकरासारख्या एका उडाणटप्पूच्या ! वीरकरांच्या मुलाच्या ! एका नाटक्याच्या बदमाष मुलाच्या ! अचला असं कांहीं करील अशी

अनुताईची कल्पना नव्हती ! तिचं आणि दिवाकराचं प्रेम पुष्कळच पुढें गेलेलं असलं पाहिजे. लबाड दिवाकराच्या जाळयांत ती चांगलीच सापडली असली पाहिजे. तिला वेळींच सावध केली नाहीं तर ती आपल्या जन्माचा घात करून घेणार खचित ! तिला वाचविली पाहिजे. नाहीं तर माझी मुलगी वाया जाणार ! हातची जाणार !

नवीन जखम झाली कीं जुनीही ठुसठुसूं लागते. अनुताईच्या मनांत आलं, यांनीं तर आतांशा माझी विटंबना चालविली आहेच. हे तर तारा मावशीच्या नादीं लागले आहेतच ! माझ्या हातचे गेल्यासारखे आहेतच ! त्याच्या भरीला माझी अचलाही हातची जाणार कीं काय ?... डॉक्टरांचं तारा मावशीवर प्रेम आहे ही अनुताईची केवळ कल्पना होती. त्याच्या संशयाला प्रत्यक्ष कोणत्याच गोष्टीचा आधार नव्हता. पण तरीदेखील त्यांचा तो संशय दिवसेंदिवस दृढच होत होता. त्या संशयानंच त्या डॉक्टरांशीं वागत होत्या. आपलं सुख आपल्या हातांनीं कमी करून घेत होत्या... आणि अचला भलत्याच्या प्रेमांत सांपडल्याचा तर प्रत्यक्ष पुरावाच त्यांच्या पुढें होता. हें संकट निव्वळ त्यांच्या कल्पनेंतलं नव्हतं. अगदीं स्पष्ट आकारांत त्यांच्या पुढें उभं होतं. नवरा दूर चालला ! मुलगी दूर चालली ! जो संसार सुखानं भरलेला वाटत होता त्यावर हे दोन जबरदस्त आघात झाल्यावर संसारांत मग उरणार काय ? कुणाकडे पाहून सुख मानायचं ? कोणत्या सुखाच्या अभिमानानं मान ताठ ठेवायची ? नवऱ्यानं अव्हेरिलेली बायको, लेकीनं अवमानिलेली आई, अशी अवस्था म्हणजे केवढी विटंबना ! चारचौघांत तोंड दाखविण्याची सोय उरणार नव्हती !...

छे. छे ! अचलेला सावध केलीच पाहिजे. नवऱ्याचं प्रेम आपल्यावरून उडालं तर त्याला कांहीं इलाज आपण करूं शकत नाहीं. नवऱ्याशीं आपण झगडूं शकत नाहीं. त्यांनींच लाजलज्जा सोडली असली तर ती त्यांना आपण शिकवूं शकत नाहीं. तें संकट आपण टाळूं शकत नाहीं. पण हें संकट !... अगदीं झोप उडविणाऱ्या या संकटाची चाहूल लागल्यानंतर स्वस्थ झोपून

उपयोगी नाहीं. कांहीं तरी इलाज केलाच पाहिजे . . . हे घरीं आले कीं हा फोटो, हीं पत्रं, हा रुमाल त्यांना दाखविले पाहिजेत . . .

या अखेरच्या विचारापाशीं येतांच अनुताई जराशा अडखळल्या. त्यांच्या मनांत आलं, यांना विश्वासांत घ्यायचं ? ज्यांनीं माझा विश्वासघात चालविला आहे त्यांना ? यांना कांहींच न सांगतां मला एकटीला कांहीं नाहीं कां करतां येणार ? हे स्वतःच जर प्रेमाचे खेळ खेळत असतील तर लेकीबद्दलची फिर्याद यांच्यापुढें ठेवण्यांत काय अर्थ आहे ? चांगलं पंचेचाळीसावं वर्ष लागलेलं असतांना जर हे स्वत: एका तरण्या ताठ्या विधवेच्या प्रेमांत सापडले असतील तर अचलेच्या वागण्यांत यांना काय वावगं दिसणार ? ती तर बोलून चालून ज्या वयांत माणूस प्रेमानं वेडं होतं त्या वयांतली होती. तिला कठोर बोलण्याचा अगर शासन करण्याचा नैतिक अधिकार तिच्या बापाला होता कुठें ? " तुम्ही नाहीं कां प्रेमांत पडलांत ? " असं अचलेनं खाडकन् विचारलं तर तिच्या वडिलांना कोणतं उत्तर देतां येणार होतं ? जळक्यानं मळक्याला स्वच्छता शिकविण्यापैकींच तो प्रकार होणार होता . . .

हे सारे विचार फार कडू आणि तापदायक होते. ते करतां करतां अनुताईंना फार शीण झाला, आणि हळुहळू त्या रडूं लागल्या. फार मोठी विटंबना आपल्या वाट्याला आली असं तर त्यांना वाटलंच, पण या अवस्थेंत आपल्याला कुणाची सोबत नसावी याचं त्यांना मनस्वी दुःख झालं. विलक्षण एकटेपणा त्यांना वाटला. त्यांनीं भांबावून इकडे तिकडे पाह्यलं. साऱ्या खोल्या रिकाम्या होत्या. दिवस संपला होता. अंधार पडूं लागला होता. आपली सारी माणसं आपल्याला सोडून गेलीं ! घरांतला उजेड गेला ! आपण एकट्या— अगदीं एकट्या राहिलों! अशा विचारानं भेदरून जाऊन अनुताईंनीं दोन्ही हातांनीं आपलं तोंड झाकलं. त्यांना वाटलं खूप मोठ्यांदा रडावं. नवऱ्याला हांक माराव्या. अचलेला हांका माराव्या. परंतु तशा हांका मारण्याऐवजीं त्यांनीं फक्त शेजारच्या कॉटच्या कडेवर डोकं ठेकलं आणि त्या हुंदके देऊं लागल्या. . .

## : : ४ : :

मैना एखाद्या दिवशीं उजाडलं न उजाडलं तोंच अंथरुणांत उठून बसे, आपल्याला उचलून घ्यायला कुणी जवळ आहे कीं नाहीं तें पहात असे, कुणी दिसलं नाहीं तर सैंपाकघरातुन कुणाचा आवाज ऐकूं येतो म्हणून कानोसा घेत असे, आणि मग "नाना!" अशी रडक्या स्वरांतली हाक मारून पलंगावरून खालीं उतरून फिस्कारलेले केस हातांनीं मागें लोटीत अर्धवट झोपेंतच असल्या-प्रमाणें वाकडीं तिकडीं पावलं टाकीत चालूं लागत असे. परंतु कधीं कधीं डॉक्टर दवाखान्यांत गेले, घरांतल्या एकंदर दिनक्रमाचा पहिला अंक समाप्त होऊन गेला, अंगावर चांगलीं उन्हं आलीं तरी मैनाची झोप संपत नसे. किती हांका मारल्या तरी ती डोळे उघडीत नसे. अशा वेळेस तिला बळजबरीनं उठविण्याची सोय नसे. मन मानेल तितका वेळ अंथरुणांत लोळत राहण्याचा आपला जन्मसिद्ध हक्क आहे आणि त्या हक्कावर आतिक्रमण झाल्यास कितीहि निषेध केला तरी तो क्षम्य आहे अशा दुहेरी खात्रीनं किती उंच पट्टींत ती रडणं सुरूं करील आणि मग तें किती वेळ चालूं राहील त्याचा नियम नसे. ती कितीहि उशिरापर्यंत झोपत राहिली तरी तिला राहूं द्यावी असा घरांत संकेतच ठरला होता.

परंतु आज घड्याळांत नवाचे ठोके पडले तेव्हां सारजाच्यानं राहवेना. गेल्या अर्ध्या तासांत तिनं दोन वेळां अनूताईंना विचारलं होतं, "मैनाताईंना उठवूं काय?" अनुताईंच्या उत्तराचा तिला दोन्ही वेळां कांहींच बोध झाला नव्हता. त्यांनीं उठवही म्हटलं नव्हतं, नको म्हणूनहि सांगितलं नव्हतं. स्वतःशींच कांहीं तरी पुटपुटल्या होत्या त्या. फार फार घुश्शांत असल्याप्रमाणें, कुणावर तरी रागावल्या असल्या-प्रमाणें, पण ज्याच्यावर राग त्याच्यावर काढतां येत नसल्याप्रमाणें, वड्याचं

तेल वांग्यावर काढायला बिचारी मोलकरीण बरी सदा उपयोगी पडते याचा अनुभव आतांशा डॉक्टरांच्या घरांत सारजाला वारंवार येत असे. ती मनाशीं म्हणे, " पूर्वीं नव्हत्या वहिनी अशा चिडक्या. आतांशा काय झालंय त्यांना देव जाणे ! " अनुताईंचं स्वतःशींच धुसफुसणं फुसफुसणं सारजाला नवीन वाटण्यासारखं नव्हतं; पण आज अनुताईंची तब्येत जरा विशेष गरम झाल्यासारखी तिला वाटली.

ती नित्याप्रमाणें कामाला आली आणि न्हाणीघराकडे गेली तों न्हाणीचं दार उघडून बाहेर येणाऱ्या अचलेला तिची जवळ जवळ धडकच बसली ! " आत्तां ! " म्हणून ती मागं सरकली आणि अचलेला पुरतं पाहिलंसं करून तिनं विचारलं " आक्का, तुम्ही केव्हां आलां पुण्याहून ? वर्दी बिर्दी न देतां एकदमच आलां ? " तिच्या प्रश्नांत आश्चर्य होतं. परंतु त्यापेक्षां जास्त आनंद होता. ती अगदीं मनापासून हंसत होती. पण अचला हंसली नाहीं. ती सारजापुढें धड उभीदेखील राहिली नाहीं. टॉवेलनं तोंड पुशीत ती झटकन निघून गेली. सारजा मनांतल्या मनांत जरा गोंधळली. सदा हंसणाऱ्या नेहमींच्या अचलेहून निराळीच अचला आपल्या नजरेला पडल्यासारखं तिला वाटलं... नंतर तिनं पाहिलं तों मायलेकी नेहमींप्रमाणें हंसत खेळत बोलत बसलेल्या तिला दिसल्या नाहींत. चहा घेणं झालं कीं टेबलापाशींच डॉक्टर बसायचे, अचलेशीं त्यांच्या गप्पा चालू राह्यच्या, तसंही आज कांहीं झालं नाहीं. सारजा सैंपाकघरांत गेली तों डॉक्टर उठून गेले होते, अचलादेखील पलीकडच्या खोलींत जाऊन बसली होती, आणि अनुताई मागच्या खिडकीशीं जाऊन पाठमोऱ्या उभ्या होत्या. कांहीं चमत्कारिक वातावरण घरांत पसरल्यासारखं सारजाला वाटलं.

कपबशा आवरतां आवरतां तिनं अनुताईंनीं विचारलं, " आक्का आल्या आहेत वाटतं ? " अनुताईंनीं तोंड वळवून म्हटलं. " हो हो ! आल्या आहेत तुझ्या आक्का ! " तुझ्या आक्का ! हे शब्द सारजाला चमत्कारिक वाटले पण ते मनावर न घेतां तिनं विचारलं, " कालिजाला पुन्हां सुटी लागली जणुं ? " अनुताई

आणखीच फणकाऱ्यानं म्हणाल्या, " विचार तिलाच. एकदम सकाळीं आली आहे खरी ! " असं म्हणत अनुताईंनीं कपाटांतलं एक भांड काढलं तें त्यांच्या हातांतून पडलं आणि फरशीवर खण्णदिशी वाजलं. अनुताईंनीं त्रासाचा उद्गार काढला व सारजाकडे पाहून त्या म्हणाल्या " तिकडे खोलींत बसल्या आहेत तुमच्या आक्का ! विचारा जाऊन वाटलं तर कॉलेज कायमचं सोडून आलां आहांत काय ? " सारजानं मनांतल्या मनांत ओळखलं कीं हवा कशानं तरी विशेष तापलेली आहे. तिनं मुकाट्यानं टेबलावरचीं भांडीं उचललीं आणि ती मोरी-कडे गेली. जातां जातां तिनं खोलींत डोकावून पाह्यलं तों अचला आरशापुढें उभं राहून केंसांतून कंगवा फिरवीत होती...

त्यामुळें " मैनाला उठवूं काय ? " या प्रश्नाचं होय नको असं उत्तर न देतां अनुताईंनीं चरफडल्यासारखी पुटपुट आणि भांड्यांची आदळआपट केली तेव्हां सारजाला विशेष आश्चर्य वाटलं. वास्त-विक अचला घरीं आली कीं घर कसं आनंदानं भरून जायचं. परंतु आज आनंदाऐवजीं कांहीं निराळंच वातावरण निर्माण झालं होतं. जणूं अचलेचं घरीं येणं जसं अपेक्षित नव्हतं तसंच कुणाला पसंतही नव्हतं. या चमत्काराचं कारण सारजाला तर्कानं ओळखतां येईना. मनाची मिजास बिनसल्याप्रमाणें घरांतलीं माणसं वागूं लागलीं कीं सारजेसारख्या नोकर माणसांना कसं वागावं तें समजेनासं होतं. सारजा नित्याचं एकेक काम आटपीत होती, परंतु एखाद्या चोरट्या-सारखी वावरत होती....

नवाचे ठोके पडले तेव्हां तिनं मनाशीं ठरविलं कीं अनुताईंना पुन्हां विचारण्याचं कांहीं कारण नाहीं. मैनाताईंना झोपेंतून उठवावं आतां. कुणीच झोपमोड केलेली मैनाला आवडत नसे. त्यांतून सारजेनं तो गुन्हा केला तर मग कांहीं विचारायलाच नको. सारजा मैनाची आवडती होती. शाळेंतून घरीं येतांना ती तिला तांबड्या चिंचा देत असे, फिरायला जातांना सुतारमामांच्या दुकानांत नेत असे व सदूबरोबर वाटेल तितका वेळ खेळूं देत असे, अशा कांहीं गोष्टीबद्दल सारजावर तिची मर्जी होती. परंतु इंग्लंडच्या हवेप्रमाणें

ती मर्जी केव्हां फिरेल आणि "सारजिटली खापिटली" म्हणून ती रागावून केव्हां रडूं लागेल त्याचा अदमास करतां येत नसे. घरांतलीं नोकरमाणसं म्हणजे ज्यांच्यावर रागावलं व ज्यांना अपशब्द बोललं तरी चालतं अशीं माणसं असा सिद्धान्त मैनासारख्या लहान मुलांच्या मनांत कुणी न शिकवितां आपोआप निर्माण झालेला असतो...पण घड्याळांत नवाचे ठोके पडले, मैना बारा वाजेपर्यंत अंथरुणांत निजून राहिली तरी आज तिची कुणाला आठवण होणार नाहीं अशीं लक्षणं दिसूं लागलीं, तेव्हां सारजानं विचार केला, आपणच उठवावं मुलीला, सैपाकघरांत घेऊन जावं, ओव्हलटाइन पिणार कां म्हणून विचारावं. मैनाला अंथरुणांतून ओढली तर ती पिसाळेल हें सारजा ओळखून होती. ती भीत भीतच कॉटवर वांकली आणि मैनाच्या कपाळावर रुळणारे जाड काळेभोर केस हलक्या हातानं मागं करीत ती म्हणाली, " उठा ना मैनाताई आतां. किती निजणार ? ऊन्हं किती आलीं बघा तरी ! " " अं... " असं म्हणून मैनानं पाय झाडल. सारजा म्हणाली " उठा उठा ! " मैनानं डोळे उघडले. सारजाकडे पाहिलं. ती आतां भोकाड वासणार आणि सारजिटली म्हणणार असं वाटल्याबरोबर सारजा तिला म्हणाली " आपल्या आक्का आल्या आहेत ! " जणुं एखादा जादूमंत्राचा शब्द कानीं पडल्याप्रमाणें मैनाची चर्या पालटली. भोकाड वासण्याऐवजीं ती एकदम उठून बसली, आणि सारजानं उचलून घ्यावं म्हणून हात पसरून तिनं विचारलं, " आक्का आली आहे ! कुठें आहे ? आक्का ! ए आक्का ग !" सारजानं तिला उचलून कॉटखालीं ठेवली. आरशापुढें केस विंचरीत उभी राहिलेली अचला दिसल्याबरोबर मैना तिच्याकडे धांवत गेली, आणि तिच्या कमरेला एकदम विळखा घालीत तिनं विचारलं " केव्हां आलीस ग तूं ? मला काय आणलं आहेस ? "

तिचा तो दुसरा प्रश्न ऐकल्यावर अचलेला फार शरम वाटली. तिनं तिच्यासाठीं कांहीं आणलं नव्हतं ! कोठून आणणार ? काल रात्रीच्या गाडीनं ती पुण्याहून निघाली तेव्हां तिचं मन ठिकाणावर

होतं कुठें ? अगदीं एकाएकीं तिनं बेत केला होता. आणि आपण हा जरासा अविचारच करीत आहोंत असं वाटत असूनही ती खुशाल निघून आली होती !...जवळ जवळ पंधरा दिवसांत दिवाकराचं तिला एकदेखील पत्र आलं नव्हतं. आठ दहा दिवस पुण्यांत येऊन राहणंसुद्धां मला सहज शक्य होईल असं दिवाकरानं तिला सांगितलं होतं. परंतु तो आला तर नव्हताच. पण दोन चार पत्रांनंतर त्याचीं पत्रसुद्धां बंद झालीं होतीं. तिच्या पत्राचं उत्तरदेखील त्यानं धाडलं नव्हतं. काय झालंय तिला कळेना. त्याच्या पत्राची वाट किती पाह्यची तिला समजेना. शेवटीं ती संदिग्ध अवस्था तिला असह्य झाली होती, आणि मुंबईस निघून येण्याचं तिनं ठरविलं होतं. आपण घरीं जाणार तेव्हां मैनासाठीं कांहीं तरी नेलं पाहिजे याची आठवण राहण्याइतकी ती पुण्याहून निघतांना शुद्धीवर होती कुठें ?...तिनं खोटंच उत्तर दिलं, " तुझ्यासाठीं गंमत आणली आहे तर ! "

मैनानं विचारलं, " काय आणलं आहेस ? आगगाडी ? "

" अंहं ! "

" मग ? मोटार ? "

" अंहं ! "

" मग बाहुली आणली असशील. "

" नाहीं रे राजा ! अगदीं निराळीच गंमत आणली आहे. जरा वेळानं दाखवीन हं तुला " असं म्हणत अचलेनं तिला उचलून घेतलं... ज्या तिच्या गालांना अजूनही झोपेचा वास येत होता त्यांचे भराभरा मुके घेतांना तिला एकदम रडूं आलं... तिच्या मनांत आलं, आईबापांनीं केलेलं थंड स्वागत कुणीकडे, आणि या मुग्ध बालिकेचं अगदीं लाघट वागणं कुणीकडे !...नानांना आणि आईला कसला तरी संशय आलेला आहे हें त्यांच्या वागण्यावरून तिनं केव्हांच ओळखलं होतं. पण पांच वर्षांच्या या मुलीला कसलाही संशय नव्हता. या कोवळ्या भाबड्या अंतःकरणांत प्रेमावाचून दुसरं कांहीं नव्हतं. बहीण भेटल्याचा आनंद ! बस ! एवढी एकच भावना ! तिनं मैनाला अगदीं गच्च गच्च हृदयाशीं धरलं

आणि तिचे आणखी मुके घेतले !...

सकाळीं तिनं दारावरच्या घंटेचं बटन दाबलं, व दार उघडा-वयास आलेल्या अनुताईनीं तिला पाहतांच विचारलं, " हें काय?" तेव्हां त्यांच्या चर्येवर तिला आश्चर्याबरोबर आनंद दिसला नव्हता. रुसवा दिसला होता. भेटतांक्षणींच वास्तविक जिचा मायेचा हात गळयांत पडायचा आणि जिच्या नजरेंत समाधानाची चमक दिसायची त्या आईच्या " हें काय ? " अशा प्रश्नांत नापसंति होती, दूरत्व होतं. तें पाहून अचलेला दुःख झालं होतं. मात्र ती चकित झाली नव्हती. आपण एकाएकीं घरीं जात आहोंत खऱ्या, परंतु या खेपेस आपल्या वाऱ्याला नेहमींच्या प्रेमळ स्वागताऐवजीं निराळंच कांहीं तरी येईल हें ती ओळखून होती. तरी ती आली होती. येण्यावाचून तिला गत्यंतरच उरलं नव्हतं. दिवाकरानं तिच्यावर हा चमत्कारिक प्रसंग आणला होता.

सुटी संपल्यानंतर पुण्याच्या वसतिगृहांत ती परत गेली तेव्हांपासून तिच्या सुखाला आणि आनंदाला दृष्ट लागली होती. भरति येऊन गेल्यानंतर समुद्राच्या पाण्याला ओहोट लागावी त्याप्रमाणें तिचं सुख ओसरूं लागलं होतं. दिवाकरापासून आपण दूर जाणार या कल्पनेचं न्यून सोडून दिलं तर मुंबईहून ती पुण्यास जावयास निघाली तेव्हां ती भलत्या आनंदांत होती. प्रेमाच्या पहिल्या अनुभवाचा उन्माद तिच्या रोमरोमांवर चढला होता. उन्हांत डोलणाऱ्या फुलाभोवतीं फिरणाऱ्या रंगीबेरंगी पांखरांप्रमाणें प्रेमाच्या पूर्णतेच्या नाना कल्पना तिच्या मनांत थरथरत होत्या. परोपरीचीं स्वप्नं ती पहात होती. तिच्या नजरेंतला कौमार्यातील मुग्धपणा संपला होता. धुंद नजरेनं ती जगाकडे बघत होती. जिकडे तिकडे सुखाचीं आणि आनंदाचीं इंद्रधनुष्यं पसरलेलीं तिला दिसत होतीं. ती पुण्यास परत गेली होती ती अभ्यासांत जोरानं लक्ष घालण्यासाठीं नव्हे तर दिवाकराची वाट पाहण्यासाठीं. त्याच्या गाठीभेटी घेण्यासाठीं. त्याला पत्रं लिहिण्यासाठीं. जेव्हां तो दूर असेल तेव्हां त्याचा फोटो न्याहाळीत बसण्यासाठीं.... पण वसतिगृहांतल्या आपल्या खोलींत

ती दाखल झाली, तिनं दाराला कडी लावली, आपली सूटकेस उघडली त्याबरोबर ती एकदम चपापली होती !

ज्या मऊ मऊ कातड्याच्या छोट्या बॅगमध्यें दिवाकराचा फोटो आणि पत्रं होतीं ती बॅग सूटकेसमध्यें नव्हती ! कपड्यांच्या घड्यामधें तिनं तर ती खुणेनं ठेवली होती, परंतु त्या ठिकाणीं ती नव्हती ! " म्हणजे काय ! " असा उद्गार काढून तिनं सूटकेसमधलं सारं सामान बाहेर काढलं. परंतु कातड्याची ती छोटी बॅग तिला सापडली नाहीं !

तिला त्या गोष्टीचा मोठा चमत्कार वाटला. ती छोटी बॅग सूटकेसमध्यें नव्हती, मग ती झाली काय ? गेली कुठें ! प्रवासांत आपण केव्हां केव्हां सूटकेस उघडली तें तिनं पुन्हां पुन्हां आठवून पाहिलं. घरून निघतांना आपण केव्हां केव्हां सूटकेसची उघडझांक केली त्याच्या आठवणी करून पाहिल्या. हरवलेल्या वस्तूची आठवण करून पाहणाऱ्या माणसाला ती वस्तु नजरेपुढें अगदीं स्पष्ट दिसूं लागते. अचलेला ती छोटी बॅग अगदीं स्पष्ट दिसत होती, परंतु ती कुठें राहिली याचा मात्र मुळींदेखील तर्क तिला करतां येत नव्हता. आगगाडीच्या डब्यांत ती राहिली नव्हती. घरून निघतांना ती तिनं विसरून कुठें तरी ठेवली असली पाहिजे . . .

अचलेल्या मनांत आलं बॅग घरांत राहिली असेल तर ती आईच्या दृष्टीस पडणार खचित. आणि दृष्टीस पडली तर बॅगेंतला फोटो आणि पत्रं आई पाहणार खचित. आपलं सारं गौप्य फुटणार ! आई आपल्याला जाब विचारणार. तिनं विचारलं कीं आपण काय सांगणार ? . . .

सुनावणीच्या त्या प्रसंगाच्या नुसत्या कल्पनेनंच अचला स्वतःशीं घाबरली. " हें काय ग अचले ? " म्हणून आईनं प्रश्न केला कीं आपल्याला भीतीनं आणि शरमेनं मान खालीं घालून उभं राहवं लागेल, कांहीं बोलतां येणार नाहीं याची तिला खात्री वाटली. गुन्हेगाराची भूमिका आपल्याला पत्करावी लागेल असं तिच्या मनांत आलं. तो प्रसंग फार दूर होता. परंतु त्याला केव्हां तरी

तोंड द्यावं लागणार या नुसत्या विचारानंच अचलेचे हातपाय गळले...

परंतु तिच्या मनाची ही अवस्था फार वेळ टिकली नाहीं. तरुण मनाला प्रेम जसे कपटाचे नवे धडे देतं तसाच धीटपणाही शिकवितं. अचलेला वाटलं, आईनं कधीं कांहीं विचारलंच तर भीतीनं गांगरून जाण्यांत अर्थ नाहीं. "होय, माझं प्रेम दिवाकरावर बसलेलं आहे" असं सरळ सांगून टाकावं हें चांगलं. आई कदाचित् बॅगेंतला फोटो आणि पत्रं नानांना दाखवील. कदाचित् आईऐवजीं नाना आपल्याला विचारतील "हें काय?" म्हणून. त्यांनीं विचारलं तर त्यांनाही खरा प्रकार सांगून टाकावा हें बरं... या विचारानं अचलेचं मन पुष्कळ स्वस्थ झालं होतं. आपल्या हातून बॅग चुकून घरांत राहिली कशी या कोड्याचा तिला कांहीं केल्या उलगडा होत नव्हता. परंतु ती बॅग आईच्या दृष्टीस पडली कीं त्यांतून कांहीं तरी भयंकर संकट निर्माण होणार असं जें पहिल्या धक्क्याला तिला वाटलं होतं तें तिला वाटेनासं झालं... प्रसंग आलाच तर आपण डगमगणार नाहीं असा आत्मविश्वास तिला वाटला...शिवाय तिनं विचार केला, तो प्रसंग कांहीं नाजिक येऊन ठेपलेला नव्हता. ती इतक्यांत थोडीच घरीं परत जाणार होती ? कॉलेजची ही नवी टर्म संपायला अजून चांगला तीन महिन्यांचा अवकाश होता. त्यानंतर जाणार होती ती घरीं परत. तोंपर्यंत पुष्कळ धीटपणा तिच्या अंगीं येणार होता. या तीन महिन्यांच्या अवधींत दिवाकराच्या गांठीभेटीचं सुख तिला मनसोक्त मिळणार होतं. त्या सुखाखेरीज इतर विचार हवेत कशाला ?...

असं ठरवून अचलेनं आपलं सामान खोलींत लावायला आरंभ केला. घरीं विसरलेल्या कातडी बॅगेचा विषय तिनं मनावेगळा केला होता. तीन महिने कांहीं आपल्याला घरीं जावं लागत नाहीं याबद्दल तिची खात्री होती. मधेंच कधीं घरीं जाण्याची पाळी आपल्यावर येईल अशी मुळींदेखील शंका तिला नव्हती...

पण तो प्रसंग तिच्यावर आला होता. दिवाकरानं आणला होता. कांहीं तरी गंभीर कारण असल्यावांचून दिवाकर पत्रं लिहिनासा होणार नाहीं याबद्दल तिची खात्री होती. त्याच्यावरचा तिचा विश्वास अजून ढळला नव्हता. झालं आहे तरी काय तें पाहवं म्हणून ती मुंबईस निघून आली. घरीं आपलं नेहमींप्रमाणें स्वागत होणार नाहीं हें ती ओळखून होती. पण तरीदेखील दारांत भेट होतांच "हें काय?" असा उद्गार काढतांना तिच्या आईच्या चर्येवर जो भाव तिला दिसला तो पाहून तिला दुःख व्हायचं तें झालंच. नंतरही अनुताई नेहमींप्रमाणें तिच्याशीं बोलल्या बसल्या नाहींत. त्यांनीं तिच्यापुढें चहाचा पेला ठेवला तोदेखील हॉटेलांतला माणूस गिऱ्हाईकापुढें ठेवतो तशा आविर्भावानंच. त्या स्वतःचा कप हातांत घेऊन खिडकीपाशीं गेल्या आणि पाठमोऱ्या उभ्या राहून पिऊं लागल्या. अचलेच्या मनांत आलं, टेबलावरचा चहा दूर लोटावा आणि उठून जावं. पण तिनं विचार केला होता, असल्या अतिरेकी वागण्यांत शहाणपणा नाहीं. थोडी कळ सोसावी हें बरं. भांडण व्हायचं असेल तेव्हां होईल. केव्हां तरी होणार हें उघड दिसत होतं. परंतु मुद्दाम आमंत्रण देऊन तें जवळ ओढण्यांत अर्थ नव्हता...ती अगदीं शांतपणानं चहा प्याली, मग हळूंच आगाशींत गेली, समोरच्या वीरकरांच्या ब्लॉककडे तिनं चोरट्या नजरेनं पाहून घेतलं. कदाचित् दिवाकर दिसेल अशा आशेनं. पण तो तर तिला दिसला नाहींच, पण वीरकरांच्या घरांत अजून उठा-ऊठही झालेली नसावी असं तिला वाटलं. ती परत मधल्या खोलींत आली आणि आरशापुढें उभं राहून केस विंचरूं लागली. मनांतल्या मनांत तिला दुःखाचे कढ येत होते. तिला वाटत होतं, इतक्या कठोरपणानं आई माझ्याशीं वागूं शकते कशी? मी तिला एकदम नकोशी झालें? केवळ एका तरुणाच्या प्रेमांत मी सापडलें म्हणून? प्रेम करणं हा एवढा मोठा अपराध आहे?...ती एकीकडे केस विंचरीत होती. दुसरीकडे मनांतला हुंदका मनांत दाबीत होती...

आतां मैनाला उराशीं घट्ट धरून तिचे मुके घेतांना तिच्या

तोंडातून हुंदका फुटला. परंतु तो दुःखाचा नव्हता. आईच्या चमत्कारिक वागण्यानं झालेल्या जखमेचा उद्रेक त्या हुंदक्यांत नव्हता. मुग्ध प्रेमाच्या स्पर्शानं अंगभर उठलेल्या सुखाच्या लहरी त्या हुंदक्यांत होत्या. मैनाचे लुसलुशीत हात तिनं आपल्या गळ्या-भोंवतीं आणखी लपेटून घेतले. तिच्या मनांत आलं, आईला आणि नानांना मी कितीही नकोशी झालें असलें तरी या प्रेमळ बालिकेला तर मी हवी आहे. आक्का अशी हिची प्रेमाची हाक तर कायम आहे...

मैना म्हणाली, "माझ्यासाठीं काय आणलं आहेस तें दे ना मला."

आतां मात्र खरी गोष्ट सांगून टाकल्यावाचून सुटका नव्हती. अचला म्हणाली, "मीं तुला कांहीं आणलेलं नाहीं रे राजा. पण आतां बाहेर जाऊं, आणखी दुकानांत जाऊन तुला जी गंमत आवडेल ती विकत घेऊं हं. काय घ्यायचं ? तूंच सांग."

"मला कंदीलवाला हवा."

"हरकत नाहीं. कंदीलवाला ?"

"हं नंदूनं आणलाय तसला. बटन दाबलं कीं कंदील लागतो. कंदीलाखालीं एक बुवा उभा आहे. त्याच्या शेजारी एक कुत्रं आहे. आपण जाऊं या नंदूकडे ? चल, मी नेतें तुला अन् दाखवतें—"

मैनाची ती सूचना ऐकतांच अचला चपापली. खरं म्हणजे वीरकरांच्या घरीं जावंसं तिला वाटत होतं. दिवाकर भेटला तर त्याच्याशीं तिला बोलायचं होतं. वीरकरांच्या घरीं जाण्यासाठीं मैना तिला आयत निमित्त देत होती... परंतु त्या निमित्ताचा फायदा ती घेऊं शकत नव्हती. तिच्या आणि दिवाकराच्या प्रेमाचं रहस्य गुप्त राहिलेलं असतं तर मैनाला घेऊन वीरकरांच्या घरीं तिला जातां आलं असतं. परंतु तिचं रहस्य तिच्या आईला कळलेलं होतं. बहुधा नानांनासुद्धां. आतां वीरकरांकडे ती मैनासाठीं म्हणून जाण्याचं नाटक करूं शकत नव्हती. गेली तर त्याचा निराळा अर्थ

होणार होता. . . जाण्याची तिची फार फार इच्छा होती, पण ती जाऊं शकत नव्हती. मैना ' चल ' म्हणत असूनही !

ती मैनाला म्हणाली, " नको. नंदूचा कंदिलवाला कशाला बघायला हवा? दुकानांत दिसेलच कीं आपल्याला. नंदूपेक्षांही चांगला कंदिलवाला घेऊं आपण."

" नंदूपेक्षांही चांगला ? "

" हो हो. त्याच्यापेक्षां चांगला."

तें ऐकून मैनाला इतका आनंद झाला कीं तोंड धुणं, ओव्हल-टाइन पिणं, झगा घालणं, केस विंचरून घेणं इत्यादि साऱ्या गोष्टी तिनं बिनबोभाट केल्या. तिची तयारी करीत असतांना अचला अनुताईकडे मधून मधून पहात होती, आणि जणुं आपल्याला कांहीं दिसत नाहीं ऐकू येत नाहीं अशा प्रकारें त्या सैंपाकघरांत वावरत होत्या या गोष्टीचं मनाशीं आश्चर्य करीत होती. आश्चर्याप्रमाणेंच तिला रागही आला होता. तूं माझ्याशीं एका शब्दानं बोलत नाहींस तर मीदेखील बोलणार नाहीं असं ती मनाशीं म्हणत होती. मैनाला घेऊन बाहेर निघतांनादेखील ती ' जातें ' म्हणून आईला सांगणार नव्हती.

परंतु सारी तयारी झाल्यावर अचला जेव्हां मैनाला म्हणाली " चला " तेव्हां मैनानं उंच आवाजांत अनुताईंना सांगितलं " आम्ही कंदीलवाला आणायला जाणार."

अनुताई पाठमोऱ्या उभ्या होत्या त्या वळल्या नाहींत, पण मोठ्यांदा म्हणाल्या, " कांहीं नाहीं जायचं कंदीलवाला आणायला."

मैनानं कपाळाला आठ्या घातल्या, मारण्यासाठीं हात उगारला, आणि ती म्हणाली " अं . . . जाणार आम्ही ! "

" जाणार म्हणजे काय ? नाहीं जायचं."

हात आणखीच उंच करून आणि चिडका रडका आवाज काढून मैना म्हणाली " आम्ही जाणार ! अं..."

" जा तर खरी. पायाला डाग देईन कीं नाहीं बघ. तुमच्या आक्कासाहेबांना म्हणावं तुम्हांला एकट्यांना जायचं असलं कुठें त

खुशाल जा. कोऽऽणी आडवीत नाहीं तुम्हांला !"

"अं . . . मी जाणार आक्काबरोबर" असं म्हणून मैनानं रडायला आरंभ केला. त्याबरोबर अनुताईनीं तोंड वळवून तिला खस्‌दिशीं ओढून उचलून घेतलं आणि जेवणाच्या टेबलावर तिला धपदिशीं ठेवून त्या ओरडल्या, "जायचं नाहीं म्हटलं ना ! ऐकत नाहीं म्हणजे काय ? गप ! रडलीस तर खबरदार !"

मैनानं रडण्याचा आवाज उंच केला, तंगड्या झाडल्या, आणि टेबलावर लोळण घेत ती ओरडूं लागली, "मी जाणार आक्का-बरोबर."

हा सारा प्रकार अचलेला अगदीं असह्य वाटला. तिच्या आईचं तें वागणं अत्यंत असंमजसपणाचं होतं. त्या वागण्याचा रोख कुणा-वर होता तें उघडच होतं. अचलेच्या मनांत आलं हीं मोठीं माणसं लहान माणसांना फडाफडा बोलतात. यांना कुणीं बोलायचं ? आईला झणझणीत चार शब्द ऐकवावेत अशी तिला फार इच्छा झाली. पण ती तिनं दाबली. तिनं फक्त पुढें होऊन मैनाला उचलून घेतलं आणि आईशीं एक चकार शब्ददेखील न बोलतां ती निघाली. अनुताई मोठ्यांदा ओरडल्या, "तिला न्यायची नाहीं ! ठेवा इथें तिला. रडूं दे हवी तेवढी !" तरीदेखील उलट एक अक्षरसुद्धां अचला बोलली नाहीं. तिनं पायांत चपला सरकाविल्या आणि दार उघडण्यासाठीं फळीला हात घातला. मैनाचं रडणं एकदम थांबलं होतं. अचलेची हनुवटी धरून ती म्हणाली, "आई फार वाईट आहे, नाहीं ?" तें ऐकल्याबरोबर तशा स्थितींतही अचलेला एकदम हसूं आलं. "अंहं ! असं म्हणूं नये," असं ती मैनाला म्हणाली, परंतु तिला आपलं हसूं कांहीं आवरतां आलं नाहीं. बाहेर पाऊल टाकून ती जिन्याच्या पायऱ्यांकडे वळली. दार उघडूं राहिल्यामुळें अनुताईचे रागाचे शब्द तिला ऐकूं आले, "होय ग बाई, आई फार वाईट आहे. आक्का चांगली. तारामावशी चांगली. आई तेवढी फार वाईट. खरं आहे !" ... त्या शब्दांकडे दुर्लक्ष करून अचला पायऱ्या उतरत होती...मैनानं तिला एकदम विचारलं,

" आक्का, तुझ्याजवळ खूप पैसे आहेत ? "

अचलेला हंसू आलं. ती म्हणाली, "माझ्याजवळ ? नाहीं ग बाई."

" नंदू म्हणतो त्याच्या दादाजवळ खूप पैसे आहेत."

" दिवाकराजवळ ? "

" हं. त्याचा दादा खूप श्रीमंत होणार आहे म्हणे. "

" असं कां ? "

" होय ना. श्रीमंत व्हायसाठींच त्याचा दादा गेला आहे. "

अचलेनं चमकून विचारलं. " गेला आहे ? कुठें ? गांवाला ? "

" अहा रे ! तुला माहीतच नाहीं वाटतं ? नंदूचा दादा खूप खूप लांबच्या गांवीं गेला आहे. श्रीमंत होऊन येणार आहे. "

" असं ? "

" आपण जाऊं या गांवाला श्रीमंत व्हायसाठीं ? नंदू म्हणतो गांवाला गेलं कीं खूप पैसे सांपडतात. तिथें राक्षस असतो. त्याला मारलं कीं त्याचे पैसे आपल्याला घेतां येतात. नंदू म्हणतो त्याच्या दादाजवळ जादूची काठी आहे..."

पण मैनाच्या त्या सुरस चमत्कारिक गोष्टीकडे अचलेचं लक्ष नव्हतं. तिच्या मनांत निराळेच विचार सुरू झाले होते. दिवाकर गांवाला गेलेला आहे ?...ती मनाशीं म्हणत होती, मग बरोबर आहे. कांहीं कामासाठीं जर त्याला गांवाला जावं लागलं असेल तर तो पुण्याला कसा येणार ?...पण आपण गांवाला जात आहोंत हें त्यानं कळवूं नये ही गोष्टदेखील चमत्कारिकच होती ! कुठें जातों, कशासाठीं जातों, किती दिवसांकरतां जातों हें त्यानं तिला कळवायला नको होतं ? खुशाल निघून जायचं म्हणजे काय ? आणि तो गांवाला गेला असेल तर त्याच्या गैरहजेरींत आलेलीं माझीं पत्रं त्याला मिळालीं नसतील. कुणा तरी भलत्या माणसाच्या हातांत तीं पडलीं नसलीं म्हणजे मिळविली ... छे ! छे ! दिवाकरानं हा नसता घोर लावला आहे मला ! कुठल्या गांवाला गेला आहे आणि कां गेला आहे कुणास ठाऊक ! ... नंदूचा दादा गांवाला गेला आहे ही बातमी मैनाच्या बोलण्यावरून कळली खरी. परंतु तिचा

तपशील मैनाला किंवा नंदूला कुठून माहीत असणार ? तो तपशील कळण्यासाठीं सरळ वीरकरांच्या घरीं जाऊन विचारायला हवं... हो, वीरकरांच्या घरीं जायला हवं...त्यावाचून दुसरा मार्गच नाहीं. ...वीरकरांच्या घरीं जाण्याचे वाईट परिणाम होतील. पण झाले तर झाले. दिवाकराबद्दलची पुरती बातमी काढलीच पाहिजे...

अचलेच्या मनाचा निश्चय झाला, व तो तिनं अंमलांतही आणला.

बाजारांतल्या दुकानांत जाऊन मैनाला कंदीलवाला घेऊन दिल्यानंतर ती परतली व चंद्रनिवासच्या मोठ्या दारांतून आंत शिरली ती उजव्या बाजूच्या 'डी' ब्लॉककडे वळली नाहीं. डावीकडे वळली, 'ए' ब्लॉकमध्यें शिरली, आणि जिना चढूं लागली.

वीरकरांच्या ब्लॉकचं दार उघडंच होतं. बोळकंडीच्या पलीकडे बसण्याच्या मोठ्या खोलींत पांच सहा माणसांच्या गराड्यांत दिवाकराचे वडील बसलेले तिला दिसले. त्यांचीं उंच आवाजांतलीं बोलणीं आणि हंसणीं तिला ऐकूं आलीं. आंत पाऊल टाकावं कीं नाहीं अचलेला कळेना. "बोलून चालून नाटक्यांचं घर आहे तें" या अनुताईच्या उद्गाराची तिला आठवण झाली. आईचे ते उद्‌गार तिला आवडले नव्हते. पण आतां दारांत थबकून विड्यांचे झुरके ओढणाऱ्या, पान खाणाऱ्या, मोठमोठ्यांदा बोलणाऱ्या व हंसणाऱ्या मंडळीच्या त्या घोळक्याकडे पाहतांच अचलेच्या मनांत आलं, काय तऱ्हेचीं हीं माणसं ? त्यांच्याविषयीं मला आत्मीयता कशी वाटावी ? तीं वाईट नसतील. परंतु माझ्यापेक्षां फार वेगळी आहेत खास ! यांच्या दाराशीं मला यावं लागवं ?...दिवाकरवरच्या प्रेमापायीं ही काय विटंबना आली माझ्या वाट्याला ?...तिला एकदम हुंदका आला. तिला क्षणभर वाटलं, परत फिरावं आणि निघून जावं...

परंतु दिवाकराची पुरती बातमी काढल्यावांचून तिच्या जीवाला चैन पडणंच शक्य नव्हतं. काय वाटेल ती मानहानि सोसावी लागली तरी ती सोसायला हवी होती. दिवाकरानं काय हा प्रसंग आणला

माझ्यावर, अशा विचारानं तिला दुःख झालं. क्षणमात्र दिवाकराचा मनस्वी राग आला. तोंडांतून हुंदका बाहेर पडूं नये म्हणून तिनं आपला खालचा ओठ दातांखालीं घट्ट धरला...तिनं आंतल्या खोलींतल्या त्या गप्पीदासांकडे पुन्हां एकदां नजर टाकली. कसे कोण जाणे, परंतु तिच्या मनांतले इतर सारे विचार एकदम बंद झाले. तिचा उजवा हात वर झाला. मधलं नाजूक बोट घंटेच्या बटनावर दाबलं गेलं. घंटा खणखणून वाजली...

आंतल्या खोलींतल्या गप्पा एकदम थांबल्या. साऱ्या गप्पीदासांच्या नजरा दाराकडे वळल्या. दिवाकराच्या वडिलांची आणि अचलेची दृष्टादृष्ट झाली. अचला हंसली व तिनं हळूंच मानेनं खूण केली. दादासाहेब समोरचं तस्त उचलून घेऊन त्यांत थुंकले व उठले. आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें शर्टखालीं दोन्ही हात घालून धोतर घट्ट करीतच ते पुढें आले. अचलेजवळ येऊन त्यांनीं पानतंबाखूनं लाल झालेले आपले दांत विचकले, धोतर आवळण्याचं काम झटकन उरकून नमस्कार केला, आणि म्हटलं, " वा वा वा ! आज कुणीकडे सूर्य उगवला ? या ना, आंत या कीं." अचलेच्या कडेवर बसलेल्या मैनाकडे बघून ते म्हणाले, " वा वा वा ! मैनाताई पण आल्या आहेत कां ? आमच्या नंदूशीं खेळणार ना ?" त्यांनीं तिच्या गालावर हळूंच चापट मारली. मैनानं लगेच आपला गाल पुसून टाकल्यासारखं केलं आणि आक्काच्या मानेआड आपलं तोंड लपविलं. दादासाहेब अचलेला पुन्हां म्हणाले " या ना, आंत या. संकोच करायला नको. सारी आपलीच मंडळी आहेत. तुमची ओळख करून देतों. या. "

अचला म्हणाली, " नको. मला कांहीं विचारायचंय. उभ्या उभ्याच तें विचारतां येईल. "

" काय विचारायचं आहे ? "

" दिवाकर— " अचलेची जीभ थोडीशी अडखळली. पण मनाचा सारा निश्चय एकवटून तिनं विचारलं, " दिवाकर कुठें आहे ?'

तो प्रश्न ऐकल्याबरोबर दादासाहेबांची चर्या पालटल्याचा अचलेला

संशय आला. थोडा वेळ थांबून ते म्हणाले " दिवाकर होय ? " आणि पुन्हां गप्प झाले.

अचलेनं पुन्हां विचारलं, " दिवाकर कुठें आहे ? "

तरीदेखील त्यांनीं चटकन उत्तर दिलं नाहीं. दिवाकराबद्दल तिनं प्रश्न करावा या गोष्टीचा चमत्कार वाटल्याप्रमाणें चर्या करून त्यांनीं तिच्याकडे पाह्यलं. मग ते हळू आवाजांत म्हणाले, " दिवाकर कुठें गेला आहे तें आम्हांला कोणालाच माहीत नाहीं-- "

" म्हणजे काय ? " असे शब्द अचलेनं उच्चारले नाहींत परंतु तिनं हात उचलून तोंडावर टेकला, आणि तिच्या नजरेंत आश्चर्य दिसलं.

" जवळ जवळ दोन आठवडे झाले मुलगा घरांत नाहीं.लोकांना काय सांगायचं हरवला म्हणून ? चौकशीला माणसं येतात त्यांना आम्ही सांगतों गांवाला गेला आहे. पण खरं म्हणजे आम्हांलाच कुठें आहे त्याचा पत्ता ? मुलं मोठी झालीं कीं त्यांच्या भानगडींत आईबापांनीं लक्ष घालूं नये हें चांगलं. खरं कीं खोटं तुम्हीच सांगा ? तुम्हांला कशाला हवा होता दिवाकराचा पत्ता ? "

त्यांचे ते दोन्ही प्रश्न असे होते कीं त्यांचीं उत्तरं देणं अचलेला शक्य नव्हतं. तूं मोठी झाली आहेस, तुझ्यासुद्धां कांहीं भानगडी असतील, असं चक्क सूचित करून त्यांनीं तिला विचारलं होतं " खरं कीं खोटं तुम्हीच सांगा ? " त्यांचा तो प्रश्न तिला फार बोचला होता. आणि " तुम्हाला कशाला हवा होता दिवाकराचा पत्ता ? " हें त्यांचं विचारणंदेखील तिला सरळपणाचं वाटल नव्हतं. त्यांच्या बोलण्याचं अचलेला फार दुःख झालं. तें सहन करण्यासाठीं तिनं आवंढा गिळला. " रं, येतें " असं म्हणून ती वळली. तितक्यांत मैना आल्याची वर्दी मिळाल्यामुळें आंतून धांवत येत नंदू ओरडला " मैना, ये ना ग. " अचलेनं तें ऐकलं, परंतु ती थांबली नाहीं. ती जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागली.

तिचीं पावलं जड झालीं होती. मन घायाळ झालं होतं. दादासाहेब वीरकरांच्या प्रश्नांची बोच ती आतां विसरली

होती. परंतु दिवाकरविषयीं ती मोठ्या घोटाळ्यांत पडली होती. घरांतल्या माणसांना कांहीं एक न सांगतां त्यानं निघून जावं याचा तिला फार चमत्कार वाटत होता. कुठें गेला असेल दिवाकर? कां गेला असेल?... तिला कांहींच तर्क करतां येईना. माणसाला तर्क लढवितां आले कीं मनांतल्या दुःखावर त्या तर्कांचा एक प्रकारें फुंकर घातल्यासारखं होतं. दुःख कमी होत नाहीं, पण थोडं तरी सुसह्य होतं. उलट कसलेच तर्क करायला जागा नसली कीं दुःखाची धार तेवढी बोचत राहते... अचलेच्या मनांत येत होतं, ज्या दिवाकरावर मीं भरंवसा ठेवला तो असं कां माझ्याशीं वागला? इतर कुणाला राहो, पण मला तरी त्यानं विश्वासांत घ्यायला नको होतं! त्याचीं प्रेमाचीं लाघट बोलणीं तिला आठवलीं. त्याचीं वचनं तिच्या मनांत आलीं... त्यानं एकाएकीं नाहींसं व्हावं हा काय चमत्कार, असं ती घोकूं लागली. आपल्या प्रेमाचा अपमान झाला असं तिला वाटलं. दिवाकराच्या चांगुलपणाचा संशय घ्यायला तिचं मन अजूनही तयार नव्हतं. त्यामुळें त्याच्या वागण्याचा तिला जरी राग आला होता तरी त्याच्याबद्दलच्या चिंतेनंच ती अधिक व्यथित झाली. हा गेला तरी कुठें, हा गेला तरी कुठें, या प्रश्नाचे आघात तिला सहन करवेनात... मनांतल्या दुःखाचे कढ आवरीत, कसाबसा तोल सांवरीत ती पायऱ्या उतरत होती.

'ए' ब्लॉकच्या बाहेर पडून मोकळ्या आंगणांत पाऊल टाकतांना डोक्यावर पावसाचे थेंब पडलेसे वाटले म्हणून तिनं वर पाहिलं. तिची नजर सहजगत्या स्वतःच्या घराकडे गेली. आगाशींत अनुताई उभ्या होत्या. त्यांची तिची दृष्टादृष्ट झाली. ती झाल्याबरोबर आगाशींच्या कठड्याला रेलून उभ्या असलेल्या अनुताई मागं झाल्या आणि परतून घरांत गेल्या...डॉक्टरांचा आणि दादासाहेब वीरकरांचा हे दोन ब्लॉक विरुद्ध बाजूंस पण एकाच मजल्यावर आणि समोरासमोर होते. एकांतून दुसऱ्यांतल्या हालचाली दिसत. विशेष मोठ्या आवाजांत बोलणीं झालीं तर ऐकूं येत असत... आपण मैनाला घेऊन पायऱ्या उतरूं लागलों तेव्हां "मैना, ये कीं

ग ! आक्का ! असं काय हो करतां ? आणा कीं तिला इकडे !" असं वीरकरांचा नंदू मोठमोठ्यांदा ओरडत राहिला होता तें अचलेला आठवलं. तिच्या मनांत आलं, आगाशींत उभ्या राहिलेल्या आईनं नंदूच्या उंच आवाजांतल्या त्या हांका ऐकल्या असतील खचित...आणि आतां तर काय, 'ए' ब्लॉकमधून बाहेर पडतांना आईनं आपल्याला प्रत्यक्षच पाहिलं !

ती वर गेली व घरांत शिरली तेव्हां मैना घाईघाईनं कडेवरून खालीं उतरली आणि आईकडे जाऊन तिचे ओचे पदर ओढीत सांगूं लागली, " बघितलास कां माझा कंदीलवाला किती छान आहे ? नंदूपेक्षां चांगला आहे. त्याचा तांबड्या रंगाचा आहे. सोनेरी कुठें आहे ? असं बटन दाबायचं म्हणजे दिवा लागतो. हें पाहिलंस ? आवडला तुला ?"

अनुताईनीं मैनानं पुढें धरलेला कंदीलवालाही हातांत घेतला नाहीं किंवा तिच्या प्रश्नालाही उत्तर दिलं नाहीं. पलीकडच्या खोलींत गेलेल्या अचलेला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यांदा त्यांनीं विचारलं, " वीरकरांच्या घरांत केव्हांपासून खेळणीं विकत मिळायला लागलीं ?"

मैना म्हणाली " अहा रे ! वेडीच आहे ! दुकानांत जाऊन आम्ही विकत घेतला."

" होय कां ? मला वाटलं तुला घेऊन अक्कासाहेब वीरकरांच्या घरीं गेल्या होत्या त्या कंदीलवाला विकत घ्यायसाठींच."

" अहा रे ! वेडीच आहे आई ! " असं म्हणून मैना हंसूं लागली.

तिच्या हंसण्यानं चिडून अनुताई तिच्यावर ओरडल्या, " मला नाहीं येत हंसायला. जा तिकडच्या खोलींत आक्काकडे अन् खेळ."

त्यांनीं तिला ढकललं तेव्हां ती ओरडली, " कां ग ? "

" जा म्हटलं ना ? माझ्या दृष्टिपुढून चालती हो ! "

तितक्यांत " आई ! " असा शब्द त्यांच्या कानांवर आला.

त्यांनीं वळून पाहिलं. अचला दाराच्या चौकटींत येऊन उभी राहिलेली होती ! त्या क्षणीं मायलेकींची दृष्टादृष्ट झाली ती मोठी चमत्कारिक होती,

अचला म्हणाली, "असं घालून पाडून कशाला बोलतेस? सरळ मला विचार कीं वीरकरांच्या घरीं मी गेलें होतें काय. तुला विचारायचंय हें ओळखूत मीच सांगतें कीं मी गेलें होतें. माझं काय काम होतं तेंदेखील सांगतें—"

"मला कशाला सांगतेस? तुझ्या वडिलांनीं विचारलं तर त्यांना सांग—"

"त्यांना सांगेनच. पण तूंसुद्धां ऐकून ठेव."

"मला नाहीं कांहीं ऐकायचं" असं म्हणून अनुताई जागेवरून उठल्या आणि न्हाणीघराकडे गेल्या त्या मोठ्यांदा पुटपुटतच. "या घरात माझा अधिकार राह्यला आहे कुणावर? कुणी माझी नाहींत आणि मी कुणाची नाहीं असं समजूनच आतांशा वागायला शिकतें आहे बरं बाई मी."

अचलेच्या मनांत आलं, काय चमत्कारिक ही वागण्याची तऱ्हा! मुलांचं कांहीं चुकत असेल तर वडील माणसांनीं दोन थुस्कुटांत द्याव्या हें समजण्यासारख होतं. पण हें धुसफुसणं, पुटपुटणं, कुत्सित बोलणं, याला काय म्हणायचं? आपल्या वयाला काय शोभतं तें तरी पहावं माणसानं!... अचलेला वाटलं, पुढें व्हावं, आईला धरून तिला थांबवून तिचं तोंड आपल्याकडे वळवावं, आणि विचारावं सकाळपासून अशी कां वागताहांत माझ्याशीं? नाना दवाखान्यांत चालते झाले ते माझ्याशीं चार शब्ददेखील न बोलतां! आणि तूं घालून पाडून कुजकं बोलण्याची एकसुद्धां संधि वाया जाऊं देत नाहींस! हें काय चालवलंय तुम्ही? माझं दिवाकरावर प्रेम आहे हें तुम्हांला कळलंय एवढंच ना? तें तुम्हांला पसंत नाहीं आणखी माझी कानउघाडणी तुम्हांला करायची आहे एवढंच ना? मग सरळ बोला कीं काय तें! विचारा मला कीं हा काय मूर्खपणा मीं चालवला आहे म्हणून. म्हणजे मला काय

सांगायचंय तें सांगेन तरी. असा मुका मार कशासाठीं देतां?... तिनं खरोखरच असं केलं असतं. पण अनुताई लगाबगा पावलं टाकीत गेल्या त्या न्हाणीघरांत शिरल्यादेखील. त्यांनीं धाडकन दार लावून घेतलं त्याचा आवाज अचलेला ऐकू आला... ती क्षणभर जागच्या जागीं उभी राहिली... फाड फाड बोलण्याचा तिच्या मनांतला आवेश दुसऱ्याच क्षणीं एकदम ओसरून गेला. त्या आवेशाच्या जागीं कांहीं एका चमत्कारिक असहायतेची जाणीव तिच्या मनांत आली. दिवाकर नाहींसा झाला होता. त्याची चिंता तिला करायची होती. तिच्या प्रेमाचा आणि विश्वासाचा त्यानं एक प्रकारें उपमर्द केला होता. त्याचं दुःख तिला सोसायचं होतं. तिचे नाना तसे वागले होते. आई अशी वागत होती. सगळ्या बाजूंनीं दुःखानं घेरल्यासारखं तिला वाटलं. कुणाचीही सहानुभूति तिच्या वाट्याला येत नव्हती. ती अगदीं एकटी होती. मनांतलं खोल दुःख तेवढं तिच्या सोबतीला होतं... तिला एकदम रडूं आलं.

ती दाराच्या चौकटींतून वळली, त्या खोलींतल्या कॉटवर पडली आणि रडूं लागली...

मैना हळूंच तिच्याजवळ आली व म्हणाली "मोडला कीं ग कंदीलवाला. दिवा लागत नाहीं बघ." तिनं अचलेला आपल्या लहानग्या हातांनीं हालविलं आणि हांका मारल्या "आक्का! ए आक्का! कंदील लागत नाहीं! दे ना लावून."

अचला कुशीवर वळली, उठून बसली, आणि मैनाला कॉटवर घेत म्हणाली, "बघूं?" बॅटरीची तार सुटली होती ती नीट बसविल्यावर कंदील लागला. अचलेनं मैनाचा मुका घेतला आणि विचारलं, "झालं?"

कंदीलवाला नीट झाल्याबद्दल आनंद दाखवण्याऐवजीं मैनानं विचारलं, "तूं रडतेस कां? माझा कंदीलवाला मोडला तरी मी रडलें कां?"

"तूं फार शहाणी ग. कध्धीं रडत नाहींस."

मैना मनाशीं आश्चर्य करीत होती, मोठ्या माणसांना रडायचं

काय कारण ? त्यांना कधीं हट्ट करावा लागत नाहीं. त्यांना कुणी रागं भरत नाहीं. त्यांना हवं तें मिळतं. हवं तेव्हां हवं तिकडे जातां येतं. खरं म्हणजे मोठ्या माणसांनीं कधींदेखील रडतां कामा नये. पण आताशा मोठ्या माणसांचं रडणं तिला वारंवार दिसूं लागलं होतं. तिची आई रडतांना तिला कधीं कधीं दिसत असे. तारामावशी देखील रडतांना दिसली होती. आणि तिची आक्का रडत होती... तिनं पुन्हां विचारलं " तूं रडतेस कां ? "

तिच्या त्या प्रश्नानं अचलेला आणखीच हुंदका आला. परंतु तो दाबून ती हंसली आणि म्हणाली " मोठं झालं·कीं रडणं वाट्याला येत ग. तूं लहान आहेस अजून. अशी लहानच रहा. मोठी नको होऊंस."

तें ऐकून मैनाला वाटलं, आपली ही थोरलं बहीण खरोखरच आपल्याला कायमच लहान ठेवणार आहे. ती हात उगारून म्हणाली " आं ! मी मोठी होणार ! " मोठेपणाच तिला केवढं आकर्षण वाटत होतं, लहानपणाचा तिला किती कंटाळा आला होता, मोठं होण्याची तिला केवढी घाई झाली होती ! आणि हा आक्का तिला सांगत होती नेहमीं लहानच रहा, मोठी होऊं नकोस ! खोलींत कोंडून ठेवणाऱ्या एखाद्या माणसावर ओरडावं त्याप्रमाणें मैना हात उंच करून म्हणाली " वा ग वा ! मी मोठी होणार ! "

सदा लहानच रहावयास सांगणाऱ्या थोरल्या बहिणीचा सहवास एकदम नकोसा झाल्याप्रमाणें तिच्या मांडीवरून ती खालींच उतरली व दाराकडे जाऊं लागली. न्हाणीघरांतून बाहेर येणाऱ्या अनुताईंची आणि तिची बोळांत गांठ पडली. त्यांनीं तिला रागानं विचारलं " कुठें निघालांत हो बाईसाहेब ?"

आईकडे वळूनदेखील न पाहतांच तिनं सांगितलं " कंदिलवाला दाखवायला."

कुणाला तें मैनानं सांगितलं नव्हतं. पण अनुताईंनीं ओळखलं. त्या रागानं पुटपुटल्या, सगळीजणं जा त्यांच्या घरांत राह्यलाच. त्यांच्या मत्सरी संशयी मनाला असा कांहीं विचार सुचला नाहीं कीं

मैनाच्या हातच्या खेळण्याचं आपण यथायोग्य कौतुक केलं असतं तर तिला कशाला वाटलं असतं तारामावशीकडे धांव घ्यावीसं? आपण पुरेसं प्रेम न केल्यामुळें मैना त्या प्रेमाच्या भुकेनं दुसरीकडे अधिकाधिक ओढली जात आहे; आपल्या वागण्यानंच आपण तिला दुरावत आहोंत, हें खरं म्हणजे अनुताईंना केव्हांपासून कळायला हवं होतं. परंतु बायकांच्या मनांत संशय आणि मत्सर उत्पन्न झाला कीं साध्या गोष्टी त्यांना कळेनाशा होतात. स्वतःसाठीं त्या स्वतःच दुःख निर्माण करतात...

'कुठें निघालांत हो बाईसाहेब?' 'कंदील दाखवायला' 'सगळींजणं जा त्यांच्या घरांत राह्यलाच!'—हीं उत्तरं-प्रत्युत्तरं कॉटवर पालथं पडून उशींत तोंड खुपसून रडणाऱ्या अचलेला ऐकूं आलीं. नंतर अनूताईंची सैंपाकघरांतली चाहूल आणि स्वतःशींच चाललेली पुटपुट तिच्या कानांवर येत राहिली ... तिच्या मनांत आलं काय चमत्कारिक वातावरण हें!.... तिची आई केवळ तिच्यावर रागावलेली नव्हती. आणखी कोणावर तरी तिचा राग होता. तिच्या जळफळाटाचं आणखी कोणतं तरी एक कारण होतं. अचला सुटींत घरीं राहिली तेव्हां स्वतःच्याच नव्या प्रेमांत रंगली होती. घरांतल्या गोष्टींकडे तिचं धड लक्ष नव्हतं. पण तरीसुद्धां आईच्या स्वभावांत एक नवीनच चिडकेपणा आल्याच तिला आढळलं होतं. समोरच्या फाटकांच्या तारामावशीबद्दल आईचं मत वाईट आहे हें तिच्या ध्यानांत आलं होतं. आईचं आणि नानांचं कांहीं तरी बिनसलेलं आहे अशी शंका तिला अनेक वेळां आली होती. आणि त्या गोष्टीचा जसा तिला विस्मय वाटला होता तसाच खेदही झाला होता. तिच्या मनांत आलं होतं, केवढ्या आनंदानं आणि खेळीमेळीनं भरलेलं असायचं आमचं घर! तें प्रसन्न वातावरण हळूहळू बिघडत आहे खास! काय, झालंय काय? तिला निश्चित तर्क करतां येत नसे ... आतांही अचलेच्या मनांत आलं, आईचं हें धुसफुसणं आणि कुजकं बोलणं केवळ माझ्यावरच्या रागानं नाहीं. आणखी कुणावर तरी तिचा रोष आहे! कुणावर?...

कशासाठीं ?... स्वतःच्या दुःखाऐवजीं या प्रश्नाचाच विचार अचला करूं लागली... आणि तो करतां करतां तिला केव्हां झोप लागलीं तें तिचं तिलाच कळलं नाहीं...

" आक्का ! उठा ना ! टेबलावर ताटं ठेवलीं " असे सारजाचे शब्द ऐकून ती जागी झाली. तिनं डोळे उघडून पाहिलं तों चांगलीं दुपारची उन्हं खोलींत पडलीं होतीं. "म्हणजे ?" असा आश्चर्याचा उद्गार तिनं स्वतःशीच काढला, व सारजाकडे पाहिलं. सारजा तिला म्हणाली " साहेब जेवायला बसले. उठा ना. चला." अचला चटकन उठली. तिच्या मनांत आलं, इतका वेळ झोप कशी लागली मला ? अन् लागली तर आधीं कुणी उठवायचं नाहीं मला ? आईनं हांक मारायची नाहीं ? मी घरांत असतांना पूर्वी कधीं तरी माझी विचारपूस न करतां नाना एकटेच जेवायला बसले होते काय ? पण आज ते बसले होते ! माझ्यासाठीं काहीं खोळंबले नव्हते. मला उठवून जेवायला चला म्हणण्याचं काम त्यांनीं मोलकरणीवर सोपवलं होतं... अचलेला फार वाईट वाटलं. रागही आला. क्षणभर तिच्या मनांत आलं, पुन्हां अंथरुणावर आडवं व्हावं आणि सारजाला सांगावं मला भूक नाहीं, मला नाहीं जेवायचं. पण तिनं विचार केला, आईबापांच्या वाकड्या वागण्याला आपण वाकडं वागून उत्तर देण्यांत अर्थ नाहीं...ती उठली, न्हाणी घरांत गेली, चूळ भरून तोंड पुसून पानावर जाऊन बसली. कुणी तिच्याकडे पाहिलं नाहीं. कुणी तिच्याशीं बोललं नाहीं. ती कुणाशीं बोलली नाहीं. एकेक घास अचलेच्या तोंडांत घोटाळत होता. तिच्या मनांत येत होतं हें काय जेवण कीं काय ? यापेक्षां उपाशी राहिलेलं काय वाईट ?...नानांच्या आधींच ती पानावरून उठली व हात धुण्याच्या स्टँडकडे गेली. पानावर बसल्या बसल्याच नाना तिला ओरडून म्हणाले,

"पुन्हां आपल्या खोलींत जाऊन अंथरुणावर निजणार असशील तूं. पण मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे. पुढच्या खोलींत बैस. हात धुऊन आलोंच मी."

अचला मनांतल्या मनांत समजली कीं सकाळपासून ज्याचीं पूर्वचिन्हं तिला दिसलीं होतीं तें वादळ आतां फुटणार आहे... मघाशीं अनुताई तिला म्हणाल्या होत्या " मला कशाला सांगतेस ? तुझ्या वडिलांनीं विचारलं तर त्यांना सांग " त्याची तिला आठवण झाली. नानांचं आणि आईचं ठरलं असलं पाहिजे नाना दवाखान्यांतून परत आल्यानंतर जेवण आटपल्यानंतर 'चौकशी' करायची म्हणून...तोंड पुसून टॉवेल दूर ठेवतां ठेवतां अचला मनाशीं म्हणाली, ठीक आहे. होऊन जाऊं द्या एकदां चौकशी... मीं काय गुन्हा केला आहे ? तुम्हांला वाटत असेल माझा गुन्हा ! मला नाहीं वाटत ?

ती खोलींत जाऊन बसली. नाना स्टॅंडपाशीं हात धूत होते तेव्हां तिची आई त्यांच्याजवळ घाईनं येऊन त्यांना हळूंच काय म्हणाली तें तिला ऐकूं आलं, " उगीच फार रागानं कांहीं बोलायचं नाहीं हं— " अचलेच्या भावना एकदम हालल्या. तिच्या मनांत आलं कांहीं झालं तरी आईचं अंतःकरण म्हणतात तें असं. सकाळपासून तिच्या आईनं केवढा कठोरपणा दाखविला होता. वारंवार किती कुजकं ती बोलली होती. पण आतां वेळ आली तेव्हां ती नानांना सांगत होती, " फार रागावून बोलायचं नाहीं बरं कां " ... नानांनीं काय उत्तर दिलं तें तिला ऐकूं आलं नाहीं. बहुधा कांहींच न बोलतां त्यांनीं तिला खुणेनंच काय तें सांगितलं असलं पाहिजे. आईचं मन विरघळलं तसं बापाचं विरघळणार नाहीं हें अचलेला कळत होतं. नाना आपल्याला खूप बोलणार अशीच अपेक्षा तिनं ठेवली होती.

नाना तोंड पुशीत आंत आले व तिच्यासमोर बसून म्हणाले, " हं, काय आक्काताई ! तुमचा अभ्यास ठीक चालला आहे ? "

त्यांच्या बोलण्यांतला बहुवचनी प्रयोग तिच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं. त्यांच्या तोंडावर हंसूं होतं परंतु मनांत घुस्सा होता. म्हणून हा बहुवचनी प्रयोग होता. परंतु त्याकडे दुर्लक्ष करून अचला म्हणाली, " हां, ठीक चाललाय कीं. "

" तुमची तब्येत ठीक आहे ? "

" ठीक आहे कीं. मला काय झालंय ? "

" नाहीं, एकाएकीं आलीस तेव्हां म्हटलं तब्येत बरी नाहीं कीं काय ? "

तितक्यांत अनुताई आल्या आणि दाराच्या चौकटींत उभ्या राहिल्या. फार रागानं न बोलण्याची आपण दिलेली सूचना अचलेचे वडील लक्षांत ठवतील याची त्यांना जणुं खात्री नव्हती, व म्हणून त्या येऊन दाखल झाल्या होत्या.

अचला म्हणाली, " माझी तब्येत बरी नाहीं म्हणून मी आलें असं तुम्हांला किंवा आईला वाटलं असेल असं मला नाहीं वाटत. कारण तसं वाटलं असतं तर माझी विचारपूस तुम्ही लगेच केली असती. आठ तास थांबलां नसतां. "

या उत्तरानं नाना थोडेसे चुटमळले, पण मग ते म्हणाले " पण तुझा अभ्यास ठीक चाललाय, प्रकृति चांगली आहे, तर एकाएकीं कां आलीस ? केवळ आम्हांला भेटायसाठीं ? केवळ आमच्या ओढीनं तूं अशी कधीं घरीं आली नव्हतीस पूर्वी. "

तितक्यांत सारजा मैनाला बालक मंदिरांतून घेऊन आली. पुढच्या खोलींत सारी मंडळी आहेतसं पाहिल्यावर मैना खोलींत आली, आणि आली ती सरळ आक्काकडे जाऊन तिच्या मांडीवरच चढली. मोठी माणसं कशाबद्दल किती गंभीरपणानं बोलताहेत याची तिला काय कल्पना किंवा पर्वा ! आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें आक्काची हनुवटी ओढून ती सांगूं लागली, " आक्का ! ए आक्का ! आज बाई आम्हांला नवं गाणं शिकवीत होत्या तेव्हां नंदूनं—— "

अचला तिला म्हणाली ' आज नवं गाणं शिकलां तुम्ही ?—— " मैना सांगूं लागली, " हो ना. नंदूनं कीं नाहीं—— " अचला तिला म्हणाली, " मग सांग हं मला काय तें. मी आत्तां नानांशीं बोलतें आहे. " अनुताई सारजाला म्हणाल्या " हिला जरा घेऊन जा ग सैंपाकघरांत. " पण सारजा पुढें आल्याबरोबर मैनानं नेहमींप्रमाणें हात उगारून म्हटलं " अं ! मी नाहीं जा ! मी आक्काच्या मांडीवर

बसणार." तिच्याशीं जास्त झगडा करण्याची सोय नव्हती. तिला अचलेच्या मांडीवर बसूं देणं भाग होतं. सारजा सैंपाकघराकडे गेल्यावर तिला कांहीं ऐकूं जाऊं नये म्हणून अनुताई मात्र पुरत्या खोलींत आल्या, आणि त्यांनीं दाराला कडी लावली. आक्काच्या मांडीवर बसण्याचा हक्क शाबीत झाल्यावर तसं बसून राहण्यांत मैनाला गोडी उरली नाहीं. तिनं उठून नानांच्या हातांतली काड्यांची पेटी घेतली व खालीं बैठकीबर बसून काड्यांची मोठी रांग ती तयार करूं लागली...

नाना म्हणाले, "हां, तर काय म्हणत होतों—"

"घरच्या ओढीनं पूर्वीं कधीं मी अशी आलें नव्हतें!" अचलेनं त्यांचं वाक्य पुरं केलं.

तिचा तो धीटपणा अनपेक्षित होता आणि डॉक्टरांना आवडण्यासारखा मुळींच नव्हता. इतका वेळ तोंडावर ठेवलेलं त्यांचं हंसूं नाहीसं झालं. रागाचा स्पष्ट स्वर काढून त्यांनीं विचारलं "हो. तेव्हां दुसऱ्या कोणत्या तरी ओढीनं आलीस हें उघड आहे."

अचला म्हणाली, "नुसतं उघडच नाहीं. तुम्हांला दोघांनाही माहीत आहे. ज्या वस्तू इथें मी विसरून गेलें त्या आईला सापडल्या असल्या पाहिजेत व तिनं त्या तुम्हांला दाखविल्या असल्या पाहिजेत, एवढं मला सहज ओळखतां येतं. तेव्हां दिवाकरावर मी प्रेम करतें हें माझ्या तोंडून वदविण्यासाठीं उगीच बोलणं लांबवूं नकाच. कारण ते प्रेम तुमच्यापासून मला लपवायचं नाहीं—"

ती असं सरळ स्पष्ट धीटपणानं बोलेल अशी तिच्या आईबापांना कल्पना नव्हती. त्यांनीं एकमेकांकडे पाहिलं. "झालं! आतां काय बोलायचं हिच्यापुढें?" असा त्यांच्या नजरेंत अर्थ होता.

डॉक्टर म्हणाले, "लपवायचं नाहीं? मग काय तें अभिमानानं मिरविण्याच्या लायकीचं आहे असं तूं समजतेस कीं काय?"

"तसं समजल्याखेरीज कां मी प्रेम करीन?"

"तूं पुष्कळ समजशील, जग नाहीं समजणार. केवळ तूं प्रेमांत

पडलीस म्हणून रागावणारा मी नाहीं. माझीं मतं पुष्कळ पुढारलेलीं आहेत. खरं प्रेम कळण्याइतकी मोठा तूं अजून झालेली नाहींस. इंग्रजींत "वासराचं प्रेम" म्हणतात तसलं प्रेम आहे तुझ. पोरकट! बालिश ! मूर्खपणाचं ! तुझ्यासारख्या कोवळ्या वयांतल्या मुलींना जें चकाकतं तें सोनंच वाटतं ! जें नकली असतं तेंच प्रेम आहे असा भास होतो. कोवळ्या वयांतल्या अज्ञानाचा परिणाम आहे हा. पण तरीदेखील एखाद्या चांगल्या तरुणाच्या प्रेमांत तूं सापडली असतीस तर मी रागावलों नसतों. पण प्रेम करायसाठीं एका डँबिसाची तूं निवड केली आहेस. तुझ्या ठेवणींतला तो फोटो आणि तीं पत्रं हिनं मला दाखविलीं तेव्हां मी कपाळावर हातच मारून घेतला. कशी भुरळ पडली तुला वीरकराच्या त्या दिवट्या पोराची ! खुशाल त्याच्या चोरून गाठीभेटी घेतल्यास ? त्याच्याबरोबर हिंडलीस ? शरम नाहीं वाटली तुला ? "

अखेरचं तें वाक्य उच्चारतांना डॉक्टर इतक्या मोठ्यांदा ओरडले की अनुताईंनीं घाबरून त्यांना "हळूं हळूं" म्हणून खूण केली. काड्यांच्या रांगा मांडीत बसलेली मैना एकदम दचकून त्यांच्याकडे बघूं लागली. आत्तां तिच्या लक्षांत आलं कीं कांहीं तरी चमत्कारिक प्रकार घडत आहे. बापाजवळ जावं कीं आईचा ओचा धरावा कीं आक्काच्या मांडीवर चढावं याचा निर्णय तिला करतां येईना. त्या तिघांकडे तिनं आळीपाळीनं पाहिलं.

डॉक्टरांनीं पुन्हां ओरडून अचलेला विचारलं "बोल ना ! शरम नाहीं वाटली तुला ! "

अचला म्हणाली, "दिवाकराविषयीं विनाकारण वाईट मत करून घेतलेलं दिसतं आहे तुम्ही. "

"विनाकारण ! अग आंधळे, चार चौघांना विचार त्या बाळाचे पराक्रम. म्हणजे थोडंसं कळेल तुला काय लायकीचा प्रियकर तूं निवडला आहेस तें. काय काय थापा दिल्या आहेत त्यानं तुला ? आणि कितीसं पुढं गेलंय तुमचं प्रेम ? आमच्या

तोंडाला काळं फासण्यासारखं कांहीं करून बसली आहेस कीं काय ?"

अचला एकदम म्हणाली, "नाना, मला दोष द्यायचा असला तुम्हांला तर द्या. वाटेल तितकं बोला. माझं प्रेम पसंत नाहीं म्हणून सांगा. पण माझा असा भलता अपमान नका करूं ! आणि दिवाकराला वाईट नका म्हणूं ! माझी खात्री आहे तो चांगला आहे."

"पण माझी खात्री आहे ना तो बदमाष आहे म्हणून. तोंड वर करून मला सांगते आहे दिवाकराचा चांगुलपणा. मला हें बिलकुल खपायचं नाहीं. आत्तां आपल्या आईच्या पायाची शपथ घे की दिवाकराची भेट पुन्हां कधीं घेणार नाहीं. त्याला पत्र कधीं लिहिणार नाहीं. घेतेस कीं नाहीं शपथ ?"

अचला म्हणाली, "असला भलता जुलूम मी नाहीं सहन करणार. मी जातेंच आपली !" ती खरोखरच उठली आणि जाऊं लागली,

डॉक्टर जागेवरून उठले व तिचा हात खसकन धरून ओरडले, "कुठें, निघालीस कुठें ? घराबाहेर जांयचंय काय ?"

"माझा गुन्हा मला नीट समजावून न सांगतां मला घराबाहेर काढलीत तर जाईनसुद्धां."

"असं कां ? घराबाहेर जाशील पण दिवाकराचा नाद सोडणार नाहीं असं म्हणायचंय काय तुला ? तोंड फोडून हातांत देईन, ठाऊक आहे ?"

अनुताई एकदम पुढें झाल्या. त्यांनीं अचलेला जवळ घेतलं व त्या डॉक्टरांना म्हणाल्या, "उगीच काय संताप करून घेतां ? आपली नापसंति तिला समजली. पुरे झालं."

डॉक्टर ओरडले "अग शहाण्याला शब्दांचा मार पुरतो. बहकलेल्या मूर्ख पोरींना तो नाहीं पुरायचा. नुसती नापसंति कळून काय उपयोग ? ती कळली तरी ती शेण खाणारच !"

अचला म्हणाली, " पुन्हां पुन्हां गलिच्छ नका बोलूं नाना. दिवाकराविषयीं तुम्हाला काय माहीत आहे ? "

तो प्रश्न विचारतांना अचलेनं अगदीं तुच्छतेची चर्या केली. ती पाहून डॉक्टरांना वाटलं, " तुम्ही अगदीं मूर्ख आहांत " असंच जणुं ती म्हणाली. तें सहन न होऊन त्यांनीं एकदम फाडदिशीं तिच्या गालावर पंजा मारला व ते ओरडले, " तोंड करून बोलूं नकोस ! "



अचला म्हणाली, " बोलणार ! एकदां नाहीं दहादां बोलणार ! "

" चूप ! " असा उद्गार काढून डॉक्टरांनीं तिच्या आणखी दोन थोबाडींत दिल्या. अनुताईंनीं हात आडवा केला तो झटकून टाकला. मैना मोठ्यांदा " आक्का ! ए आक्का ! " असं ओरडून रडूं लागली, तिच्यावर ते ओरडले. अनुताई अचलेला घट्ट धरून खोलींतून जाऊंच लागल्या तेव्हां ते म्हणाले, " थांब थांब ! या मूर्ख पोरीला मला सगळं सांगूं दे ! " त्यांनीं अचलेचा

हात हिसकून पुन्हां हातीं घेतला आणि म्हटलं, "दिवाकराबद्दल मला काय माहीत आहे विचारतेस, नाहीं कां? ऐक. त्याचे मागचे अनेक पराक्रम नाहीं सांगत तुला. ताजा तेवढा सांगतों. डिकिन्सन कंपनीचे कित्येक हजार रुपये त्यानं आणि कंपनीच्या कॅशरनं संगनमत करून लांबविले आहेत. दोघांनाही पकडून त्यांच्यावर खटला भरल्याची बातमी तूंच वाचशील बर्तमानपत्रांत केव्हां तरी. सध्यां ते दोघं फरारी आहेत. ऐकलंस काय?"

एकदम अत्यंत विस्मयाची आणि दुःखाची चर्चा करून अचलेनं बापाकडे पाहिलं. तिनं डोळे मोठाले केले. तोंड वासून बोटं तोंडांत घातलीं. तिच्या तोंडून एकदेखील अक्षर बाहेर पडलं नाहीं. ती थरथर कांपूं लागली. तिचा हात आईचा आधार शोधूं लागला. बापानं तिच्या थोबाडींत मारल्या होत्या त्यांच्या वेदना कांहींच नव्हेत अशा वेदना 'फरारी' हा शब्द ऐकतांच तिच्या अंतःकरणाला होऊं लागल्या... ज्या प्रश्नाचं आज कित्येक दिवस तिला गूढ पडलं होतं, आणि ज्याचा उलगडा इकडे येऊनहि तिला झाला नव्हता, त्याचं उत्तर एकदम तिला कळलं होतं. दिवाकर पुण्यास आला नव्हता, त्याचीं पत्रं एकाएकीं बंद झालीं होतीं, याचं कारण हें होतं तर! ... किती भयंकर कारण!... आणि हें कारण खरं असेल तर आपल्या प्रेमाची केवढी विटंबना! प्रेमभंगाच्या दुःखापेक्षांही प्रेम करण्यांत आपण मूर्ख ठरलों, फसलों ही जाणीव अधिक दुःखाची असते. अचलेच्या कोंवळ्या, निष्पाप, प्रेमळ हृदयाला त्या जाणीवेचा आघात असह्य वाटला. नाजूक गालावर बसलेल्या चपराकींच्या व्यथेहून हा दंश, हा फणकारा अधिक भयंकर होता... तिनं मोठ्यांदा हुंदका दिला. आणि "आई!" म्हणून अनुताईच्या खांद्यावर मान टेकली.

हा एकंदर प्रकार पाहून मैना अगदीं विलक्षण गोंधळून गेली होती. तिची कल्पना होती कीं मोठं झाल्यावर मार खावा लागत नाहीं, रडावं लागत नाहीं. या कल्पनेला आतांशा अधून मधून धक्के बसले होते, पण आत्तांचा हा धक्का फार मोठा होता.

नाना ओरडत होते काय, आक्काला मारीत होते काय, आक्का रडत होती काय, सारंच विलक्षण ! बावरून जाऊन काड्यांच्या रांगा तशाच टाकून ती उठली. तिला वाटलं या मोठ्या माणसांतून पळून जावं ! ... अनुताईंनीं अचलेला घेऊन जाण्यासाठीं दार उघडलं त्याबरोबर ती दारांतून बाहेर पळाली. सारजा तिला दिसली. सारजा कांहीं तिच्या फारशी प्रेमांतली नव्हती, पण तरी ती तिला म्हणाली, " मला सुतारमामांच्या दुकानांत जायचंय ! मला सदूकडे जायचंय ! " तिनं हात उंच केले आणि ती सारजाकडे बघूं लागली.

पण तिनं पाहिलं तों सारजादेखील रडत होती ! आणि जणुं कांहींच ऐकूं न आल्याप्रमाणें तिच्याकडे उलट पहात होती !

: : ५ : :

नित्याप्रमाणें दवाखान्यांतलं काम आटपून घरीं परतलेल्या डॉक्टरांनीं चंद्रनिवासाच्या मोठ्या दारांत पाऊल टाकलं तों त्यांना क्षणभर शंका आली चुकून निराळ्याच इमारतींत तर आपण प्रवेश केला नाहीं !

दाराच्या दोन्ही बाजूंना केळीचे मोठमोठे खांब लावलेले होते. दारावर आंब्याच्या डहाळ्या, फुलांच्या माळा, सोनेरी वर्खानं मढविलेल्या सुपाऱ्यांचीं मधोमध मोठा नारळ असलेलीं तोरणं लटकत होतीं. दारांत दोन्ही बाजूंस देवडीसारखे ओटे होते त्यांवर रंगीबेरंगी पोषाख केलेले बँडवाले बसले होते, व मीनाक्षीचं 'यमुनाजळिं' हें गाणं वाजवीत होते. मनगटांवर सोन्याच्या पोची व शिवाय घड्याळं, हिऱ्यामोत्यांच्या बटनांचे रेशमी शर्ट–कोट, तलम मलमलीचीं धोतरं, पायांत उंची पंप शू –अशा थाटांतले, उजवी केसाळ मांडी दिसेपर्यंत धोतराचा सोगा उचलून हातांत धरणारे, तोंडांत कोंबलेल्या मसाल्याच्या पट्ट्या चघळणारे, लठ्ठ पोटांचे दहा वीस गुजराथी पुरुष दारालगतच्या फरशीवर उभे होते. दागिन्यांनीं लोंबलेल्या, चष्मा लावलेल्या दोन गुजराथी म्हाताऱ्या हातांत चांदीचीं ताटं घेऊन त्यांतले कुंकु लावलेले तांदूळ कुस्करीत उभ्या होत्या. मोठ्या चौकाच्या पलीकडच्या टोकाशीं जी छोटी एकमजली इमारत होती तिच्यापुढें छोटासा पण खूप शृंगारलेला मांडव उभारलेला होता, तेथून दाराकडे आणि दाराकडून मांडवाकडे गुजराथी स्त्री-पुरुषांची आणि पोरासोरांची धांवपळ चालली होती. 'शूं ! ' 'केम ! ' अशा अस्सल गुजराथी छापाचे उंच स्वरांत काढलेले उद्‍गार हवेंत उठत होते. दूर मांडवांत तर नटलेल्या

स्त्रीपुरुषांची आणि बाबालोकांची झिम्मड उडाली होती, व त्या गर्दीतून उठणारा गुजराथी कोलाहल बँडच्या भरीला मांडवाजवळ वाजणाऱ्या देशी वाजंत्र्यांच्या 'भैरवी'च्या आलापांत मिसळत होता. चंद्रनिवासच्या इमारतींतला तो मधला चौक अगदीं दुमदुमून गेला होता, आणि गुजराथ्यांच्या गर्दीनं त्या जागेला ' जव्हेरी बाजारा'चं रूप आणलं होतं...

नानांना क्षणभर वाटलं, चुकून भलत्याच इमारतींत तर आपण पाऊल टाकलं नाहीं ?

पण मग त्यांच्या लक्षांत आलं, बरोबर आहे, चंद्रनिवासांतच प्रवेश करीत आहोंत आपण. एवढंच कीं लग्नाचा सीझन सुरू झाला आहे. चंद्रनिवासांतली भाड्यानं मिळणारी जागा घेऊन कुणी तरी श्रीमंत गुजराथी लग्नाचा धूमधडाका या ठिकाणीं उडवून देत आहे...दारालगत घोळका करून उभ्या असलेल्या गुजराथी पुरुषां-पैकीं दोघांतिघांनीं त्यांना नमस्कार केला आणि " या या. इकडनं इकडन " म्हणून मांडवाकडे त्यांना नेण्यासाठीं ते लगबगीनं त्यांच्यापुढें चालूं लागले. म्हाताऱ्या बायकांच्या हातांतल्या ताटांतले मूठ मूठ तांबडे तांदूळही कुणी तरी तितक्यांत त्यांच्या हातांत कोंबले. नानांनीं हंसत हंसत त्यांना सांगितलं, "माफ करा. पण मी लग्नासाठीं आलों नाहीं. इथें राहणारा आहे मी." त्यांच्यापुढें लगालगा चालू लागलेले गुजराथी परत वळले व उजव्या हातांत धरलेले धोतराचे सोगे आणखीच वर उचलून म्हणाले, " "अरे भई आम्हांला तर वाटला लगन लावायसाठींच आले तुम्ही ! " नाना म्हणाले " माझं लगन फार वर्षांपूर्वीं झालंय शेट. " या उत्तरांतला विनोद त्या वऱ्हाडी गुजराथ्यांना कळला नसेल, परंतु त्यांनीं मोठ्यांदा हंसून एकमेकाच्या खांद्यावर डावे हात मारले व " ज्यो ज्यो " असं कांहीं म्हटलं...

डॉक्टर पुढें सटकले. त्यांनीं सभोंवार दृष्टि फेकली तों निवासाच्या दोन्ही बाजूंच्या इमारतींच्या साऱ्या बिऱ्हाडांतल्या बायकामुली आपापल्या ब्लॉकच्या आगाशींत जमल्या होत्या आणि कठड्यांवर

वाकून वाकून बघत होत्या. निवासाच्या एका टोकाचा तो छोटासा हॉल मंगलकार्यासाठीं भाड्यानं देण्यांत यावा हें नानांच्या दृष्टीनं चुकीचं होतं. कुणाचं लग्न असलं कीं वाजंत्र्यांची आणि बेंडबाजाची केवढी कटकट घटकान् घटका चालू रहात असे! आणि लग्नासाठीं जमणाऱ्या वऱ्हाडाची आणि पाहुण्यांची कोण बजबजपुरी माजत असे! निवासांतला सारा शांतपणा खलास होऊन जाई. डॉक्टर मनांतल्या मनांत चिडत असत. निवासांतल्या इतर ब्लॉकमधले पुरुषदेखील चौकांत वाजंत्रीं वाजायला लागलीं कीं म्हणत, "आलं कां आज संकट पुन्हां." परंतु निवासांतल्या बायकांचं मत वेगळं होतं. कुणाच्याही लग्नाची नुसतीं वाजंत्रीं ऐकलीं, शेले नेसलेल्या दागिने घातलेल्या दुसऱ्यांच्या बायका जरी नुसत्या डोळ्यांनीं पाहिल्या तरी बायकांना काय सुख होतं तें त्यांचं त्यांना माहीत. पण तें होतं खरं. बँड वाजायला लागला कीं चंद्रनिवासांतल्या घरोघरच्या बायकांना आतां आज आपल्याला मोठा विरंगुळा मिळाला असं वाटत असे. रोज तींच तींच घरकामं करून शिणलेलीं आंबलेलीं त्यांचीं मनं एकदम करमणुकीच्या अपेक्षेनं टवटवीत होत. आगाशी–आगाशींत बायकांचे आणि थोराड मुलीबाळींचे लहान मोठे थवे जमा होत. समोरा-समोरच्या 'आगाशी'चीं मोठ्या आवाजांत प्रश्नोत्तरही होऊं लागत. "त्या बाईची नथ पाहिलीत कां यशोदाकाकू?" "पाहिली हो. मोती खरे वाटले काय तुम्हांला? खोटे आहेत मला विचारा." "नेसावा तर असा बुट्ट्यांचा काळा शालू नेसावा." "पण दुर्गाताई, नेसणारं माणूस गोरंपान पाहिजे, तर शालूची शोभा–" "आतां पांच वारी साड्या सर्रास झाल्या बरं कां आत्याबाई" "तर काय! आमच्या वेळेस लग्नांत बिनकासोट्याची बाई म्हणजे अपशकून म्हटला असता लोकांनीं." "अहो कसलं काय? आतां वरातीच्या वेळेससुद्धां कासोटा नको म्हणतात अलीकडच्या मुली." "वरातीची वेळ येते आहे कुठें सखूताई? "चार घटकांत सारीं लग्नं आटपताहेत"—अशा प्रकारचे संवाद आगाशी-तल्या टोळक्या–टोळक्यांत चालत, आणि खालच्या चौकांतला

देखावा बघण्यांत व एकमेकींशीं बोलण्यांत निवासांतला सारा स्त्रीसमाज घटकान् घटका रंगून जाई...

निवासांतले बाबालोक तर दाराशीं केळीचे खांब उभे करतांना माणसं दिसलीं कीं आतां आपला दिवस मोठा मजेंत जाणार असं समजून चुकत. आपापल्या संवगड्यांना बोलावून घेऊन घरांघरांतलीं छोटी मुलं वडील माणसांचा प्रतिबंधक हुकूम धाब्यावर बसवून टोळक्या-टोळक्यांनीं आंगणांत जमा होत, दारापाशीं वाजणारा बँड ऐकत उभीं रहात, आंगणाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत धांवाधांव करीत, खुशाल आपल्या घरचंच कार्य असल्याप्रमाणें वऱ्हाडी माणसांच्या गर्दीतही सामील होत, व पानसुपारी वाटणाऱ्या-कडून "अहो मला ! अहो मला" म्हणून पानसुपारी पुन्हां पुन्हां मागून घेत व कात-चुन्यावाचूनच पानांचे तोबरे तोंडात भरीत. शाळेचा दिवस असला तर शाळेची वेळ झाली की घरचीं माणसं त्यांना शोधायला येत आणि गुरांप्रमाणें वळवून शाळेंत रवाना करीत. पण सुटी असली कीं मग कांहीं विचारायलाच नको. सारा दिवस आंगणांत त्यांचा धुडगूस चाले...

आज रविवार होता त्यामुळें डॉक्टर निवासांत शिरून, वऱ्हाडी गुजराथ्यांशीं बोलून, हातांत पडलेल्या तांबड्या तांदूळांचं काय करावं या विचारांत आपल्या 'डी' ब्लॉकच्या जिन्याकडे वळूं लागले तेव्हां निवासांतल्या मुलांचीं टोळकीं इकडे तिकडे हुंदडतांन त्यांना दिसलीं, त्यांपैकीं एक टोळकं त्यांच्या अंगावरच येऊन धडकलं. टोळक्यांतल्या एका मुलानं त्यांना म्हटलं, "डॉक्टर! अहो डॉक्टर ! तुमच्या मैनाला पाठवून द्या ना खालीं. तिकडच्या मांडवांत आतां मिठाई वाटणार आहेत. आम्ही येऊं कां मैनाला न्यायला ?"

डॉक्टरांनीं पाहिलं तों वीरकरांचा नंदू त्यांच्याशीं बोलत होता. त्यानं आपला उजवा हात दाणींच्या अमूच्या गळ्याभोंवतीं टाकला होता. पुढाऱ्यामागें अनुयायी उभे असावेत त्याप्रमाणें निवासांतलीं आणखी पांच दहा पोरं त्यांच्या पाठीशीं उभी होतीं. निवासांतलं

सगळ्यांत खोडकर व दांडगाई करणारं म्हणून नंदूचं हें टोळकं प्रसिद्ध होतं.

डॉक्टर नंदूला म्हणाले, " मैनाला नाहीं पाठविणार मी. आणि नंदू ! अमू ! माझा ऐकाल तर तुम्हीसुद्धां मांडवाकडे मिठाई मागायला जाऊं नका. अरे तुम्ही काय आतां लहान आहांत ? दहा दहा अकरा अकरा वर्षांचे झालांत कीं ! लोकांच्या लग्नांत आपण असं जाऊं नये."

नंदू मनाशीं म्हणाला, " काय सांगतां राव ! लग्न कुणाचंही असलं तरी आपल्या निवासांत आहे कीं. त्यांची मिठाई घ्यायला काय हरकत आहे ?"...अमू-नंदूचे वेष पांचव्या वर्षीं असत त्याहून आतां जरा निराळे होते. जांभळ्या रंगाच्या जाड लांब्या चड्ड्या आणि लांब्या बाह्यांचे खाकी शर्ट त्यांच्या अंगांत होते. डोक्याचे केस विंचरण्याची थोडीशी कला त्यांना हस्तगत झाल्याचा पुरावा दिसत होता. दोघांचे तोंडावळेही पांच वर्षांत जरा पालटले होते. चर्येवरचा कोवळेपणा गेला होता. नजरेंतली मुग्धता गेली होती. त्याऐवजीं थोडा निब्बरपणा आला होता. वयाच्या पांचव्या वर्षीं नंदू थुंकीच्या पिचकाऱ्या मारीत असे, अमू बाटली तोंडाला लावून आवाज काढीत असे. आतां त्याचे चाळे निराळे होते. डाव्या पंजाच्या बोटावर उजवं बोटं घासून मोठ्यांदा फट्दिशी आवाज काढण्याचं प्रॅक्टिस अमू करीत असे. नंदूचा चाळा अधिक दांडगे-पणाचा होता. मागून हळूच जाऊन दुसऱ्याला खाड्दिशी चाट मारण्याचा अभ्यास त्यानं चालविला होता. निवासांतल्या दहा बारा निवडक दांडग्या पोरांचा नंदू नेता होता व अमू उपनेता होता...

डॉक्टरांचं बोलणं ऐकल्याबरोबर नंदू त्यांना म्हणाला, "आतांशा तुम्ही मैनाला आमच्यांत पाठवीतच नाहीं !" नंदू बोलत असतांना त्याला पार्श्वसंगीताची साथ दिल्याप्रमाणें अमू डाव्या पंजावर फाट फाट आवाज करीतच होता, व दोघांच्या पाठीशीं उभे राहिलेले अनुयायी आत्तांपर्यंत गोळा केलेल्या पानपट्ट्यांच्या आणि फुलांच्या

वाटणीवरून भांडत होते. मैनाबद्दलची तक्रार नोंदविल्यानंतर नंदूनं एकदम डॉक्टरांकडे पाठ वळविली, व आपल्या समस्त अनुयायांना त्यानं " चला रे " असा आदेश दिला. त्याबरोबर त्यासाऱ्या पोरांनीं हातांत हात घालून साखळी तयार केली आणि मांडवाच्या दिशेनं धूम ठोकली. त्या दौडणाऱ्या टोळक्याकडे पहात डॉक्टर क्षणभर थबकले...त्यांच्या मनांत आलं, हा नंदू आणि हा अमू दोन्ही पोरं भलतींच दांडगी होणार आहेत. ह्यांच्या आईबापांचं ह्यांच्याकडे अगदींच कसं लक्ष नाहीं !... पण लगेच त्यांनीं स्वतःला प्रश्न केला, माझं तरी लक्ष मैनाकडे आहे काय? आहे, परंतु असावं तितकं खचित नाहीं, असं उत्तर त्यांना द्यावं लागलं...असूं नये हा उघड उघड गुन्हा होता. स्वतःचा बचाव करण्यासाठीं डॉक्टर विचार करूं लागले,मुलांकडे अगदीं यथायोग्य लक्ष ज्याला पुरवितां येतं असा एक तरी बाप जगांत असेल काय? खरोखर मुलं तान्ही असतील, आईच्या कडेवर असतील, रांगत असतील, दुडुदुडु चालत असतील तोंपर्यंत तीं आईबापांचीं असतात. फार तर सातव्या आठव्या वर्षांपर्यंत. नंतर आपण त्यांना शाळेंत घालतों, व तेव्हांपासून हळूं हळूं आपण त्यांना दुसऱ्यांच्या स्वाधीन करूं लागतों. हलके हलके तीं आपल्यापासून दूर होतात. आपणही त्यांना शाळेंतल्या शिक्षकांवर म्हणा किंवा कुणा इतरांवर म्हणा सोपवितों. तीं वाढतात याचा अर्थ असा कीं त्यांच्यात व आपल्यांत अंतर वाढूं लागतं ! आपण त्यांना वाढवितों म्हणजे काय, तर त्यांना खाऊं घालतों, कपडेलत्ते देतों, शाळेंत पाठवितों, सिनेमा, नाटक, सर्कस दाखवितों इतकंच ! आपली जबाबदारी वाढते, मालकी संपूं लागते. मोठेपणीं त्यांनीं काय करावं याचा निर्णय आपल्याकडे रहात नाहीं...

अरे, किती गंभीर विचार करूं लागलों मी, असा स्वगत उद्गार काढून डॉक्टर जागच्या जागीं थबकले होते ते पुढें निघाले. नजर वर करून त्यांनीं पाहिलं तों साऱ्या ब्लॉकच्या आगाशींत बायकांची गर्दी झाली होती पण त्यांच्या स्वतःच्या ब्लॉकच्या आगाशींत कुणीदेखील उभं नव्हतं. आगाशी अगदीं रिकामी होती.

कारण अनुताई आजारी होत्या. आंतल्या खोलींतल्या कॉटवर त्या पडलेल्या असतील. आतां दहा वर्षांची झालेली मैना आईजवळ किंवा दुसऱ्या एखाद्या खोलींत बसलेली असेल. सारजा मोलकरीण सैंपाक करीत असेल. कदाचित् तारानं एखादा चांगला पदार्थ आणून दिलेला असेल...गेल्या कित्येक दिवस हें असं चाललेलं होतं...अनुताईंचं दुखणं कमी होण्याऐवजीं वाढत गेलं होतं. घरांत अहर्निश त्याची शुश्रुषा करायला कुणी नव्हतं. अचला बी. ए. पास होऊन आतां एम्. ए. चा अभ्यास करीत होती, पण ती पुण्यासच होती. खरं म्हणजे अनुताई एखाद्या नर्सिंग होममध्यें राहिल्या तर त्यांची शुश्रुषा अधिक चांगली होणार होती...

परंतु घर सोडून नर्सिंग होममध्यें जाण्याची गोष्ट काढली कीं अनुताई म्हणत "घरांतून कुठें हलणार नाहीं मी. काय व्हायचं असेल तें इथें होऊं दे." त्यांचा तो हट्टीपणा डॉक्टरना अगदीं मूर्खपणाचा वाटत होता. परंतु अनुताईंच्या इच्छेविरुद्ध वागण्याचा कठोरपणा त्यांना करायचा नव्हता. शिवाय अनुताईंच्या हट्टा-मागचा गुप्त हेतु त्यांना ओळखतां येत होता, व त्यामुळेंच त्यांच्या इच्छेविरुद्ध नर्सिंग होममध्यें ठेवण्याचा बेत त्यांना करतां येत नव्हता. मात्र कधीं कधीं त्यांना बायकोला स्पष्टच विचारावंसं वाटे. कीं "तूं नर्सिंग होममध्यें गेलीस कीं माझ्यावरचं बंधन नाहींसं होईल असं कां तुला वाटतं? मी आणि तारा तुझ्या गैरहजेरीचा फायदा घेऊं असं कां भय तुला वाटतं? तुझी भीति वेडेपणाची आहे"...परंतु तसं विचारण्याचं धैर्य त्यांना कधीं झालं नव्हतं. त्यांचे आणि ताराचे संबंध म्हणजे एक मोठा नाजुक विषय होऊन बसला होता. त्याची चर्चा तर करतां येत नव्हती! घरांतलं वातावरण मात्र त्या विषयानं दूषित झालेलं होतं!... डॉक्टरांना पुष्कळदां वाटे कीं आपल्या बायकोला सरळ सांगावं माझं प्रेम तारावर आहे, ताराचंही माझ्यावर आहे, परंतु तुला भय बाळगण्याचं बिलकुल कारण नाहीं. तारा फार विचारी आहे. फार म्हणजे फारच. एक वेळ माझा तोल जाईल. पण तिचा जाणार नाहीं. आणि ती माझा

कधीं जाऊं देणार नाहीं. तुला कल्पना नाहीं इतकी ती संयमी आहे... हे सारं अनुताईना सांगून टाकावंसं डॉक्टरांना फार वेळां वाटे. बोलण्यासाठीं ते तोंड उघडीत. परंतु पुन्हां त्यांना वाटे, नको. डॉक्टरांसारखे संसारी पुरुष जेव्हां एखाद्या परस्त्रीच्या प्रेमांत सांपडतात तेव्हां साऱ्या खऱ्या गोष्टी त्यांनीं बायकोला न सांगितल्यामुळेंच गृहदाह अधिक उत्पन्न होतो. ती दुसरी स्त्री वाईटच आणि दुष्टच असली पाहिजे अशी बायकोची समजूत असते; तिचे सद्गुण कितीही सांगितले तरी बायकोला खरे वाटणार नाहींत असं नवऱ्याला वाटतं; तो न बोलल्यामुळें बायको समजून चालते कीं माझा नवरा आणि ती दुसरी स्त्री दोघं मिळून माझा घात करीत आहेत. गृहदाह वाढत जातो...

डॉक्टरांच्या संसारांत हेंच घडत होतं...अनुताई दुखणाईत झाल्या होत्या...आपलं दुखणं त्या स्वतः वाढवून घेत होत्या. त्यांचं दुखणं मनस्तापांतून निर्माण झालेलं नव्हतं. खरोखुरीच शारीरिक व्याधि होती ती. परंतु दुखण्याचा त्रास त्या वाढवून घेत होत्या तें मनाच्या रागीट चिडक्या वृत्तीमुळें. खेळकर आनंदी वृत्ति त्यांनीं ठेवली असती तर त्यांचा आजार पुष्कळ सुसह्य झाला असता. पण त्या आजाराची व्यथा त्या आपल्या मनानं वाढवून घेत होत्या. एखाद्या चांगल्या नर्सिंग होममध्यें त्यांना ठेवण्याची डॉक्टरांची कल्पना योग्य होती. परंतु ती त्यांनीं अगदीं खुडून काढली होती. त्या म्हणाल्या होत्या, "घरांतून कुठें हलणार नाहीं मी. काय व्हायचं असेल तें इथें होऊं दे." डॉक्टरांचा आणि ताराचा प्रेमसंबंध आहेच व तीं दोघं मिळून केव्हां तरी आपला घात करणार आहेत, हा संशय त्यांनीं आपल्या मनांत पक्का रुजवून घेतला होता. पूर्वीं त्या हिंडत्या फिरत्या होत्या आणि महिलामंडळांत जात होत्या तेव्हां तिथल्या कांहीं बायांनीं त्यांच्या कानांत खोट्या नाट्या गोष्टींचं विष ओतलंच होतं. त्या बाया आतां त्यांच्या समाचाराला येत, आणि "बऱ्या व्हा बाई लवकर" असा वरकरणी आशीर्वाद जरी देत तरी डॉक्टरांबद्दल आणि ताराबद्दल चार कुजक्या गोष्टी

बोलल्याशिवाय रहात नसत. नवल असं कीं या कुटाळखोर बायका अनुताईंना अधिक जवळच्या वाटत. त्या येऊन बसल्या कीं त्या खुषींत आल्याप्रमाणें बोलत रहात. कधीं मधीं पुण्याहून येणारी अचला, स्वतः डॉक्टर, तारा, सारजा, किंवा आतां दहा वर्षांची झालेली मैना त्यांच्या अथरुणाशेजारीं बसलेली असली कीं त्यांच्या कपाळाला आठी पडलेली असे, हंसत खेळत एखादा शब्ददेखील त्यांच्या तोंडून निघत नसे...डॉक्टर दवाखान्यांत गेलेले नसले पण त्याच्याजवळ बसलेले नसले म्हणजे त्यांचं सार लक्ष डॉक्टरांच्या हालचालींकडे असल्यासारखी त्यांची चर्या असे. कुणाची चाहूल कोणत्या खोलींत होत आहे, कुठलं दार उघडलं जात आहे बंद होत आहे याचा कान देऊन अदमास घेत असल्याप्रमाणें त्याची नजर दिसे. खरोखर एखाद्या भ्रमिष्टाप्रमाणें त्या करीत...

जिन्याच्या पायऱ्या चढतां चढतां तिसऱ्या मजल्यावरच्या कुणा तरी माणसानं डॉक्टरांना कांहीं विचारलं त्याला उत्तर देत व त्या निमित्तानं उंच आवाजांत आणखी कांहीं बोलत डाक्टर शेवटचा जिना चढूं लागले. त्यांचा आवाज अनुताईंना ऐकूं आला. खोलीच्या एका दारालगतच्या टेबलाजवळच्या मैना पुस्तक वाचीत बसली होती तिला त्यांनीं विचारलं "हे आले वाटतं ? बघ पाहूं." मैना जागची उठली नाहीं. पुस्तकांत घातलेली मानही तिनं वर केली नाहीं. भूगोलाच्या पुस्तकांतलीं पिकं पाठ करण्यांत ती गुंतली होती.

आतां ती फार अभ्यासू मुलगी झाली होती. पांच वर्षांपूर्वींची कारभारी, चौकस, बडबडी, लाघट मैना ती हीच काय असा संशय तिला आतां पाहून येण्यासारखा होता. मुलांच्या आणि मुलींच्या वाढींत कसा फरक असतो पहा. नंदू–अमूचा कोवळेपणा गेला होता, त्यांच्या चर्या कांहींशा निबर दिसूं लागल्या होत्या. उलट मैनाचा कोंवळेपणा गेला नव्हता तर बदलला होता इतकंच. म्हणजे तिच्या चर्येंतली बालपणांतली कांति मावळली होती, परंतु एक नवाच आणि अधिकच मनोहर तजेला तिच्या नाका-डोळ्यांवर आणि अंगावर चढला होता. तिचं गोरं गोरं सौंदर्य

एखादी कळी उमलावी तसं उमलूं लागलं होतं. पांच वर्षांपूर्वी-प्रमाणें तिचे केस आतां लांडे नव्हते. त्यांच्या दोन वेण्या तिच्या खांद्यावर रुळत असलेल्या नेहमीं दिसत, आणि त्याच रंगाची रिबन वेण्यांच्या टोकांत गुंफण्याची आवश्यकता तिला कळूं लागली होती. शाळेंत जाण्याच्या वेळेस ब्लाऊझ आणि लांडा झगा ती घालीत असे व तिच्या पायांत पठाणी वहाणा असत. परंतु घरांत साधा परकर नेसूनच ती वावरत असे, आणि त्या पोषाखांत ती किंचित् ठेंगणी भासत असे. अनुताई जराशा स्थूल होत्या, व अचला त्यांच्या वळणावर जाणारसं पूर्वी वाटलं नव्हतं पण आतां वाटूं लागलं होतं. परंतु मैना मात्र मजबूत बांध्याची पण अजून तरी सडसडीत होती. लहानपणचं तिचं बाळसं आतां झडलं होतं. अंगाच्या कडा व कोपरे स्पष्ट दिसूं लागले होते. चेहऱ्याचाही गुबगुबीतपणा जाऊन नाका-डोळयांना रेखीवपणा येऊं लागला होता. ती पांच वर्षांची होती तेव्हां तिच्याकडे पहातांच कुणालाही वाटे, तिला उचलून घ्यावी आणि पापा घ्यावा. आता तिचं चुंबन देण्याचं पहिलं वय सरून गेलं होतं, दुसरं वय अजून दूर होतं. मात्र तिच्या-कडे बघतांच तिचा देखणेपणा आणि तिची कांति कुणाच्याही नजरेंत भरण्यासारखी होती...आणि सर्वांत मोठा महत्त्वाचा बदल हा होता कीं ती गंभीर होईल असं तिच्या लहानपणीं कुणालाच वाटलं नसतं, परंतु आतां तिच्या नजरेंत गंभीरपणा हळूंच डोकावूं लागला होता. अभ्यासाची फारच आवड तिला वाटूं लागली होती. तिच्या लहानपणीं तिचं चित्त कशावरच ठरत नसे. आतां अभ्या-साच्या पुस्तकांत एकदां तिनं तोंड घातलं कीं इतर साऱ्या गोष्टींचं तिला विसर पडे...अनुताई तिला काय म्हणाल्या तें तिनं ऐकलंच नाहीं...

अनुताई कान देऊन ऐकत राहिल्या. डॉक्टर दारापाशीं थांबतील आणि घंटा वाजवितील म्हणून त्या वाट बघूं लागल्या. पण घंटा वाजली नाहीं...दार वाजलं. पण तें समोरचं. फाटकांच्या ब्लॉकचं. अनुताईंच्या कपाळाला आठी चढली. त्यांच्या मनांत आलं, तिकडे

कशाला जायला हवं या वेळेस ?... डॉक्टरांचा आणि ताराचा आवाज त्यांना ऐकूं आला. पण दोघांचं बोलणं त्यांना समजलं नाहीं. डॉक्टर हंसले असावेत. अनुताई अगदीं कान टवकारून ऐकू लागल्या... "संध्याकाळीं ! विसरेन कसा ?" मग एकदम घरांतला घंटा वाजली. सारजानं दार उघडलं. डॉक्टर घरांत आले. कपडे काढण्यासाठीं आपल्या खोलींत गेले... आता रोजच्या क्रमाप्रमाणें धोतर नेसून व गंजिफ्रॉक घालून ते खोलींत येतील व अंथरुणाजवळ बसतील हें अनुताईंनीं ओळखलं... त्यांनीं डोळे मिटून घेतले.

त्यांच्याजवळ थोडा वेळ बसल्याखेरीज डॉक्टर जेवायला जात नसत. ते हंसत खेळत बोलले नाहींत तर त्यांना राग येई. परंतु उलट तसं बोलावंसं त्यांना वाटावं असं त्या वागत नसत. विचारलेल्या प्रश्नांचीं त्या उत्तरं देत एवढंच. मग डॉक्टर उठून जात, व तसं त्यांनीं उठून जावं याचा राग त्यांना येई. त्या मनाशीं म्हणत, ह्यांचं सारं हंसणं खेळणं तिच्यासाठीं आहे. मी कोण त्यांची ! त्यांच्या मार्गांतली धोंड ! आंत डॉक्टर जेवत असत. अनुताई अंथरुणावर पडून आंसवं गाळीत असत त्याची त्यांना कुठून कल्पना असणार ? मैना शाळेंत गेलेली असली कीं ते एकटेच जेवीत. मैना बरोबर असली तर त्यांच्या आणि तिच्या गप्पा चालत.

आज जेवायला बसल्याबरोबर मैनानं त्यांना विचारलं, "नाना, मी स्कॉलरशिपच्या परीक्षेला बसूं काय ?"

नानांनीं उत्तर दिलं "बैस ना. तुला स्कॉलरशिप मिळाली तर माझ्यावरचं तुझ्या शिक्षणाचं ओझं जरा कमी होईल."

"वा रे वा ! स्कॉलरशिपचे पैसे आम्ही तुम्हांला नाहीं देणार."

"मग काय करणार त्या पैशाचं ?"

"तें आमचं आम्ही ठरवूं. मास्तर म्हणतात तुला मिळेल स्कॉलरशिप."

"मास्तरना शिकवणी हवी असेल तुझी, म्हणून देत असतील चिथावणी."

" नाहीं कांहीं. त्यांची शिकवणी नाहीं ठेवायची. "

" पण मग तुझा अभ्यास कसा होईल ? स्कॉलरशिपचा अभ्यास फार असतो म्हणे. आम्ही कधीं स्कॉलरशिप मिळविली नाहीं तेव्हां आम्हांला कांहीं माहीत नाहीं. पण असतो ना फार अभ्यास ? "

" तर ! अन् परीक्षेला महिनाच उरलेला आहे. "

" मग कसं करणार तूं ? आपण नाहीं बाबा तुला कांहीं मदत करणार ? माझी चवथीची परीक्षा आज घेतली तर मी चक्क नापास होईन. चक्रवाढ राहूं दे, साध्या व्याजाचंदेखील उदाहरण मला सुटायचं नाहीं ! आणि बाबराचा मुलगा अकबर कीं अकबराचा बाबर तें मला नक्की सांगता येणार नाहीं. मी काय मदत करणार तुला ! "

" तुमची मदत नकोच आहे मला. तारामावशी करून घेणार आहे माझा अभ्यास."

" तारामावशी ? तिला काय कळतंय ? "

" वा ! चवथीची स्कॉलरशिप तिनं मिळविली होती महाराज ! "

" कुणी ? तारानं ? अग कांहीं तरी थापा देते ती तुला."

" बरं बरं, देऊं दे. स्कॉलरशिपच्या परीक्षेला मी बसूं कीं नाहीं तेवढं सांगा. "

" तूं तर सारं ठरवूनच टाकलं आहेस. आतां मी काय सांगायचं ? "

तितक्यांत घंटा वाजली. पोस्टमनची वेळ झाली होती. मैना घास टाकून खरकट्या हातानं धावली. औषधी कंपन्यांकडून येणारीं छापील पत्रं आणि कॅटलॉग " हीं तुझीं पत्रं " म्हणून डॉक्टर आतां तिला देत नसत. पण पोस्टमननं आणलेलीं पत्रं इतर कुणाच्या हातीं लागू न देतां हस्तगत करण्याची तिची हौस अजून कायम होती. नानांना तिच्याकडे पहातां पहातां हंसूं आलं.

मैना तीन पत्रं घेऊन परत आली. त्यांपैकीं दोन तिनं डॉक्टरां-पुढें धरलीं. तिसरं तिच्या नांवाचं होतं. " अक्काचं आहे " असं

म्हणून तिनं तें फोडलं. हात खरकटा असला तरी पत्र फोडल्या-वाचून तिला राहवत नसे.

डॉटक्रांनीं आपलीं पत्रं तशींच ठेवलीं आणि मैनाला विचारलं, " काय म्हणताहेत आक्कासाहेब ? "

पत्रांतलीं कांहीं वाक्यं मैनानं आधींच वाचलीं होतीं तीं तशींच सोडून पुढचा मजकूर ती मोठ्यांदा वाचू लागली,

"...गॅदरिंगला फारसा अवकाश नाहीं. इंग्रजी नाटकाच्या तालमी दोन चार दिवसांत सुरुं होणार आहेत. तेव्हां तो माझ्या मागं लागला आहे कीं तुझं होय नाहीं काय तें लवकर सांग म्हणून. आजच नानांना मीं निराळं पत्र लिहिलं आहे आणि त्यांचं मत विचारलं आहे. तो तर म्हणत होता कीं पत्र लिहूं नकोस, आपण मुंबईस जाऊन डॉक्टरना समक्षच विचारूं. पण मीं त्याला म्हटलं नको. खरं म्हणजे नाटकांत काम करायची मला फारशी हौस वाटत नाहीं. मला तें जमतंय तरी कसलं ? पण तो म्हणतो. . ."

डॉक्टर मोठमोठ्यांदा हंसू लागले.

मैनानं प्रश्नात्मक चर्येनं त्यांच्याकडे पाह्यलं.

डॉक्टरनीं विचारलं, " अग ' तो म्हणतो ' ' तो म्हणत होता ' ' तो माझ्या मागं लागला आहे ' असं आक्कासाहेबांच्या त्या पत्रांत लिहिलेलं मी ऐकतों आहे. पण ' तो ' कोण त्याचा काहीं पत्ता लागत नाहीं--"

" असं होय ? " मैनाही हंसली. " पत्रांतला जो मजकूर मीं आधीं वाचला होता त्यांत त्यांचं नांव येऊन गेलं त्यामुळें तुम्हांला सारखं ' तो ' ' तो ' ऐकावं लागलं. गंमतच झाली म्हणायची."

ती हसत राहिली. डॉक्टरही पुन्हां हंसले.

बाप-लेकींतलीं सारीं बोलणीं अनुताई अगदीं पाहिल्यापासून ऐकत होत्या. मैनानं आक्काच्या पत्रांतला मजकूर मोठ्यांदा वाचला तोही त्यांनीं ऐकला. आतां डॉक्टर आणि मैना हंसत होतीं ! वास्तविक त्यांना वाटायला हवं होतं, किती आनंदांत

आहेत माझी माणसं ! परंतु त्यांना तसं वाटलं नाहीं. उलट ज्यामुळें त्यांच्या कपाळावरची आठी आणखीच दुमडावी असे विचार त्या करीत होत्या. दोघांच्या बोलण्यांत ताराचा उल्लेख येतांच त्यांच्या मनाला जखम झाली होती. तारानं लहानपणीं स्कॉलरशिप मिळविली होती ! ( कुठली मिळवते आहे ? स्वतःची हुशारी मिरवण्यासाठीं खोटं बोलायला कमी करायची नाही ती !) मैनाचा अभ्यास तारा करून घेणार ! मैनाचे वडील संमति देतील नाहीं तर काय ! ताराकडे जाऊन घटका घटका बसायला त्यांना नवं निमित्त आयतं मिळेल ना ! ... आक्काचं पत्र मैना वाचीत आहे, आणि तिचे वडील हंसत आहेत. मी इकडे आजारी पडलें आहे पण यांची हंसणीं व्यवस्थित चाललीं आहेत. मी दृष्टिआड असलें कीं हीं सारी मजेंत असत त. सगळ्यांना अडचणच होते आहे माझी. मी वाटेवेगळी झालें कीं बरंच वाटणार आहे या सगळ्यांना ...अशा विचारांनीं अनुताईंचं अंतःकरण अगदीं पिळवटून निघालं. डोळ्यांवर बोट दाबून त्या रडूं लागल्या... किती चुकीचे विचार आपण करीत आहोंत असं स्वतःला विचारण्याचं भान आतांशा त्यांना रहातच नसे. आजारानं अंथरूणाला खिळून पडल्यापासून त्यांचं मन जितकं दुबळं तितकंच विकृत झालं होतं. स्वतःच्या शंका कुशंका व त्यांतून उद्‌भवणारे राग द्वेष तपासून पहाण्याची त्यांची इच्छा अगदीं पहिल्या पहिल्यांदा थोडी तरी जागी होती. परंतु आतां ती अगदींच झोपीं गेली होती. पांच वर्षे झालीं तरी आपल्या संसारसुखावर कोणतंच प्रत्यक्ष संकट आलं नाहीं हें ध्यानांत घेण्याऐवजीं " ताराशीं बोलणं चालणं तुम्ही बंद केलें पाहिजे " म्हणून आर्जवून, प्रसंगीं रडून भेकून सांगितलं तरी आपल्या नवऱ्यानं ऐकलं नाहीं याबद्दलच्या रागाची आणि तीव्र खेदाची जोपासना अनुताईंनीं गेलीं पांच वर्षे मनांतल्या मनांत सतत केली होती... सुमारें सहा महिन्यांपूर्वीपासून त्या आजारी झाल्यानंतर तर काय, त्यांचा विवेक आणि संयम सुटलाच. शंकेनं आणि मत्सरानं जळण्यांतच त्यांना समाधान वाटूं लागलं. कांहीं झालं कीं वाईट

विचार मनांत आणायचे आणि डोळ्यांतनं आसवं गाळायचीं असं, एक विचित्र व्यसनच त्यांना लागलं...

डॉक्टर हात धुऊन परत अनुताईंच्या खोलींत आले. जेवल्यानंतर पुन्हां अंथरुणाजवळ थोडा वेळ बोलत बसायचा क्रम त्यांनीं ठेवला होता. ड्रेसिंग टेबलावर एक चांदीची डबी होती ती त्यांनीं उघडली, आणि सुपारीचं खांड तोंडांत टाकलं. सिगरेट पेटवून ते अनुताईंजवळ बसणार होते. पण ड्रेसिंग टेबलाच्या आरशांत त्यांनीं पाहिलं तों त्या रडत असतांना त्यांना दिसल्या...त्यांच्या कपाळावर आठी उठली. सिगरेट पेटविण्याऐवजीं त्यांनीं सिगरेटची आणि काड्याची पेटी उचलून हातांत घेतली व ते आपल्या खोलींत निघून गेले. अनुताई-जवळ बोलत बसण्याचा विचार त्यांनीं सोडून दिला होता... आतांशा त्या रडूं लागल्या कीं डॉक्टरांना विलक्षण चीड येई. त्यांचं तें रडणं त्यांना शुद्ध मूर्खपणाचं वाटे...

पहिल्या पहिल्यांदा अनुताईंच्या डोळ्यांतलं पाणी पाहिल्याबरोबर त्यांचं मन द्रवत असे. त्यांची समजूत घालण्यासाठीं ते प्रेमानं बोलत. परंतु पुढें पुढें त्यांना कळून चुकलं कीं आपण कितीहि जीव तोडून सांगितलं तरी तें लक्षांत घेण्याची अनुताईंची तयारीच नाहीं. मत्सरानं त्यांचं मन वाकडं झालं होतं. आपली शंका सकारण आहे कीं अकारण आहे तें पाहण्याची त्यांची इच्छा नव्हती. “ताराशीं बोलणं चालणं सोडा तुम्ही” असा हट्ट त्या धरीत, तो डॉक्टरांना निखालस खुळेपणाचा वाटे, ते स्पष्ट नकार देत, “मूर्खासारखं कांहीं तरी नको बोलूस” असं तोडून म्हणत, अनुताई रडूं लागत. त्यांच्या त्या रडण्याविषयीं डॉक्टरांना सहानुभूति दाखवणं अशक्य होई... आतांशा तर त्यांच्या डोळ्यांत आंसवं आलेलीं पाहिलीं कीं डॉक्टरांच्या कपाळाला तिडीक येई. बायकोविषयीं सहानूभूति वाटण्याऐवजीं त्यांना संताप मात्र येई. नवऱ्यानं आपली समजूत घालावी अशी अनुताईंची अपेक्षा असे हें त्यांना कळत असे. परंतु कांहीं केल्या समजूत म्हणून घ्यायचीच नाहीं असं वागणाऱ्या बाईची समजूत घालायची कशी?...उठल्या सुटल्या रडायचं म्हणजे

काय ? डॉक्टरांना त्या रडण्याची आतां अगदीं किसळ येऊं लागली होती. नवऱ्याला जवळ ओढण्यासाठीं अनुताई रडत असत. परंतु त्याचा परिणाम होत होता तो बरोबर उलटा. त्यांच्या रडण्यामुळेंच त्या आपल्या नवऱ्याला अधिकाधिक दूर लोटीत होत्या !—

डॉक्टर आपल्या खोलींत गेले, एका खुर्चीवर बसले, आणि सिगरेट पेटवून ते झुरके घेऊं लागले.

जेवण आटोपल्यानंतर मैना थोडा वेळ सारजाशीं बोलत राहिली. लहानपणीं सारजाविषयींच्या तिच्या भावना मिश्र स्वरूपाच्या होत्या. कांहीं बाबतींत ती तिला आवडत असे, परंतु ती तिच्यावर रागवतही असे पुष्कळदां. नानांवर आईवर किंवा आक्कावर रागावण्यापेक्षां सारजावर रागावणं अधिक सोयीचं होतं हें ओळखल्यामुळें मनांतला कोणताही राग ती तिच्यावर काढीत असे, 'सारजिटली खापीटली' म्हणत असे. आतां यांत बदल झाला होता. सारजा वाईट नसून चांगली आहे हें तिला जास्त जास्त पटत गेलं होतंच, पण शिवाय अनुताईंचं औषधपाणी आणि खाणंपिणं वेळच्या वेळेवर बिनबोभाट ती पार पाडीत असे. घरांतली कर्ती बाई अंथरुणाला खिळली, पण सारजानं कांहीं उणं पडूं दिलं नाहीं. अचला घरीं आली कीं तिला काय हवं नको तें ती प्रेमानं बघे. मैनाला तर ती फारच मायेनं वागवी. कोणत्या गोष्टीबद्दल अनुताईंची जळफळ चालू आहे व तिचे घरांतल्या वातावरणावर कोणते परिणाम होत आहेत हें सारजाला समजत होतं. मैना समोर दिसली कीं ती मनाशीं म्हणे नवराबायकोंतली कुरबूर कशी कां असेना, तिची झळ या लहान जिवाला लागायला नको. आई दुखणाईत झाली म्हणून पोरीची आबाळ होऊन भागायचं नाहीं...सारजा मैनावर जास्तच ममता करूं लागली. तिची माया कळण्याइतकी मैना आतां मोठी झाली होती. ती सारजाला म्हणे "मला भात करायला शिकव" "मला पुऱ्या तळूं दे" "मला भजीं काढूं दे". तिचीं सैपाकाचीं हौस सारजाला आवडत असे व ती तिला सैपाकघरांत खटपट करूं देत असे. डॉक्टर जेवायला बसले कीं मैनानं विचारावं "नाना

पुऱ्या कशा झाल्या आहेत ? मीं केल्या आहेत बरं कां !" नानांनीं म्हणावं "होय कां ! तरी म्हटलं आज पुऱ्या विशेष खमंग कां लागताहेत !" सारजानंही दूर उभं राहून मैनाच्या घरकामाच्या हौसेची प्रशंसा करावी... सारजाविषयीं मैनाला आपलेपणा वाटूं लागला होता. एखाद्या मैत्रिणीजवळ मनांतल्या गोष्टी सांगाव्या त्याप्रमाणें ती तिच्याशीं कधीं कधीं बोलत राही...

नाना जेवून उठून गल्यावर सारजानं मैनाला विचारलं "आक्का नाटकांत काम करणार ? खरं म्हणतां ! मग त्यांना पगार मोठा मिळेल." मैनाला हंसूं आलं. "केवळ हौसेसाठीं गॅदरिंगच्या नाटकांत आक्का काम करणार आहे" असं सांगून गॅदरिंग म्हणजे काय त्याचा खुलासा तिनं केला...

मग ती उठली, हात धुऊन आईच्या खोलींत गेली. तिला वाटलं नाना तिथें बसलेले असतील, आपणही बसावं. पण नाना तिला दिसले नाहींत. आई रडतांना दिसली...आईचं रडणं पाहिलं की तिच्या मनाची मोठी चमत्कारिक अवस्था होत असे. ती पांच वर्षांची होती तेव्हांसुद्धां कांहीं तरी बिघडल्याचा संशय तिच्या मनाला हळूच चाटून जात असे. परंतु त्याचं कारण तिला अगदींच कळत नसे. आतां तिचा समज वाढला होता. तिला तर्क करतां येत होते. ती झोपलेली असतांना आईबापांतलीं कडवट बोलणीं क्वचित् तिनं ऐकलीं होतीं. तरीदेखील घरांत नक्की काय बिनसलं आहे त्याचा बोध तिला होत नसे. पण तो न झाला तरी तिला एवढं कळून चुकलं होतं कीं कशाबद्दल तरी आईचा तारामावशी-वर फार राग आहे, व तिच्या रडण्याचा धुसफुसण्याचा त्या रागाशीं संबंध आहे. तिला स्वतःला तर तारामावशी विलक्षण आवडत होती. ती मोठी होत गेली तशा तिच्या आवडी निवडी पालटल्या होत्या. सुतारमामांच्या सदूबद्दलचं आकर्षण उरलं नव्हतं, नंदूची मैत्री संपली होती, नव्या मैत्रिणी हव्याशा वाटूं लागल्या होत्या. तारामावशीबद्दलचं तिचं प्रेम बदललं नव्हतं, कीं तिळभर कमी झालं नव्हतं. अगदीं प्रथम दर्शनीं जडलेल्या प्रेमापैकीं तें प्रेम

होतं, आणि तें सतत वाढतच गेलं होतं...आईला फुसफुसतांना किंवा रडतांना बघून ती मनाशी म्हणे, तारामावशीवर हिचा राग असावा? चमत्कारच आहे म्हणायचा!... अनुताई तारामावशी-बद्दल कुजकं नासकं बोलल्या कीं तिला आश्चर्य वाटे. आणि बोलतां बोलतां अनुताई रडूं लागल्या कीं तिला रागानं गुमदरल्यासारखं होई. आईचं तें रडणं तिला अगदीं पसंत नसे, आणि लहानानं मोठ्यांना काय सांगायचं अशा विचारानं तिला बोलतां येत नसे. त्यांच्यापुढून ती उठून जात असे...

आतांदेखील आईला रडतांना पाहिल्याबरोबर तिनं तोंड फिरविलं व ती नानांच्या खोलींत गेली. ते सिगरेट ओढीत खुर्चीत बसले होते. दोन्ही पत्रं त्यांनीं शेजारच्या धाकट्या टेबलावर तशीच ठेवलीं होतीं. अचलेचं पत्रदेखील उघडलं नव्हतं. त्यांची चर्या विचारमग्न व गंभीर दिसत होती... मैनाच्या मनांत आलं, तिकडे आई रडते आहे, इकडे हे असे बसले आहेत! काय झालंय कुणास ठाऊक? बाकी कुणास ठाऊक काय, जे नेहमीं घडतं तेंच घडलं असेल... आईबापांतलं घर्षण घरांतला आनंद पदोपदीं नासवीत होतं. तें केव्हां आणि कसं संपणार होतं कुणास ठाऊक? त्याच्यापासून दूर पळणं एवढंच आपल्याला करतां येण्यासारखं आहे हें मैना उमजली होती. तीच गोष्ट ती नेहमीं करी. आतांही तिनं तीच केली. ती दुसऱ्या खोलींत गेली, आणि ताराकडे अभ्यासाला जाण्यासाठीं पुस्तकं काढूं लागली...

स्कॉलरशिपच्या परिक्षेचे दिवस जवळ येऊं लागले, तसा मैना जास्त अभ्यास करूं लागली. तिच्यावर भलता ताण पडूं नये अशा विचारानं तारा तिला आवर घाली. पण तिचा उत्साह कांहीं विशेष होता. स्कॉलरशिप मिळवायची ईर्षा तिनं धरली होती. शाळेंतून घरीं आल्याबरोबर ती ताराकडे धावे, आणि रात्रीच्या जेवणापुरती परत येई व पुन्हां ताराकडे जाई. अनुताई आजारी पडल्यापासून ती बापाकडेच निजूं लागली होती... ती निजायसाठीं उशिरां आली कीं डॉक्टर तिला म्हणत "किती ग अभ्यास करतेस!" ती

म्हणे, " करायलाच हवा ! तुम्हांला काय होतंय ? " तिच्या बोल-ण्याचं डॉक्टरांना हंसू येई. " बरं बरं " असं कांहीं तरी ते पुटपुटत व गादीवर मैना आडवी झाली कीं तिच्या अंगावर प्रेमानं पांघ-रूण घालीत.

परीक्षेच्या आदल्या दिवशीं रात्रीं मैना आली, आणि अंथरुणावर पडतां पडतां म्हणाली, " तुम्ही डॉक्टर असून काय उपयोग? "

डॉक्टरनीं विचारलं, " म्हणजे काय? "

" तारामावशीला चार दिवस किती ताप येतो आहे. मीं तिला म्हटलं, तुला बरं वाटत नाहीं, माझं शिकणं राहूं दे. पण ती म्हणाली, बरं नसायलं काय झालं, आणि एकीकडे ती असं म्हणाली खरं पण दुसरीकडे रडूं लागली. मीं तिला विचारलं, नानांनीं तुझी तब्येत पाहून औषध नाहीं कां दिलं तुला ? ती म्हणाली, दिलंय ग पण ताप काहीं कमी होत नाहीं. आज चार दिवस अंथ-रुणांत पडल्या पडल्याच माझा अभ्यास घेतला तिनं. आज तर तिचा ताप फार चढला आहे. अंगाला हात लाववत नाहीं..."

बोलतांना ती त्यांच्याकडे बघत होती. तिच्या नजरेला नजर देणं त्यांना भागच होतं. पण त्यांनीं जरी नजर वळविली नाहीं व चर्ये-वर चलबिचल दिसूं दिली नाहीं तरी त्यांच्या मनांत मात्र विचारांचं काहूर उठलं .... तारा तापानं चार दिवस आजारी होती ? ... साधं आश्चर्यदेखील अपल्या मुद्रेवर मैनाला दिसतां कामा नये ही गोष्ट त्यांना विसरतां येत नव्हती. तारानं मैनाला सांगितलं होतं, त्यांनीं तिची तब्येत पाहून औषध दिलं होतं. किती चक्क खोटं बोलली तारा ! केवळ बाह्य देखावा कायम राहावा म्हणून ! साऱ्या गोष्टी नेहमींसारख्या चालल्या आहेत असं मैनाला वाटावं म्हणून ! मैनाला संशय येऊ नये म्हणून ! खरी गोष्ट अशी होती, कीं डॉक्टरांनीं ताराला औषध दिलेलं नव्हतं. त्यांनीं तिची तब्येत पाहिली नव्हती. गेल्या चार दिवस तिला ताप येत आहे हेंदेखील मैनानं आत्तां सांगेपर्यंत त्यांना माहीत नव्हतं. कारण गेल्या सहा दिवसांत त्यांनीं तिची गांठ घेतली नव्हती. घरांतून बाहेर पडतांना अगर घरीं

परत येतांना ताराच्या दाराकडे बघणारी नजर त्यांनीं आवरली होती. तिच्याकडे जाण्यासाठीं वळणारीं पावलं रोखलीं होतीं ... या लहान मुलाला कसलाही संशय येऊं नये म्हणून तारानं तिला चक्क खोटं सांगतलं होतं !... आणि असं खोटं बोलण्याची पाळी त्यांनीं तिच्यावर आणली होती. बिचारी तारा ! किती धोरणी, किती सोशीक, किती प्रेमळ ! डॉक्टरांचं हृदय कळवळलं, आणि त्यांच्या मनांत आलं ताराची अशी चमत्कारिक केविलवाणी अवस्था करणारा कोण, तर मीच ना ! मीच ना ?...

बापाच्या मनांतल्या विचारांची मैनाला कोठून कल्पना असणार? ती पुढें सांगूं लागली, " आज तर तिच्या सोबतीलाही कुणी नाहीं. आबासाहेब दुपारच्या मलनं गेले सोलापुरला. त्यांच्या कंपनीचा चित्रपट तिथल्या थिएटरांत सुरूं व्हायचाय म्हणून. "

मनांतल्या विचारांनीं आपली चर्या फारच गंभीर झालेली दिसत आहे कीं काय अशी डॉक्टरना शंका आली. चर्या पालटण्यासाठीं ते एकदम हंसले. मैनाशीं खोटं काय बोलावं तें त्याच क्षणीं त्यांना सुचलंही. ते म्हणाले " झोपेचं औषध मीं देऊन ठवलेलं आहे. तें घेतल्यावर तिला चांगली झोप लागेल. तिचा ताप कांहीं काळजी करण्यासारखा नाहीं. साधाच आहे. सध्यां साथच आलेली आहे जराशी. बहुतेक उद्यां तिचा ताप निघेल. तूं कांळजी नको करूंस. उद्यां परीक्षेसाठीं लवकर उठायचंय ना तुला ? नीज बघूं. " त्यांनीं तिला हळूंच थांपटल्यासारखं केलं.पण ती कांहीं आतां पांच वर्षांची नाहीं दहा वर्षांची झाली आहे याची एकदम आठवण झाल्याप्रमाणें तिच्या गालावरचा हात त्यांनीं काढून घेतला.

खरं म्हणजे मैनाला वाटत होतं, नानांच्या जवळ न निजतां तारामावशीकडे जावं, तिच्या अंथरुणांत शिरावं, तिच्या कुशींत निजावं. ती लहान होती तेव्हां ती एकटीच दूर कधीं निजत नसे. कुणाच्या तरी कुशींत सदा झोंपी जाई. कुशींत निजण्याचं तें सुख आतां मागं राहिलं होतं. तें कितीही हवंसं वाटलं तरी मिळणारं नव्हतं. कारण ती आतां मोठी दहा वर्षांची झाली होती. लहानपणीं

मैनाला वाटे, मोठेपणाचे फार फायदे आहेत. मोठं व्हावं. अन् तेंदेखील लवकर. परंतु आतां कित्येकदां तरी तिला वाटे, आपण लहान होतों तेंच बरं होतं. मोठेपण तिच्या जवळ जवळ येत होतं. पुष्कळ वेळां तिला तें हवंसंही वाटे. पण उलट कितीकदां तरी तिच्या मसांत येई, आपल्याला नको यायला हें मोठेपण. आयुष्याच्या वाटेनं पुढें जाण्याऐवजीं मागं वळावं. पांच वर्षांपूर्वीं तिनं सरळ सांगितलं असतं, मी मावशीकडे निजायला जाणार. अनुताईंचा-देखील प्रतिबंध चालला नसता. ती ताराकडे धावत गेली असती. तिच्या कुशींत शिरली असती. तिची हनुवटी ओढीत म्हणाली असती "गोष्ट सांग." आतां ती तसं करूं शकत नव्हती. मनांतल्या विचाराचा उच्चार करण्यासदेखील तिला संकोच वाटला. तिच्या मनांत आलं, नानांना आवडायचं नाहीं ... कां कोण जाणे, तिनं एकदम विचारलं " आईला झोप लागली ? "

नाना म्हणाले, " होय. मघाशींच मी पाहून आलों. चांगली झोप लागली आहे तिला. तूं नीज आतां. "

मैनानं डोळे मिटले. डॉक्टरांनीं उशागतचं बटन दाबून दिवा मालविला. आणि मग अंधारांत डोळे उघडे ठेवून ते विचार करूं लागले ... " बिचारी तारा " हे दोन शब्द त्यांच्या मनांत सारखे येत होते, व एखाद्या तीक्ष्ण शस्त्राची धार बोचावी त्याप्रमाणें त्या शब्दांची धार त्यांना लागत होती. गेल्या सहा दिवसांत आपण ताराची गाठभेट कटाक्षानं टाळली हा शहाणपणा केला कीं दुष्टपणा केला हा प्रश्न त्यांच्या मनांत थैमान घालीत होता. कुठलं तरी खोलातलं एक मन म्हणत होतं, दुष्टपणा ! आणि त्या मनाला त्यांनीं हटकलं कीं तें विचारीत होत, कशासाठीं हा कठोरपणा तूं करतो आहेस ? केवळ बायकोला वचन दिलंस म्हणून ? असलं वचन तुझ्याजवळून मागून घेणारी बायको तुला शहाणी वाटते काय ? ...

सहा दिवसांपूर्वींची रात्र डॉक्टर आठवून पाहूं लागले ... झोपीं जाण्यापूर्वीं ते अनुताईंच्या खोलींत गेले होते. निजण्या-पूर्वींचा शेवटचा औषधाचा डोस ते त्यांना देऊं लागले होते ...

त्या म्हणाल्या होत्या " या औषधाऐवजीं मला थोडं विष पाजाल तर फार बरं होईल. मी सुटेन. तुम्ही सुटाल. "

डॉक्टरांच्या मनांत आलं, खाडकन थोबाडींत द्यावी. पण त्यांनीं सारा राग गिळून टाकला. अगदीं शांत स्वरांत ते फक्त म्हणाले " घे. "

परतु हातानं ग्लास दूर करीत अनुताईंनीं विचारलं, " किती वाजले ? "

" साडेअकरा. "

" कुठें होतात इतका वेळ ? "

" मैनाचा अभ्यास बघत बसलों होतों. "

" मैनाला शिकवितांना फार सुंदर दिसत असेल ती ! मैनाच्या अभ्यासाची बरी नवी सबब मिळाली आहे तुम्हांला. "

डॉक्टरांना पुन्हां वाटलं खाडकन एक ठेवून द्यावी. परंतु सारा प्रयत्न एकवटून ते शांत राहिले व म्हणाले " घे. "



डॉक्टरनीं विचारलं, " तुझं रडणं थांबायचंय तरी कधीं ? "

" मी मेल्याखेरीज नाहीं थांबायचं. "

मग मात्र डॉक्टर रागानं फाड फाड बोलूं लागले.

अनुताईदेखील बोलूं लागल्या. पण बोलण्यापेक्षां अधिक रडू

लागल्या. आणि बोलतां बोलतां व रडतां रडतां त्या एकदम अंथरुणांत उठून बसल्या, आणि वेड्यासारखे हातवारे करूं लागल्या. त्यांना वाताचा झटका आला होता . . .

तासाभरानं मैना परत आली होती. तिनं विचारलं होतं "आई निजली?" डॉक्टर म्हणाले होते "होय निजली." मैना तारामावशीकडे होती तेव्हां काय प्रकार झाला होता तें त्यांचं त्यांना माहीत होतं. अनुताईंना वाताचा झटका आल्यावर त्यांनीं त्यांना जसं औषध दिलं होतं तसच त्यांनीं शांतपणें झोपावं म्हणून त्यांनीं मागितलेलं वचनही दिलं होतं. नको हा गृहदाह अशा विचाराची उसळी त्यांच्या मनांत आली होती. त्या उसळीपुढें बाकीचे सारे सारे विचार क्षणमात्र लुप्त झाले होते. त्यांनीं मनाशीं ठरवलं होतं, ठीक आहे, माझं दुःख मी सोशीन, ताराचं दुःख ती सोशील, कुणी तरी शहाणपणा दाखविला पाहिजे खरा. मूर्ख माणसांपुढें शहाण्यांना शरण जावं लागतं हाच न्याय आहे. मूर्खपणा हेंच अधिक प्रभावी शस्त्र आहे म्हणायचं... त्यांनीं अनुताईंना वचन दिलं होतं... ताराच्या घरीं न जाण्याचं, तिची गांठभेट न घेण्याचं त्यांनीं कबूल केलं होतं... "आतां तर झालं?" असं त्यांनीं विचारलं तेव्हां अनुताईंच्या तोंडावर हंसू दिसलं होतं. त्यांच्या नजरेंत कसली तरी अपेक्षा चमकली होती. डॉक्टरांना तें ओळखतां येत होतं. परंतु अनुताईंचं चुंबन त्यांना स्वतःला अगदीं नकोसं वाटलं होतं . . . ते चटकन दूर झाले होते . . .

त्या रात्रीच्या या आठवणी करीत डॉक्टर आज आतां आपल्या एका मनाशीं भांडत होते. तें मन त्यांना पुनः पुन्हां विचारीत होतं, तुझ्यापासून तें वचन मागून घेणारी तुझी बायको शहाणी म्हणायची कीं काय? आणि सहा दिवसांत ताराचं दर्शनदेखील न घेण्याचा तुझा कठोरपणा न्यायाचा म्हणायचा कीं काय?

त्या प्रश्नांचीं निश्चित उत्तरं डॉक्टरांना देतां येईनात. ते प्रश्न विचारणाऱ्या मनाशीं ते कांहीं वेळ झगडत राहिले. परंतु मग त्यांनीं

ती झटपट सोडूनच दिली. आपण बायकोला वचन दिलं तें न्यायाचं कीं अन्यायाचं हा प्रश्नच त्यांच्या मनानं मागं टाकला. एकच विचार त्यांच्या मनांत उरला. तारा तापानं फणफणून अंथरुणावर पडली होती ! एकटी होती ! बिचारी तारा !...बिचारी तारा !...

कशाबद्दल तिला ही शिक्षा ? त्यांच्यावर तिनं प्रेम करावं हा गुन्हा होता ? कीं त्यांनीं तिच्यावर करावं हा गुन्हा होता ? तिनं तर आपल्या प्रेमाला सुविचाराचं आणि संयमाचं बंधन घातलं होतं. इतकंच नव्हे तर त्यांनाही संयम शिकविला होता. मग तिला शिक्षा कशासाठीं ? तिच्याशीं कठोरपणानं वागण्याचा त्यांना कोणता अधिकार होता ? गुन्हा त्यांचा होता ! तिच्यावर त्यांनीं आपलं मन जडूं दिलं हा जर गुन्हा असेल तर तिच्याशीं आतां निष्ठुरपणानं वागणं हा अधिक मोठा गुन्हा होता. तारा सर्वस्वी बेगुन्हा होती. आणि तिला ते शिक्षा देत होते !...

डॉक्टरांनीं आपल्या संसारी जीवनाचीं बावीस वर्षं आठवून पाहिलीं. ज्याला खरं प्रेम म्हणतात तें आपण बायकोवर कधीं केलं काय, असा प्रश्न गेल्या पांच वर्षांत अगणित वेळां त्यांनीं स्वतःला केला होता, तोच पुन्हां केला. अनुताईशीं गुण्यागोविंदानं त्यांनीं संसार केला होता. त्यांना दोन मुली झाल्या होत्या. पण अनुताई-विषयीं प्रेमाची भावना अगदीं उचंबळून अनावर झाल्याचा अनुभव त्यांना कधीं आला नव्हता. बायकोची संगत त्यांना होती. पण त्या संगतींत केवळ सद्‌भावनेपेक्षां अधिक कांहीं नव्हतं. लग्ना-पूर्वीही प्रणय नव्हता. नंतरही केवळ सौजन्य होतं. दीर्घ सहवासानं निर्माण झालेली ममता होती. पण प्रणय नव्हता. मुलं होण्याच्या आधीं, विवाहित आयुष्याच्या प्रारंभीदेखील, ते आणि अनुताई फक्त पतिपत्नीच होतीं. प्रियकर आणि प्रेयसी अशा नात्यानं तीं दोघं कधीं वागलीं नव्हतीं. कुणी कांहीं म्हणो, पण प्रेम हें मुख्यतः अनावर आकर्षणाच्या स्वरूपाचं आहे. थोडं गुणांचं आकर्षण, बाकीचं शरीराचं आकर्षण. एखाद्या व्यक्तीला ओढून जवळ घ्यावं आणि हृदयसंपुटांत ठेवावं, उलट स्वत्व विसरावं, सारा निराळेपणा

पुसून टाकावा, त्या व्यक्तीशीं मनानं शरीरानं अंतर्बाह्य एकरूप व्हावं, अशी जेव्हां इच्छा होते, आणि ती इच्छा उत्पन्न होतांनाच पराकोटीची उत्कट असते तेव्हां त्याला म्हणतात खरं प्रेम. अशा प्रेमाचा अनुभव अनुताईच्या बाबतींत डॉक्टरांना कधींदेखील आला नव्हता. . . पण चंद्रनिवासांतल्या या जागेंत ते राह्यला आले आणि एके दिवशीं सकाळीं ते दवाखान्यांत जावयास निघाले असतांना समोरच्या ब्लॉकच्या दारात उभी राहिलेली तारा त्यांच्या दृष्टीस अकस्मात् पडली तेव्हां मात्र त्यांच्या नजरेप्रमाणेंच त्यांच्या मनानं धांव घेतली होती. ज्या आकर्षणाचा आणि भावनेचा अनुभव त्यांना पूर्वीं कधीं आला नव्हता त्यांचे रोमांच त्यांच्या अंगावर एकदम उभे राहिले होते. . . दवाखान्यांत जातांना ते स्वतःशीं आश्चर्य करीत राहिले होते, यालाच प्रेम म्हणतात कीं काय ? ही कोण ?. . .

तारानं त्यांच्या मनाला वरचेवर आवर घातला नसता तर त्यांनीं तिच्याशीं लग्न केलं असतं. एक बायको जिवंत असतांना दुसरी करूं न देणारा कायदा त्या वेळेस नव्हता. . . अनुताईच्या विचित्र वागणुकीचा त्यांना जों जों जास्त मनस्ताप होऊं लागला होता आणि वीट येऊं लागला होता तों तों त्यांना वाटूं लागलं होतं, हिच्या सहवासांत सारा जन्म काढावा मीं ? आमचीं दोघांचीं मनं आतां पुन्हां सांधलीं जाणं शक्य नाहीं. मी हिला सुखी करीन अगर ही मला करील असा संभव अगदींदेखील उरलेला नाहीं. एका घरांत राहिलों तरी आमच्यांतलं अंतर कायमच राहील. आम्हां एकमेकांना हवीशी वाटणार नाहीं. आमच्या दोघांच्याही अंतःकरणांत गुप्त दुःख असेल, तिरस्कारसुद्धां असेल. मग तारालादेखील विचित्र दुःखांत पिचत कशासाठीं ठेवायचं ? . . . परंतु या विचाराला तारानं किंचित्‌देखील उत्तेजन कधीं दिलं नव्हतं. वसंतराव बर्व्यांची हकीगत तिनं त्यांना एकदां थोडीशी सांगितली होती. परंतु ती सांगून तिनं पुढें म्हटलं होत, “ आतां मी कधींच लग्न करणार नाहीं. माझं एकदां लग्न झालं तेव्हां प्रेम म्हणजे काय असतं तें मला कळलं नव्हतं. आतां प्रेम कळलं आहे पण लग्न मला वर्ज्य

मानलं पाहिजे." डॉक्टरांनीं तिच्याशीं वाद घातला होता. "मी कायमचा दुःखी राहूं काय?" असादेखील सवाल तिला टाकला होता. त्यांना वाटलं होतं तो प्रश्न ऐकतांच तिच्या मनाचा खंबीरपणा डळमळेल. पण तिनं दृढ स्वरांत उत्तर दिलं होतं, "राहिलांत दुःखी तर काय बिघडलं? एवढं दुःख सोसण्याचं बळ नाहीं तुमच्या अंगांत? कितीक बायका वैधव्याची भयंकर व्यथा जन्मभर सोसतात. तुम्ही तर पुरुषासारखे पुरुष आहांत. तुम्ही जन्मभर दुःखी रहाल हें मला समजत कां नाहीं? मीदेखील दुःखीच रहाणार आहे. पण त्यांतून सुटका नाहीं हें आपण उमजलं पाहिजे. अनुताईचं वागणं मला बिलकुल पसंत नाहीं. त्या मूर्ख, हट्टी आहेत. कुजकं नासकं बोलून त्या माझा अपमान करतात. पण हें सारं झालं तरी तुमच्या म्हणण्याला मी कधींच रुकार देणार नाहीं..."

ताराच्या प्रेमाची जशी डॉक्टरांना खात्री पटली होती त्याप्रमाणेंच तिच्या मनाचा थोरपणा त्यांना समजला होता. ती त्यांच्यावर अमर्याद प्रेम करीत होती. परंतु स्वतःला आणि त्यांना तिनं नेहमीं सांवरलं होतं...आणि अशा ताराशीं ते सहा दिवस कठोरपणानं वागले होते! केवळ गृहदाह शमविण्याच्या हेतूनं! केवळ वचन दिलं म्हणून! आणि वचन कुणाला दिलं होतं, तर ज्या पत्नीविषयीं त्यांच्या हृदयांत प्रेमाची भावना कधींदेखील उचंबळून आली नव्हती, आणि जिच्यांत व त्यांच्यात बावीस वर्षांचो संगत एवढं एकच बंधन होतं, त्या पत्नीला! . . .

अंधारांत अंथरुणावर पडल्या पडल्या डोळे उघडे ठेवून या साऱ्या आठवणी आणि हे सारे विचार करतां करतां डॉक्टरांना वाटलं, काय ही सारी चमत्कारिक गुंतागुंत! किती भावनांचे तंतू एकमेकांवर वांकडे तिकडे लपेटले जाऊन ही चमत्कारिक परिस्थिति तयार झाली होती! या गुंतवळ्यांत न्याय कोणता, अन्याय कोणता, उच्च विचार कोणता, नीच कोणता, खरी करुणा कोणती, खोटी दया कोणती तें निश्चित सांगणं खरोखर अशक्य होतं. इतरांना तर राहोच, पण त्यांचं त्यांना देखील! ज्या परिस्थितींत ते सांपडले

होते ती रंगविणाऱ्या कादंबऱ्या, नाटकं त्यांनीं वाचलीं होतीं. लेखकांनीं दिलेले निवाडे त्यांनीं वाचले होते. त्या पुस्तकांचं त्यांना हसूं येई. ते मनाशीं म्हणत ज्या विषयाचा अनुभव नाहीं त्याबद्दल लेखण्या सरसावून कशाला लिहितात हे लोक !... ज्या पेचप्रश्नाशीं डॉक्टरांना पांच वर्षे झटावं लागलं होतं तो अत्यंत गुंतागुंतीचा होता. केव्हांहि एकांतांत ते विचार करूं लागले कीं प्रश्न सुटण्याऐवजीं त्याची गुंतागुंतच त्यांच्या लक्षांत अधिक येई...

बिचारी तारा ! बिचारी तारा ! ... उलट सुलट विचारांच्या चक्रांत सांपडून शिणलेल्या त्यांच्या मनांत हा एकच उद्गार शिल्लक राहिला. तो उद्गार मनाशीं घोकीत ते किती वेळ पडले कोण जाणे ! खिडकींतून वाऱ्याची झुळूक आली तिच्यांतल्या गारव्यावरून त्यांनीं तर्क केला उत्तर रात्रीचा पहिला प्रहर असावा ... त्यांनीं मैनाकडे पाहिलं ! तिला अगदीं गाढ झोंप लागली होती ... त्यांनीं कानोसा घेतला. ज्या खोलींत अनूताई आणि त्यांच्या सोबतीला म्हणून सारजा निजली होती त्या खोलींत अगदीं शांत होतं. कसलीदेखील हालचाल होत नव्हती ... क्षणभर ते अगदीं स्वस्थ पडून राहिले. जणुं आपल्या मनाचा ठाव त्यांनीं घेतला ... मग ते उठले. कोणतंही दार न वाजेल अशी खबरदारी घेऊन ते आपल्या ब्लॉकबाहेर पडले. ताराच्या दाराशीं क्षणभर थांबले. आपलं डोकं दोन्ही हातांनीं घट्ट धरल्यासारखं त्यांनीं केलं, पण मग हात खालीं केले. घंटेचं बटन त्यांनीं दाबलं नाहीं. हळूंच, फक्त तारालाच ऐकूं जाईल इतक्या बेतानं, दारावर टकटक केलं आणि हांक मारली, "तारा !"

दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रथम कांहीं वेळ मैनाकडे, अनुताईकडे, सारजाकडे निरखून पाहून ते अदमास घेत होते कीं कुणाला संशय तर आलेला नाहीं ना ? कुणाच्या नजरेला नजर देण्याचा धीर त्यांना होत नव्हता. पण कांहीं वेळानं त्यांची खात्री पटली कीं कुणालाही कसलाही संशय आलेला नाहीं. त्यांना हायसं वाटलं. आपल्यापुढचा गुंतागुंतीचा प्रश्न आपण सोडविला असंदेखील त्यांना थोडंसं वाटूं लागलं. त्यांचे तीन दिवस मोठ्या आनंदांत गेले. मैनाची

परीक्षा संपली. तिनं सारे पेपर उत्तम लिहिले होते. त्यांच्या आनंदांत या समाधानाची भर पडली...त्यांना वाटूं लागलं, आतां माझ्या वाट्याला सुख आलं खास...

पण चवथ्या दिवशीं त्यांचा हा उल्हास एकदम संपला !

एका व्हिजिटसाठीं ते माथेरानला गेले, आणि परत आल्यावर त्यांनीं टपाल पाहिलं तों एका पाकिटावर ताराचं अक्षर त्यांना दिसलं. आजूबाजूस कोणी नाहीं असं पाहून त्यांनीं धडधडत्या अंतः-करणानं पाकिट फोडलं. आंतला कागद काढून ते वाचूं लागले. त्यांतलं पहिलं वाक्य वाचल्याबरोबर त्यांच्या अंतःकरणाला धक्काच बसला.

"मी गांवाला निघून जात आहे. माझे एक दूरचे मामा आहेत, त्यांच्याकडे. गेले तीन दिवस मी इथेंच राहिलें तें केवळ मैनाची परीक्षा चालू होती म्हणून. जी जबाबदारी मीं घेतली ती पार पाडणं मला भाग होतं. मैनाची परीक्षा संपली. आतां तुम्ही माझी परीक्षा पहाणार अशी मला भीति वाटते. तुम्ही हें काय आरंभलं होतं ! रोज रात्रीं माझ्याकडे कशाला आलांत ? माझ्या खंबीरपणाचा अंत कशाला पाहिलात ! या भलत्या परीक्षेंत माझा टिकाव लागायचा नाहीं. आजपर्यंत मीं तुम्हांला सावरलं. पण यापुढें स्वतःलाच सावरणं मला कठीण होणार आहे. तुमच्यावर माझं प्रेम आहे. फार प्रेम आहे. संयमाचा कितीही देखावा मीं केला तरी तुम्ही हवेत तुम्ही हवेत असा आक्रोश माझं अंतर्याम करतं. म्हणजेच असं कीं मी दुबळी आहे. मला जें कदापि करायचं नाहीं तें माझ्या हातून घडेल. तुमचं भय वाटतं मला. म्हणून तुमच्यापासून दूर निघून जाण्याचं मी ठरवीत आहे. मीं तुम्हांला कितीदां तरी सांगितलं होतं कीं गोष्टी अशा निकराला आणूं नका. कुणाचाही घात न करतां जेवढं शक्य आहे तेवढंच प्रेम आपण एकमेकांवर करूं.

जेवढा सहवास मिळतो तेवढ्यावरच समाधान मानूं. पांच वर्षे तुम्ही माझं ऐकलंत. आतांच कां हा वेडा हट्ट तुम्ही धरलात ? तुम्ही आतां माझं ऐकाल असं मला वाटत नाहीं. जें आजपर्यंत मीं टाळलं, व टाळल्याच्या अभिमानानं मी राहिलें तें घडायला नको. त्यापेक्षां हातांत आहे तेंदेखील टाकून दूर पळावं हेंच बरं ! तुमची भीति वाटते मला. आणि त्याहूनही जास्त स्वतःची. मला भेटण्याचा प्रयत्न कराल तर माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला. मला विसरून जा. देव तुम्हांला सुखांत ठेवो ! मी कितीही दूर गेलें तरी मनानं तुमचीच आहे. म्हणून --

तुमची तारा ''

: : ६ : :

मास्तरांनीं वर्गात प्रवेश केला. खुर्चीवर बसून ते वर्गाला उद्देशून म्हणाले " काढा पाहूं वाचन–पाठमाला. ' उषःकाल ' ही कविता उघडा. मागच्या वेळेस या कवितेंतल्या आठ ओळी मीं तुम्हांला समजावून सांगितल्या. आता पुढें. पुढच्या ओळी कोण वाचतंय ? मैना सुळाखे, तुम्ही वाचतां कां ? उठा. वाचा बघूं. "

मैना उठली. खरं म्हणजे मोठ्यांदा कविता वाचण्यास ती फारशी राजी नसे. आपला आवाज चांगला नाहीं याची तिला जाणीव होती. शाळेंत गायनाचा तास ती शक्य तों टाळीत असे. सुधा, उषा, शोभा अशा तिच्या मैत्रिणी किती चांगलं गात असत. शाळेंतल्या तासाच्या भरीला त्या एका संगीत विद्यालयांत शिकायला जात असत. शाळेंत कांहीं समारंभ असला कीं स्वागत गीत आणि वंदेमातरम् म्हणण्याची कामगिरी त्यांच्यावर असे. त्या वेळीं त्या मोठ्या नटून थटून येत आणि त्यांचा भाव वाढत असे. त्यांच्या सारखं आपल्याला गातां येत नाहीं याबद्दल प्रथम प्रथम मैनाला खंत वाटत असे. आपल्याला गातां येत असतं तर आपणही यांच्याप्रमाणें नटलों थटलों असतों आणि मिरवलों असतों अशा विचाराचा तिचा तो खेद असे. पण हळूं हळूं तिच्या मनांतला तो विषाद नाहींसा झाला होता. मैत्रिणींचा मत्सर करूं नये हें तिला समजूं लागलं होतं. देवानं आपल्याला चांगला गळा दिलेला नाहीं त्याला काय उपाय, त्याबद्दल वाईट वाटून घेण्यांत काय अर्थ, आणि इतरांचा हेवा करण्यांत कोणता शहाणपणा, इत्यादि गोष्टी तिनं मनाला शिकविल्या होत्या. गाणं हा आपला विषयच नव्हे, असं तिनं मनाशीं ठरविलं होतं. चित्रपटांतलीं गाणीं तिच्या वयाच्या

किती तरी मुली वेळीं अवेळीं गुणगुणत असत, मैनाला तीं गाणीं फार आवडत, परंतु तीं तोंडानं म्हणण्याचं धाडस ती कधीं करीत नसे... वर्गात मोठ्यांदा कविता वाचायलासुद्धां ती तयार नसे...

पण हे जोशी मास्तर असे खोडकर होते कीं वर्गात कविता वाचायची वेळ आली कीं ते नक्की तिचं नांव पुकारून तिला उभं करीत. अगदीं पहिल्या वेळेस तिनं त्यांना सरळ सांगितलं होतं, " सर, मला नका सांगू कविता वाचायला. "

त्यांनीं हंसत विचारलं होत " कां हो, कां ? "

" माझा गळा चांगला नाहीं सर. "

" मग मी कुठें तुम्हांला गायला सांगतों आहे ? "

वर्गातल्या साऱ्या चिमण्या पाखरांनीं हंसण्याची किलबिल केली. मैनाला शरमल्यासारखं वाटलं होतं.

जोशी मास्तर पुढें म्हणाले होते " अहो सुलाखे, कविता 'वाचायला' सांगतों आहे मी तुम्हांला. 'गायला' नव्हे. गोड गळा नसेल. पण गळा आहे ना तुम्हांला ? "

चिमण्यांचीं खुद खुद हंसण्याची चिंव चिंव पुन्हां झाली होती. जोशी मास्तरांनीं " शुक शुक ! हंसायचं नाहीं " म्हणून दरडावलं होतं.

मैना म्हणाली होती " सर, उषाला सांगा ना वाचायला. तिचा गळा किती गोड आहे. "

जोशी मास्तर हंसून म्हणाले होते " अरे तिच्या ! पुन्हां तेंच. अहो सुलाखे, हें कांहीं संगीत विद्यालय नाहीं. कवितेचा तास चालला आहे शाळेंतला. दुसऱ्या कुणालाही मी सांगणार नाहीं. तुम्हीच वाचा कविता. तुम्हांला त्रास द्यायसाठीं मी सांगतों आहे असं नका समजूं. कविता वाचायची किंवा म्हणायची म्हणजे गळा गोड असला पाहिजे ही समजूत तुम्ही टाकावी म्हणून सांगतों आहे मी तुम्हांला. हं वाचा. "

मग मैनानं कविता वाचली होती. आणि जोशी मास्तर म्हणाले होते " वा ! अगदीं उत्तम वाचलीत कीं. " वर्गांतल्या चिमण्या पुन्हां खदखदल्या होत्या. जोशी मास्तरनीं पुन्हां " शुः ! शुः ! " केलं होतं.

तेव्हांपासून कविता वाचून घ्यायची झाली कीं जोशी मास्तर नेमके तिच्या नांवाचा पुकारा करीत. ती आतां आढेवेढे घेत नसे. परंतु तरीदेखील आपला गळा गोड नाहीं याची जाणीव तिच्या मनांत असेच व तिला वाटे मास्तर कविता वाचायला न सांगतील तर बरं होईल.

आज आत्तादेखील ती उठली खरी, पण मनांतल्या मनांत कविता वाचायचं तें काम तिला नकोसंच वाटत होतं.

तितक्यांत शाळेचा शिपाई आला. त्यानं जोशी मास्तरांना एक चिठी दिली ती वाचल्याबरोबर ते म्हणाले, "सुलाखे, पुस्तक ठेवा खालीं. तुम्हांला हेडमास्तरांनीं बोलावलं आहे. "

मैनानं मोठ्या खुषीनं पुस्तक मिटून ठेवून दिलं, व ती वर्गांतून बाहेर पडली. शिपायाच्या मागोमाग जातां जातां तिच्या मनांत मात्र येत होतं, हेडमास्तरांनीं कशाला बोलावलं आहे कुणास ठाऊक ?

त्यांच्या खोलींत शिरून ती त्यांच्यापुढें उभी राहिली ती थोडीशी भ्यालेली थोडीशी गोंधळलेलीच. पण दुसऱ्याच क्षणीं तिला त्यांच्या तोंडावर हंसूं आलेलं दिसलं. मैनाच्या मनांत आलं, राग भरायसाठीं बोलावलेलं नाहीं दिसत. तिनं हळूंच विचारल, " काय सर ? "

ते हंसत म्हणाले " अशा इकडे या. " ती पुढें झाली तेव्हा त्यांनीं तिला जवळ घेतलं, आणि पाठीवर थोपटीत म्हटलं, " तुम्हांला शाबासकी द्यायची आहे. परीक्षेचा निकाल आत्तांच कळला. तुम्हांला पहिल्या नंबराची स्कॉलरशिप मिळाली आहे. आपल्या शाळेला पांच वर्षांनीं स्कॉलरशिप मिळते आहे. तुम्हांला फार फार शाबासकी द्यायला हवी. "

मास्तरांच्या त्या बोलण्यानं व थोपटण्यानं मैनाला साहजिकच

फार हर्ष झाला. ही स्कॉलरशिप मिळविण्यासाठीं किती कष्ट तिनं केले होते. किती जागून अभ्यास केला होता. आपल्या बुद्धीवर व स्मरणशक्तीवर केवढं ओझं घेतलं होतं! त्या साऱ्या धडपडीचं सार्थक झाल्यासारखं तिला वाटलं. तिनं सारे पेपर चांगले लिहिले होते, पहिला नंबर मिळेल असं तिला मनांतल्या मनांत वाटलं होतं, पण तिला खात्री नव्हती. आणि आतां मास्तर सांगत होते "तुम्हांला पहिली स्कॉलरशिप मिळाली"! एखादा अवघड मुक्काम गांठल्यासारखं तिला वाटलं. वेगानं हात मारून किनाऱ्यावर पोचणाऱ्या पोहणाऱ्याला वाटावं तसं तिला वाटलं. तिला विलक्षण आनंद झाला...

पण तो क्षणभरच!

कारण तिला एकदम तारामावशीची आठवण झाली!...तिनं स्वतः जसे खूप कष्ट केले होते तसेच तारामावशीनंही केले होते. तिनंही ईर्षा धरली होती. धीर दिला होता. कधीं तिला कंटाळा आला तर हंसून खेळून तो घालविला होता. जणुं परीक्षेला तारामावशीच बसणार होती. कोणते पेपर कसे लिहिले तें तिनं रोज विचारलं होतं. परीक्षा संपल्यावर ती म्हणाली होती. "आपल्याला स्कॉलरशिप मिळणार खास." आपल्याला!...

आज निकाल ऐकून तारामावशीला केवढा आनंद झाला असता! तिनं आपल्याला हृदयाशीं घट्ट धरलं असतं! आपण आतां लहान नाहीं याची क्षिति न बाळगतां आपले मुके घेतले असते. आपल्या अंगावरून फिरणाऱ्या तिच्या हातांच्या प्रेमळ स्पर्शानं आपल्या अंगावर रोमांच फुलले असते. स्कॉलरशिप मिळविल्याच्या आनंदावर या सुखाचा कळस चढला असता...

परंतु हें सुख आतां तिला मिळणार नव्हतं. आज ती घरीं गेली कीं जिन्याच्या पायऱ्यांवरून हरणाप्रमाणें उड्या मारीत जाऊन, तारामावशीच्या दारावर ठोठावून, "मावशी! मावशी!" म्हणून ती हर्षानं हांका मारूं शकणार नव्हती! तिच्या आनंदांत सहभागी व्हायला आणि तो आनंद शतपटींनीं वाढवायला मावशी घरांत होती

कुठें ? ती निघून गेली होती ! एकाएकीं ! तिला न सांगतां ! कां कुणास ठाऊक ? ... हें सारं मनांत आल्यामुळें मैनाचा आनंद फार ओसरला...

हेडमास्तर म्हणत होते, " डॉक्टरना फार आनंद होईल, नाहीं ? ते भेटले कीं मी त्यांना सांगणार आहे जिचा फार अभिमान धरावा अशी तुमची लेक आहे. तुमच्या मुलीचं नांव शाळेच्या बोर्डावर लिहिलं जाईल आतां. त्यांना म्हणावं पेढे पाहिजेत आम्हांला उद्यां पेढे घेऊन या बरं कां ? "



मैनाची चर्या बदललेली हेडमास्तरांना दिसली नसेल. परंतु मनांतल्या मनांत ती आणखीच हिरमुसली झाली. तिचा खेद वाढला. तिच्या मनांत आलं, मीं स्कॉलरशिप मिळविली म्हणून पेढे वाटावेसे वाटण्याइतका आनंद नानांना होईल ? ते आपल्याला जवळ घेतील ? कुरवाळतील ? शाबास म्हणतील ?...तिला खात्री वाटेना. किंबहुना त्यांच्याकडे धावत जाऊन " नाना माझा पहिला नंबर आला " म्हणून सांगण्याचा उत्साह आपल्या अंतःकरणांत आहे असंच तिला वाटेना ! आपलं अंतःकरण पूर्वीप्रमाणें राहिलेलं नाहीं, तें कोरडं

झालेलं आहे असं तिला वाटत होतं. कारण घरांतल्या वातावरणां-तला सारा ओलावाच आतांशा संपला होता. ती पहात होती तों नाना बदललेले तिला दिसत होते. एखाद्या यंत्राची आंतली स्प्रिंग तुटावी आणि त्याची हालचाल केवळ कुणी तरी ढकलल्यामुळें व्हावी तशी नानांची गत झालेली तिला दिसत होती. जणुं त्यांचं कशांतच लक्ष नव्हतं. त्यांना कसलीच आस्था वाटत नव्हती. कुणा-विषयींच जिव्हाळा उरला नव्हता....

पूर्वींदेखील घरांतलं वातावरण बिघडल्याचा संशय मैनाला वारं-वार येत असे. परंतु तो संशय केवळ आई आपल्याशीं ममतेनं कां वागत नाहीं एवढ्यापुरताच असे. त्या लहान वयांत आपल्या आईबापांत कांहीं वितुष्ट उद्भवलेलं असावं अशी कल्पना करण्यापर्यंत तिच्या बुद्धीची झेप जाण्यासारखी नव्हती. अनुताईच्या सूचक मर्म-भेदी उद्गारांचा अर्थ तिला कळण्यासारखाही नव्हता व तो कळण्याची गरजहि तिला भासण्यासारखी नव्हती. आई कसल्या तरी धुस्शांत आहे एवढंच तिला कळत असे, आणि तें कळलं तरी तिच्या फार वेळ मनांत राहण्यासारखं नसे. कारण आईशींच बोललं पाहिजे व तिच्याजवळच राहिलं पाहिजे असं कुठें होतं ? ती नानांकडे जाऊं शकत होती, तारामावशीकडे जाऊं शकत होती, आणि त्यांच्याकडून कधीं न चुकतां तिला प्रेम आणि कौतुकच मिळत होतं. रुसली आई तर रुसली, आपण तिच्याशीं गट्टी फू करूं, तिचं घर उन्हांत किंवा पावसांत बांधूं असं ती म्हणूं शकत होती. आईचं घर उन्हांत किंवा पावसांत बांधण्याच्या कामीं नाना आणि तारामावशी तिला नेहमीं मदतीचं आश्वासन देत, आणि ते मिळालं कीं आईला जरूर ती शिक्षा झाल्यासारखंच तिला वाटे व तिचा राग ती विसरून जाई. परंतु तरीदेखील, त्या वेळीं जरी ती फक्त पांच वर्षांची होती तरी तिला वारंवार वाटे, आपल्या घरांतलं वातावरण कांहीं ठीक नाहीं...

ती मोठी होत गेली, तिच्या घरांतल्या दूषित वातावरणांत कांहीं सुधारणा झाली नाहीं, आणि हळूं हळूं कांहीं गोष्टी ती तर्कानं

ओळखूं लागली. ज्या कुटुंबांत विसंवाद निर्माण झालेला असतो त्यांतल्या मोठ्या माणसांनीं कितीही काळजी घेतली तरी लहान मुलांच्या नजरेस कांहीं गोष्टी पडतातच, त्यांच्या कानांवर कांहीं बोलणीं येतातच; आणि दोन आणि दोन चार म्हणण्याइतपत मुलांचा समज वाढलेला असला कीं गुप्त राखलेल्या गोष्टी तीं ओळखतातच. मैना दहा वर्षांची झाली तेव्हा तिला बऱ्याच गोष्टी समजूं लागल्या होत्या. त्यांबद्दल तिनं कुणाला विचारलं नव्हतं, कुणी तिला स्पष्ट शब्दांत सांगितलं नव्हत. ते सारे तिचे तर्क होते. ते तर्कहि स्पष्ट, रेखीव नव्हते, अस्पष्ट संदिग्ध आणि अधांतरीच होते. मात्र काय झालंय, काय होतय, याबद्दलची तिची कल्पना जरी पुसट होती तरी दोषाची वाटणी तिनं केली होती पांचव्या वर्षीदेखील ती मनाशीं म्हणत असे, नाना चांगले आहेत, तारामावशी चांगली आहे, आणि आईला तर ती कधीं कधीं तोंडावरसुद्धां सांगत असे "तूं वाईट आहेस"! असे उद्धट शब्द आतां तिच्या तोंडून कधीं बाहेर पडत नसत. तिचा समज आतां वाढला होता याचा अर्थ तिचं मन गंभीर आणि खोल झालं होतं. कोणती गोष्ट मनांत आली तरी मनांतच ठेवावी तें तिला कळूं लागलं होतं. परंतु नाना व तारामावशी चांगली असं ती आतांही मनाशीं म्हणत असे, व तें अशा अर्थानं कीं नाना आणि तारामावशीचं बरोबर आहे, आईचं चुकतं आहे. घरांत कांहीं तरीं बिघडलं आहे हें तिला आतां अधिक स्पष्टपणानं कळूं लागलं होतं. परंतु लहानपणीं ज्याप्रमाणें तिचा मुग्ध आनंद कधीं संपला नव्हता त्याप्रमाणेंच आतांदेखील तिची आई कशीही वागली व तें वागणं तिला कितीही नापसंत असलं तरी त्यामुळें तिनं स्वतःचा उल्हास कधीं कमी करून घेतला नव्हता. कारण आतांदेखील नानांचा व तारामावशीचा तिला आधार होताच. त्यांचे प्रेमाचे आणि कौतुकाचे शब्द तिच्या हक्काचे होते. आई चांगलं वागत नाहीं तर तिच्यापासून दूर झालं म्हणजे झालं, असं ती म्हणूं शकत असे...

परंतु तिची स्कॉलरशिपची परीक्षा आटपली आणि दुसऱ्या

दिवसापासून केवळ आईची खोलीच नव्हे तर सारं घरच विचित्र वातावरणानं भरल्यासारखं तिला वाटूं लागलं. रुष्टता आणि खिन्नता केवळ आईच्याच खोलींत नव्हे तर सगळ्या खोल्यांत तिला भासूं लागली. जणुं तिच्या आईचं दुखणं घरभर पसरलं होतं. घरभरच नव्हे, तर समोरच्या फाटकांच्या घरांतसुद्धां! कुठं जावं, कुठें बसावं तेंच तिला कळेनासं झालं होतं. ती अगदीं बावरून गेली होती... मुख्य म्हणजे तारामावशी निघून गेली होती! नानांची वागण्याची तऱ्हा कांही चमत्कारिकच झाली होती... ते जेव्हां घरांत असत तेव्हांदेखील नसल्यासारखेच असत. त्यांचं मन दूर कुठें तरी असल्याप्रमाणें ते दिसत. आपण त्यांच्याजवळ गेलों तर नेहमींप्रमाणें त्यांची चर्या प्रफुल्ल होत नाहीं हें कळल्यापासून ती त्यांच्याजवळ जाईनाशी झाली होती. तिला पुष्कळदां वाटे, त्यांना अमुक सांगावं, तमुक विचारावं. पण सिगरेट ओढीत ते खुर्चीत पडलेले असतांना त्यांच्या चर्येकडे पाहतांच तिच्या मनांतली इच्छा थिजून जाई. ती जागच्या जागीं बसून राही. खिन्न! कष्टी! मनांतल्या मनांत गोंधळलेली!...

हेडमास्तरांनीं विचारलं, "काय? आणणार ना उद्यां पेढे?"

मनांतल्या विचारांतून मैना जागी झाली. तिनं त्यांच्याकडे पाहिलं. त्यांच्या प्रश्नाचा आवाज तेवढा तिनं ऐकला होता. शब्द तिला नीटसे समजलं नव्हते. म्हणून तिनं ते आठवून पाहिले. ते तिला आठवले. परंतु त्याबरोबरच घरांतल्या विचित्र परिस्थितिबद्दलचे जे विचार हेडमास्तरांचा प्रश्न ऐकतांच तिनं झटकन् तोडले होते त्यांचीही तिला पुन्हां आठवण झाली. तिच्या मनांत आलं, आपल्या घरांत खिन्नतेचं हें नवीनंच वातावरण नसतं तर मास्तरांना द्यायसाठीं पेढे खच्चितच आणले असते आपण. नानांनीं नाहीं कां म्हटलं असतं? आणि आतां तरी तिनं जर नानांना म्हटलं "मला पेढे वाटायचे आहेत" तर ते नाहीं कां म्हणतील? पण आतां त्यांच्याजवळ पेढ्यांसाठीं पैसे मागावेसे तिलाच वाटणार नव्हतं. तिच्या मनांत येत होतं, आपल्याला स्कॉलरशिप मिळाल्याची बातमी नानांना

सांगायचीदेखील नाहीं. त्यांना आपोआप कळेल तेव्हां कळेल... तिचे डोळे पाण्यानं भरून आले...बावरलेल्या नजरेनं तिनं इकडे तिकडे पाहिलं. एका भिंतीवर आशिया खंडाचा मोठा नकाशा फडफडत होता. चारी बाजूंना " यत्न तो देव जाणावा ", "मरावें परी कीर्तिरूपें उरावें" अशा वचनांच्या मोठ्या रंगीत अक्षरांतल्या पाट्या लावलेल्या होत्या. एका उंच घडवंचीवर पृथ्वीच्या गोलाचा स्टँड होता. एका उंच कपाटांत खेळांच्या सामन्यांत शाळेला मिळालेले चांदीचे पेले ठाली होत्या. भिंतीवर वाकडीं तिकडीं लावलेलीं कॅलेंडरं झुलत होतीं. एका बाजूस खूप उंचावर शाळेला मोठी देणगी देणाऱ्या धनिकाचं तैलचित्र होतं, परंतु त्यावर संपूर्ण अंधार असल्यामुळें त्याची सोनेरी फ्रेम तेवढी दिसत होती. एका कोपऱ्यांतल्या उंच घडवंचीच्या कप्प्या–कप्प्यांत जुन्या फायली, वह्या वाकड्या तिकड्या रचलेल्या होत्या. अगदीं वरच्या बाजूस शाईच्या रिकाम्या आणि भरलेल्या मोठमोठ्या बाटल्या होत्या, आणि त्या ठिकाणीं भिंतीवर शाईचे मोठाले डाग पडले होते... या साऱ्या वस्तूंवरून तिची नजर एकीकडे फिरत होती, दुसरीकडे तिच्या मनांतल्या दुःखाला उकळी फुटत होती... तिच्या डोळ्यांत आंसवं जमून थरथरलीं. हुंदका फुटणारसं तिला वाटलं...

तिनं मान खालीं घातली व हळूं आवाजांत विचारलं " जाऊं सर ? " हेडमास्तरांनीं काय उत्तर दिलं तिनं ऐकलंही नाहीं. ती दूर झाली. खोलीबाहेर पडली.

ती वर्गाच्या खोलींत गेली. आजूबाजूस न पहातां आपल्या डेस्काकडे जाऊं लागली. " काय पाहिजे हो ? "— घोगऱ्या आवाजांतला प्रश्न तिला ऐकूं आला. तो जोशी मास्तरांचा आवाज नव्हता. पोतदार मास्तरांचा होता. ती चमकून उभी राहिली. तिनं इकडे तिकडे पाहिलं. आपण चुकीनं भलत्याच वर्गांत शिरलों हें तिच्या लक्षांत आलं. ती भयंकर शरमली. हाकललेल्या मांजरा-सारखी ती बाहेर पळाली. त्या तुकडींतल्या मुली मोठ्यांदा हंसल्या तें तिला ऐकूं आलं. तिला आपलं रडणं आवरेना. गॅलरींत ती

उभी राहिली. तिनं आवंढा गिळला, डोळे पुसले, मग पुढें पावलं टाकलीं. वर्गावरची पाटी नीट पाहिली आणि मग ती आंत शिरली. जोशी मास्तर म्हणाले, " या सुलाखे. कशाला बोलावलं होतं हेडमास्तरांनीं ? "

कांहीं न बोलतां ती आपल्या जागेवर गेली.

" काय सुलाखे, आम्हांला सांगा ना. कशाला बोलावलं होतं हेडमास्तरांनीं ? डोळ्यांतून गंगा यमुना वाहिलेल्या दिसताहेत. छडी मिळाली वाटतं ? " भोवतालच्या साऱ्या चिमण्या हंसल्या. तें ऐकून मैनानं चिडून चेवानं उत्तर दिलं, " मला कधींच छडी मिळत नाहीं सर. "

" मग छडी नाहीं तर काय मिळालं ? सांगा कीं आम्हांला. "

" मला स्कॉलरशिप मिळाली सर. पहिल्या नंबराची."

" काय म्हणतां ? शाबास ! शाबास ! " जोशी मास्तर एकदम आनंदांत म्हणाले, " मुलीनो, तुमच्या वर्गांतल्या सुलाखेनीं आपल्या शाळेचं नांव राखलं पांच वर्षांनीं मिळते आहे आपल्या शाळेला पहिली स्कॉलरशिप. वा ! वा ! फार आनंदाची गोष्ट. या आनंदाप्रीत्यर्थ या तासाला मी सुटी देतों. "

तें ऐकल्याबरोबर चिमण्यांचा मोठाच चिवचिवाट झाला. मास्तर पुस्तक मिटून उचलून घेऊन वर्गांतून गेले. कित्येक मुली धांवत उड्या मारीत बाहेरच्या गॅलरींत गेल्या. कांहीं जणी मैना-भोवतीं गोळा झाल्या व तिचा झगा ओढीत म्हणूं लागल्या, "आम्हांला पेढे दे. आम्हांला पेढे दे. ' तितक्यांत तास संपल्याची घंटाच झाली. वर्गांतर्गांतल्या मुलींचे घोळके गॅलरींत जमले. मैना सुलाखेला स्कॉलरशिप मिळाल्याची बातमी हां हां म्हणतां पसरली. कित्येक मुली मैनाच्या वर्गांत धांवल्या. त्यांनीं तिला बाहेरच्या गॅलरींत ओढून नेलं, तिच्याभोंवतीं फेरच धरल्यासारखं केलं, आणि " पेढे ! पेढे ! " म्हणून त्या नाचूं लागल्या... मैना एकीकडे " होग ग बाई ! देईन ग बाई ! " असं म्हणून त्यांचा आनंद आवरीत होती, दुसरीकडे मनांतल्यां मनांत आपल्या गुप्त दुःखाचे

कढ आवरीत होती...

शाळा सुटल्यावर घराची वाट चालतांना तिच्या मनांतली खिन्नता कमी झाली नव्हती. उलट वाढली होती. इतका वेळ आपल्या थोरल्या बहिणीची आठवण तिला झाली नव्हती. पण आता ती होत होती. आणि त्या आठवणींतही सुख नव्हतंच. खेदच होता...

लहानपणीं आक्काबद्दलची तिची कल्पना इतकीच होती कीं ती आपली थोरली बहीण आहे, ती परगांवीं राहते, आणि फार मोठ्या शाळेंत जाते. आपल्या आईबापांची ती फार आवडती आहे. ती फक्त मधून मधून घरीं येते, आली कीं सगळ्यांना आनंद होतो. आपल्यासाठीं ती कांहीं तरी घेऊन येते, ती घरीं राहते तोंवर ती आपल्या खोड्या सहन न करतां राग भरते, एखादी चापटी किंवा धपाटाही लगावते, पण मग जवळ घेऊन मुके घेऊन समजूतही काढते. पण ती चांगली असली तरी फार वाईटही आहे. कारण परगांवीं जातांना ती आपल्याला कधीं बरोबरहि नेत नाहीं... अचलेबद्दलच्या तिच्या या साध्या सुध्या कल्पनेला धक्का देणारा जो प्रसंग घडला होता तो तिच्या लक्षांत फार दिवस राहिला होता. त्या वेळीं ती नानांच्या आगपेटींतल्या काड्या काढून त्यांच्या रांगा बनवीत होती. नाना, आई आणि अक्का यांचं कांहीं तरी बोलणं चाललं होतं. नानांनीं एकदम अक्काच्या थोबाडींत मारली होती. अक्का रडूं लागली होती ... तिच्या मनांतलं अचलेबद्दलचं साधंसुधं चित्र त्या प्रसंगानं जे पुसलं गेलं होतं तें कायमचं...त्यानंतर थोरल्या बहिणीबद्दलचं निराळंच चित्र तिच्या बालमनाच्या फलकावर उठूं लागलं होतं. आक्का बदलली होती. पूर्वीसारखी आनंदी खेळकर दिसत नव्हती. ती कमी बोलणारी, गंभीर, मनांतल्या मनांत कशा-बद्दल तरी कुढणारी दिसूं लागली होती. आई आणि नाना तिचं कौतुकहि करीनातसे झाले होते. घराच्या दूषित वातावरणांत भर पडली होती. आक्का अभ्यासासाठीं दूरच रहात होती, परीक्षा पास होत होती, मधून मधून घरीं येत होती, पुन्हां जात होती, पण

तिच्या घरीं येण्याला पूर्वीप्रमाणें उत्सवाचं स्वरूप राहिलं नव्हतं. '' आक्का येणार ! आक्का येणार '' म्हणून पूर्वी ती नाचत असे. पण आतां तसं नाचावसं तिला वाटत नसे...अशी जवळ जवळ पांच वर्षं गेलीं होतीं ...

आणि आतांशा तर अचलेचं घरीं येणं फार कमी झालं होतं. ती आली तरी नानांचं आणि तिचं हसत खेळत बोलणं चाललेल तिला दिसत नसे. आईची आणि आक्काची तर सदा कुरबुर चाललेली असे. त्या दोघींचं कशाबद्दल भांडण चाललंय हें मैनाला किती तरी दिवस कळलंच नव्हतं. त्या दोघी तडातडा एकमेकींना बोलत आणि दोघीहि रडूं लागत. मग आक्का रागानं कांहीं तरी बोलून आईच्या अंथरुणापासून उठून जाई एवढंच ती पहात असे. पण मागच्या वेळेस आक्का घरीं आलेली असतांना मात्र मैनाच्या मनांत एकदम प्रकाश पडला होता. कुणाशीं तरी लग्न करण्याचा आग्रह आक्काला आई करते, आणि आक्का तो मानीत नाहीं—असा कांहीं तरी प्रकार असल्याचा तिला संशय आला होता...पण आईच्या आणि आक्काच्या वादाचं कारण तिला कळलं एवढंच. त्यावरून भांडण कां व्हावं हें तिला कळेना. ती मनाशीं आश्चर्य करी, लग्न म्हणजे काय वाईट गोष्ट आहे ? आईनं आक्कासाठीं चांगला नवरा पाहून ठेवला असेल तर आक्कानं नाहीं म्हणून हट्ट कशाला करावा ? आईचं ऐकावं. चांगलं लग्न करताहेत तर करून घ्यावं. आक्काच्या जागीं मी असतें तर ही म्हटलं असतं ... पण ती पहात होती तों तिची थोरली बहीण दुराग्रहीच बनली होती, आणि त्यामुळें घरांतला पूर्वीचा एक आनंद नाहींसा झाला होता....

सारांश, शाळेंतून घरीं परत येतांना तिला आक्काची आठवण झाल्यामुळें मैनाच्या मनाची खिन्नता कमी होण्याऐवजीं वाढलीच. पहिली स्कॉलरशिप मिळविल्याची बातमी घेऊन ती घरीं चालली होती. पण तिच्या घरांत असं कुणीहि नव्हतं कीं ज्याला मिठी मारून तिनं बातमी सांगावी. आक्काला पत्र लिहून कळवावं असं तिला वाटलं नाहीं. कुणाजवळ कांहीं बोलायचं नाहीं असा निश्चय

मनाशीं करीत ती चंद्रनिवासांत शिरली व चौक ओलांडून जिन्याच्या पायऱ्या चढूं लागली. अवघ्या दहा वर्षांच्या कोंवळया वयांतल्या त्या बालिकेला त्या निश्चयाच्या यातना असह्य झाल्या. अगदीं जड पावलांनीं ती एक एक पायरी चढत होती ... बालकमंदिरांतून परत येतांना शाळेंत ऐकलेल्या गोष्टींतली राजकन्या आपण आहोंत अशी कल्पना करून, सारजा मोलकरणीच्या हांका न जुमानतां, पायऱ्यांवरून पुढें धांवणारी मैना पांच वर्षे मागं पडली होती. ती मोठी झाली होती याचा अर्थ हा होता. माणूस मोठं होतं, वाढतं, तें असंच ! ...

मनाशीं केलेल्या निश्चयाप्रमाणें मैना खरोखरीच वागली. तिनं कुणाला कांहीं सांगितलं नाहीं. ती जेवली, जरा वेळ वाचीत बसली, आणि ती नंतर झोंपी गेली.

रात्रीं किती वाजले होते कुणास ठाऊक, पण ती एकदम जागी झाली. तिनं पाहिलं तों सगळ्या खोल्यांतले दिवे लागले होते. आईच्या खोलींतून कुजबुज ऐकूं येत होती. एकट्या नानांचा आवाज नव्हता, आणखी कुणा तरी पुरुषाचा आवाज होता ... तिला चमत्कार वाटला ... तिला राहवेना ... हळूंच पांघरुण टाकून ती उठली, आईच्या खोलीकडे गेली, आणि दाराआडून बघूं लागली... आईची प्रकृती एकदम बिघडली असावी. नानांनीं आणखी कुणा तरी डॉक्टरांना बोलावून आणलेलं असावं. नाना आणि ते दुसरे डॉक्टर आईच्या अंथरुणाजवळ होते. सारजा दूर उभी होती. ती रडत होती...

तें पाहून मैनाचे हातपाय एकदम कांपूं लागले. ती पुढें झाली. सारजाजवळ गेली. तिला मिठी मारून तिनं तिच्या ओच्यांत तोंड खुपसलं व गुदमरलेल्या आवाजांत ती रडूं लागली...

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं अचला पुण्याहून आली. अनुताईनीं सांगितल्यावरून डॉक्टरांनीं तिला तार केली होती. तार मिळाल्या-बरोबर ती आली होती.

चार दिवस घरांतलं वातावरण असं कांहीं चमत्कारिक झालं

कीं मैना भांबावून गेली. नाना दवाखान्यात न जातां घरींच बसून होते. अनुताईंच्या प्रकृतींत सुधारणा होती, पण त्या अंथरुणांत पडून होत्या. अचला आली होती . . . सारीं माणसं घरांत होतीं. पण कुणी कुणाशीं आनंदानं मनमोकळं बोलत नव्हतं. मैना एक दिवस शाळेंत न जातां घरीं राहिली. पण मग घरांत राहूनच त्रास होतो असं वाटल्यावर शाळेंत जाऊं लागली. शाळा सुटली कीं घरच्या रस्त्यानं चालतांना तिच्या अंतःकरणांत काडीचा उत्साह नसे, तिला वाटे, कशाला जायचं घरीं ? शाळेंत जाण्यासाठीं घरांतून निघतांनाही तिला मनस्ताप होत असे. सारजा घाईघाईनं कांहीं तरी करून तिच्या पानांत वाढी. ती एकटीच टेबलाजवळ बसे, चार घांस खात असे, पानांवरून उठे, दप्तर घेई, दाराबाहेर पडे. " निघालीस काय शाळेंत ? " म्हणून कुणी तिला विचारीत नसे. " जातें " म्हणून कुणाला सांगावंसं तिला वाटत नसे. . .

आज तर सारजानं तिचं पान वाढलं, ती टेबलाशीं बसली आणि तिनं एक दोन घास घेतले न घेतले तोंच आईच्या खोलींतून आई नाना आणि आक्का यांची उंच आवाजांतलीं बोलणीं तिच्या कानीं पडूं लागलीं. थोड्या वेळानं आक्का रडक्या आवाजांत पण खूप तापून बोलूं लागली असं तिला वाटलं. हातांतला घास हातांतच ठेवून पानाकडे शून्य नजरेनं बघत तिनं कांहीं वेळ कानोसा घेतला. नाना फारसं बोलत नव्हते. आई आणि आक्काच तणतणत होत्या. बोलतां बोलतां हुंदके देत होत्या. . .मैना मनाशीं म्हणाली, जुनंच भांडण पुन्हां निघालेलं दिसतं आहे. . .चार पांच दिवसांपूर्वीं अनुताईंची प्रकृति एकाएकीं बिघडल्यापासून त्यांनीं डॉक्टरांजवळ ध्यासच धरला होता कीं माझ्या डोळ्यांदेखत अचलेचं लग्न करून टाका. डॉक्टरना अचलेच्या लग्नाची घाईही नव्हती, तें लांबलं पाहिजे असंही वाटत नव्हतं. घरांतल्या कोणत्याच गोष्टीबद्दल त्यांना उत्साह वाटत नव्हता. ते अनुताईंना म्हणत होते, " तुम्ही आणि तुमची लेक मिळून काय तें ठरवा. त्याप्रमाणें मी करीन. रावबहादूर भटांनीं आपल्या मुलासाठीं अचलेबद्दल मला विचारलं आहे.

मुलगा चांगला आहे. स्थळ उत्तम आहे. द्यायची असली अचलेला तर द्या. तुम्ही सांगाल तर त्यांच्याकडे निरोप पाठवीन मुलीला बघायला या म्हणून "... अनुताई अचलेला म्हणत होत्या, "कसं सोन्यासारखं स्थळ आहे— " अचला म्हणत होती. "सोन्यासारखं नाहीं, अगदीं हिरेमाणकासारखं असलं तरी मला तें नको."

"तुला लग्नच नाहीं कां करायचं ?"

"माझं मीं ठरवीन."

"बरं तुझं तूं ठरव बाई. पण—"

"अग आई, ठरव ठरव काय म्हणतेस नेहमीं ? नवरा म्हणजे काय बाजारांत मिळणारी वस्तु आहे कीं जी दुकानांत जाऊन मला द्या म्हणतां येईल ?"

"मग या भटांच्या स्थळाचा तरी विचार कर. तुला पाह्यसाठीं बोलवायचं कां त्यांना ?"

"पाह्यला कशाला हवं ? त्यांना सांगा आमची मुलगी कांहीं पांगळी नाहीं, आधळी नाहीं, धडधाकट आहे, शिकलेली आहे. किती हुंडा हवा त्याचा आकडा कळवा म्हणजे झालं. काढा एकदांची मला घराबाहेर—"

"बोल बाई बोल अशी. तुझी आई होण्याचा अपराध केला आहे खरा —"

"नाहीं नाहीं. अपराध माझा आहे ग. तुमच्या पोटीं आलें ना मी."

हुंदके, हळू आवाजांत रडणं, नंतर कांहीं वेळ सामसुम !

ताटांतल्या सुग्रास अन्नावर मैनाची वासनाच उरली नाहीं. समोरच्या खिडकींतून दिसणाऱ्या आभाळाकडे लागलेली तिची नजर शून्य होती. खोलींतल्या बोलण्याकडेही ती कांहीं आतां मुद्दाम लक्ष देत नव्हती. तिच्या कानांवर तीं येत होतीं इतकंच...

"... मी मेलें एक दिवस म्हणजे सुटलांत सारीं."

" आपलंच मरण असं सारखं घोकणं शोभत नाहीं. "

" माझं मरण दिसतंय माझ्या डोळ्यांना. मग घोकूं नको तर काय करूं? परवांच संपलं होतं सारं. तसाच अटॅक पुन्हां एकदां येईल, मरेन. मला सुखानं मरण येऊं दे एवढंच तुझ्याजवळ मागतें आहे— "

" म्हणजे त्यासाठीं मी मरण पत्करावं असं तुझं म्हणणं ! "

" लग्न म्हणजे मरण वाटतं ? "

" मरण कीं त्यापलीकडेही आणखी कांहीं तें तुला काय सांगायचं ? "

" हो तुम्ही सगळ्यांनीं मला गाढव ठरवलीच आहे— "

आणखी हुंदके; आणखी रडणीं, पुन्हां वाईट साईट बोलणीं !

मैनानं कांहीं वेळानं पुढ्यांतलं ताट दूर ढकललं, आणि हात धुवायसाठीं ती उठली. तितक्यांत मोठमोठ्यांदा कांहीं बोलत अचला दाराकडे आली, दारांतच थबकली, आणि मान बळवून मोठयांदा आईला म्हणाली, "हें अगदीं अखेरचं सांगतें! बोलण्याचा वीट आला आहे मला ! तुझ्या मनासारखं होऊं दे. पण हा विषय संपूं दे. नाना, पाठवा रावबहादुरांकडे निरोप मला पाह्यला या म्हणून. आईला दुःखानं मारलं अशी माझी अपकीर्ति तरी नको व्हायला. माझं काय व्हायचं असेल तें होईल— " ती तरातरा दाराच्या चौकटींतून दूर झाली, दुसऱ्या खोलीकडे धांवली, आंत शिरून तिनं दार जोरानं लोटलं तें धाडदिशी वाजलं.

शाळेची वाट चालतांना हा सारा चमत्कारिक प्रकार मैनाला आठवत होता...गेल्या महिनाभरांत तिच्या घरांतला आनंद किती झपाट्यानं ओसरला होता! एखाद्या भांड्याला तळाशीं भोकं पडावींत आणि कांठोकाठ भरलेलं पाणी बघतां बघतां झिरपून जावं तशांतली गत झाली होती... घरांत जें नवंच वादळ उठलं होतं त्याचं स्वरूप तिच्या नीटसं लक्षांत येत नव्हतं. परंतु जें काहीं घडत होतं त्यामुळें आक्काला फार दुःख होणार होतं एवढं खरं... आक्कानं धाडदिशीं दार लोटलं तेव्हां ती क्षणभर हतबुद्ध होऊन

उभी राहिली होती. तिचं शाळेंतलं दप्तर त्या खोलींत राहिलं होतं. कांहीं वेळ ती दारापुढें स्वस्थ उभी राहिली. पण मग तिच्या मनांत आलं, दार ढकलून बघावं, कदाचित् आंतून कडी नसेल. तिनं दार ढकललं. तें उघडलं गेलं. खोलींत जाऊन तिनं दप्तर घेतलं. आक्का अंथरुणांत पडली होती. पालथी उशींत तोंड खुपसून. हातांची मिठी उशीला घालून. तिच्याजवळ जावं,तिच्या अंगावरून हात फिरवावा, " कां रडतेस? मला सांग! " असं म्हणावं, अशी मैनाला फार इच्छा झाली. परंतु तिनं तसं केलं नाहीं. दप्तराचा पट्टा गळयांत अडकवून ती खोलीबाहेर पडली होती... शाळेंत निघाली होती... तिच्या मनांत येत होतं, आपलं घर आनंदानं भरलेलं पुन्हां कधीं दिसणारच नाहीं काय?...

परंतु नंतर दोन दिवसांनीं ती शाळेंतून अशीच घरीं परत आली तों घरांतलं वातावरण तिला बदललेलं दिसलं. जिकडे तिकडे अगदीं मुद्दाम झकपक केलेलं होतं, बाहेरच्या खोलींत कोचांवर खुर्चींवर भट्टीचे स्वच्छ अभ्रे चढले होते, मधोमध गालिच्यांची बैठक घातली होती. अनुताई अंथरुणावरच कां होईना परंतु उठून तक्क्याला टेकून बसल्या होत्या. सैपाकघरांत सारजाची गडबड उडाली होती. ट्रे, कपबशा, प्लेट्स, चांदीच्या वाट्या, चमचे इत्यादि सामान अगदीं लखलखीत होऊन टेबलावर पडलं होतं. कुणाची तरी वाट पहात असल्याप्रमाणें नाना इकडे तिकडे येरझारा घालीत होते. कडेच्या खोलींत अचला जरीची साडी नेसत होती ... मैनाला मोठं आश्चर्य वाटलं. नेहमींची खिन्नता, रुष्टता घरांत कुणाच्या चर्येवर दिसत नव्हती. कुणीच कुणाशीं हंसत खेळत बोलत नव्हतं. परंतु सारीं माणसं आपआपल्या ठिकाणीं कां होईना रोजच्याहून जरा निराळया वृत्तींत होतीं. घराला जरा घरपण आल्यासारखं वाटत होतं. कितीक दिवसांनीं तरी शाळेंतून घरीं परतल्याचा आनंद मैनानं अनुभविला. कितीक दिवसांनीं तरी कुणा-जवळ तरी जावंसं तिला वाटलं. ती सारजाला म्हणाली, " मला फार भूक लागली आहे. कांहीं तरी खायला दे. " " तयार आहे.

या कीं " असं हंसत म्हणून सारजानं फोडणीचे पोहे, करंज्या, चकली, लाडू एका मोठ्या बशींत घालून ती टेबलावर मांडली. खातां खातां मैनानं विचारलं, " आज काय आहे ग आपल्या घरांत ? "

" पाहुणे यायचे आहेत. "

" कुठल्या गांवचे ? "

" गांवचे कुठले ? इथलेंच. मुंबईतले. "

" राह्यला ? "

" छे ! छे ! पाह्यला ! राजाला दिवाळी माहीतच नाहीं वाटतं ?"

" मला सांग तरी. नुसती हंसतेस काय, सांग ना. " मैनानं हातांतला चमचा तिच्यावर उगारला. चटकन् हात उगारण्याची तिची लहानपणची संवय अजून कायम होती. " पाह्यला म्हणजे काय ? "

" अहो, आक्काताईंना पाह्यला येणार आहेत मंडळी. "

" म्हणजे आक्काचं लगीन होणार ? "

" देव करो न् तुमच्या तोंडांत साखर पडो. "

मैनानं मोठ्या आनंदानं खाणं आटपलं आणि हात धुतले. तितक्यांत अनुताई खोलींतून ओरडल्या " मैनाताई, जरा इकडे ये बाळ. " ती आईच्या खोलींत गेली, अनुताईंनीं तिला जवळ घेतलं. किती दिवसांनीं तरी त्यांच्या हातांचा तो स्पर्श झाल्यामुळें मैनाला फार बरं वाटलं. अनुताई तिला कुरवाळीत म्हणाल्या " हे शाळें-तले कपडे उतरायचे, आणखी सारजानं तुझं जरीकाठी खणाचं परकर पोलकं काढून ठेवलं आहे तें घालायचं. आपल्याकडे मंडळी यायची आहेत. आक्काताईला पाह्यला. लग्न ठरवायचं ना आक्काचं ? "

मैनानं हसत वर तोंड केलं आणि किती तरी दिवसांनीं आईच्या अंगाला अंग घासण्याची इच्छा तिला झाली...

तिनं परकर पोलकं घातलं तेव्हां अनुताईंनीं तिला पुन्हां जवळ घेतलं, आणि आपल्या हातांनीं तिचे केंस विंचरले व तिच्या तोंडाला पावडर लावली. तितक्यांत नाना खोलींत आले. तिला पहातांच

ते म्हणाले " ओ हो ! मैनाताईचा तर मोठाच थाट झाला आहे ! "

अनुताई हंसल्या आणि म्हणाल्या, " नवऱ्या मुलाला धाकटी मेव्हणीसुद्धां थाटांत नको कां दिसायला ? "

" तर तर ! आणि आम्ही सांगूं कीं आमच्या मैनाचा कांहीं नुसता कपड्यालत्त्यांचा थाट नाहीं. नुकतीच पहिली स्कॉलरशिप मिळविली आहे तिनं. सांगायच ना मैनाताई ? "

क्षणमात्र मैनाच्या मनांत रागाची लकेर उठली. तिला वाटलं, त्यांना म्हणावं वा रे वा तुमचं कौतुक ! इतक्या दिवसांत कधीं मला जवळ घेतलंत, कां शाबासकी दिलीत, कां माझं कौतुक केलंत ? मीं स्कॉलरशिप मिळविली ही गोष्ट जशी कांहीं तुमच्या गांवींदेखील नव्हती ! ... परंतु या विचाराची उसळी तिनं मनांतल्या मनांत दाबून टाकली. तिनं विचार केला, कधीं नव्हे तो घरांत आनंद भरला आहे. आपल्याकडून दुधांत मिठाचा खडा पडायला नको... नानांनीं तिला जवळ ओढलं तेव्हां तिनं ओढ घेतली नाहीं, पण त्यांचा हात सैल झाल्याबरोबर ती अचलेकडे पळाली...

अशी नटलेली थटलेली अचला मैनाच्या दृष्टीस पूर्वीं क्वचितच पडली होती. आरामखुर्चींत बसलेल्या अचलेच्या अंगावर जरीच्या साडीचा थोडासा बोंगा दिसत होता. परंतु गडद गुलाबी रंगाचा तो फुलोरा तिच्या गोरेपणाला शोभत होता. पोपटी चोळीच्या तंग बाहीमुळें तिचा गुटगुटीत हात खुलला होता. अंगाखांद्यावर मोत्यांचे दागिने घातल्यामुळें आतां जरा स्थूल होऊं लागलेली अचला मोठी ठसठशीत आणि देखणी दिसत होती. मैनाला पाहतांच तिनं हातांतलं मासिक टाकून दिलं आणि " अग बाई ! आमच्या मैनाताईच कां ह्या ! " असं म्हणून तिनं दोन्ही हात पसरले. मैनाताई तिच्या हातांत शिरली. गुडघे मोडून अचलेच्या मांड्यावर तिनं अंग टेकलं, आणि अचलेच्या गळ्यांतल्या कंठ्याशीं बोटांचा चाळा करीत मान वर करून ती बोलूं लागली.

" तुला पाह्यला यायचे आहेत. "

मैनाची अपेक्षा होती कीं अचला हंसेल आणि आपल्याशीं

पुष्कळ पुष्कळ बोलेल. परंतु तिनं पाहिलं तों अचलेनं तोंड वाईट केलं, आणि नुसती मान हालविली.

" तुझं लग्न होणार आहे ? "

आतां तर अचलेनं मानदेखील हालविली नाहीं. ती अगदीं गंभीर आणि गप्प झाली.

तिचा हात ओढीत मैना म्हणाली, " सांग ना, तुझ लग्न होणार ? "

उत्तर देण्याऐवजीं अचलेनं तिला ओढून वर घेतल, ऊराशीं घट्ट धरलं, आणि डोळे मिटून घेतले. किती दिवसांत आपल्या धाकट्या वहिणीला तिनं असं धरलं नव्हतं. घरांत कशाकडे तिचं लक्षच नव्हतं. मैनाकडेही नव्हतं. इतर माणसात आणि तिच्यांत जसं दूरत्व उत्पन्न झालं होतं तसंच मैनांत आणि तिच्यांतही झालं होतं. खरं म्हणजे व्हायला नको होतं. आई-वर आणि नानांवर ती रुसलेली होती. मैनावर रुसण्याचं कांहींच कारण नव्हतं. आणि तरी तिनं मैनाकडे दुर्लक्ष केलं होतं. अकारण ! आपण या लहान प्रेमळ मुलीचा अपराध केला अशा पश्चात्तापाचा विचार अचलेच्या मनाला बोचला. जणुं मध्यंतरीं उत्पन्न झालेलं दूरत्व पुसून टाकण्यासाठीं मैनाच्या अंगाभोवतालची हतांची मिठी तिनं आणखीच घट्ट केली. तिला बरं वाटलं. मैनानं तिची हनुवटी धरली आणि पुन्हां विचारलं " सांग ना ? तुझं लग्न होणार ? " तिनं डोळे उघडून मैनाकडे पाहिलं. मैनाच्या निर्मल, निरागस नजरेला नजर देतांक्षणीं तिला वाटलं तिच्याशीं बोलावं. खूप खूप बोलावं. अंतःकरणांत कोंडून धरलेल्या साऱ्या विचारांना वाट द्यावी... परंतु पुन्हां तिच्या मनांत आलं, नको. या बालिकेजवळ बोलण्यांत काय अर्थ आहे ? कुणाजवळच कांहीं बोलण्यांत अर्थ नव्हता. तिच्या मनांतल्या विचारांचं स्वरूपच असं चमत्कारिक होतं कीं तें मनांतल्या मनांत ठेवण्यावाचून गत्यंतर नव्हतं...

गेल्या चार दिवसांत तिला हजारदां वाटलं होतं, केवळ आईला सुखी करण्यासाठीं मी लग्न करून घ्यायला तयार झालें हें बरोबर

कीं चूक ? एकदां वाटे बरोबर. पुन्हां वाटे चूक. एकदां तिच्या मनांत येई, या लग्नापासून आपल्याला कितीसं सुख मिळणार आहे ? असतील भटांची माणसं चांगलीं, श्रीमंत, खानदानी. असेल मुलगा मोठा हुशार, कर्तबगार, हौशी ! परंतु ज्याचा माझा परिचयदेखील नाहीं त्याची पत्नी होऊं ? त्याला जन्माचा जोडीदार समजूं ? त्याचा संसार करूं ? त्याच्यापासून मुलं बाळं— ! त्या कल्पनेची तिला किळस येई आणि मग तिला वाटे आपली फार मोठी चूक होत आहे. आईला स्वच्छ सांगावं कीं मी हो म्हटलं खरं, परंतु नका ! मला नाहीं लग्न करायचं... परंतु या विचारांचा हलेकावा जसा तिच्या मनाला मिळे तसाच दुसराही एक विचार ती वरचवरकरा. तिला वाटे काय हरकत आहे लग्न करून घ्यायला ? मुली कितीही शिकल्या सवरल्या, शहाण्या झाल्या, प्रेम म्हणजे काय तें त्यांना कळूं लागलं, कुणावर तरी आपलं प्रेम बसावं, कुणी तरी आपल्या प्रेमांत सांपडावं असं त्यांना कितीही वाटूं लागलं, तरी बहुतेकींचीं लग्न अशींच होतात. वडील माणसं स्थळ पाहतात, सारं कांहीं ठरवितात, एके दिवशीं मंत्रांच्या आणि वाजंत्र्याच्या गजरांत डोक्यावर अक्षता पडतात, वैवाहिक जीवनाच्या मार्गानं पहिली सात पावलं मुली टाकतात. लग्नाच्या आधीं त्यांना प्रेम भेटत नाहीं, आणि नतर जें वाट्याला येतं त्यालाच प्रेम म्हणायला त्या हळूं हळूं शिकतात. अशा हजारों मुलींप्रमाणेंच मीही माझ्या मार्गाला लागेन आईच्या सुखासाठीं कांहीं तरी केल्याचं श्रेय तर मला मिळेल. पुष्कळ झालं !... माझं प्रेम एखाद्या पुरुषावर असतं तर गोष्ट निराळी होती !...

दिवाकराच्या प्रेमांत ती सापडली होती त्या गोष्टीला आतां पांच वर्षे झालीं होतीं. त्या प्रकरणांत स्वतःचा दोष तिला कबूल करावा लागला होता. तिची आई तिच्यावर रागावली होती, आणि नानानीं तर तिला संतापानं मारलं होतं.परंतु तरी त्यांचा दोष तिला म्हणतां येत नव्हता. त्या दोघांचं वागणं बरोबरच होतं. परंतु मनातल्या मनांत अशी प्रामाणिक सरळ कबुली देत असतांनाच—

किंबहुना द्यावी लागत असल्यामुळेंच— तिला आईचा आणि नानांचा राग येत असे. त्या रागाला स्पष्ट अर्थ नव्हता. कारण नव्हतं. आणि तरीदेखील त्या विचित्र अमूर्त, अकारण रागाची धुसफुस अचलेच्या मनांत सदैव राहिली होती. शिकण्यासाठीं म्हणून ती फार लहानपणापासून घरावेगळी राहिली होती, आणि त्यामुळें आईबापांच्या विषयीं एक चमत्कारिक रुक्ष निस्पृहता तिच्या ठिकाणीं निर्माण झाली होती. प्रीति किंवा ममता बहुतांशीं सहवासजन्य असते. आईबापांपासून दूर राहणाऱ्या मुलांना त्यांचं प्रेम नित्य मिळत नाहीं, आणि उलट मुलांनाहि नित्य सहवासानं जो जिव्हाळा वाटायचा तो वाटत नाहीं. त्यांच्यातल्या नात्याला एक प्रकारचा प्रासंगिकपणा येतो. मैनाच्या मनांत आईबापांविषयीं जो जिव्हाळा उद्भवला होता तो अचलेच्या मनात उद्‌भवला नव्हता. ती चटकन् आईबापांवर रागावे, आणि तो राग तिच्या मनांत दीर्घकाल राही. त्यामुळें दिवाकराच्या प्रकरणांत आईचं चुकलं नव्हतं, नानांचं चुकलं नव्हतं, हें तिला समाजत असूनही त्यांच्यावर तिनं उगीचच राग धरला होता व मनांत ठेवला होता.... ती शिकत होती, परीक्षामागून परीक्षा पास होत होती, मधून मधून घरीं येत होती, पण आईबापांविषयीं जिव्हाळ्याची ओढ तिच्या मनांत कधी उद्भवलीच नव्हती. मुलगे काय किंवा मुली काय मोठ्या झाल्या कीं हळूं हळूं त्यांच्या आयुष्याची स्वतंत्र वर्तुळं बनूं लागतात. त्या वर्तुळांत आईबापांचं स्थान कमी होऊं लागतं. अचला एक प्रकारें लवकर मोठी झाली होती. इतर मुलींच्या मानानं तिच्या आयुष्याचं स्वतंत्र वर्तुळ अकालीं तयार झालं होतं....

दिवाकराच्या प्रकरणांत ती आईवर आणि नानांवर रागावली ती केवळ कुणावर तरी राग काढायचा म्हणून. तिला खरा राग आला होता दिवाकराचा, आणि तितकाच स्वतःचा. दिवाकरानं तिला उघड उघड भुलथापा दिल्या होत्या; आणि ती अशी मूर्ख कीं त्याचं खरं स्वरूप तिला ओळखतां आलं नव्हतं. ती नालायक

होता ! आणि त्याच्या नादीं लागणारी ती स्वतः आंधळी, खुळी होती ! तिला पुष्कळदां वाटे, दिवाकर जिथें असेल तिथें जाऊन त्याला भेटावं, तडा तडा बोलावं, निर्भर्त्सना करावी, अपशब्दांची फैर झाडावी, आणि विचारावं, माझ्या भोळेपणाचा गैरफायदा घेतलास, शरम नाहीं वाटत तुला ! पण तें शक्य नव्हतं. दिवाकर तर शिक्षा होऊन तुरुंगांत गेला होता म्हणे. मग तिला कधीं कधीं असं वाटे कीं स्वतःचीच खूप खूप निर्भर्त्सना करावी, फडा फडा तोंडांत मारून घ्याव्या, आणि स्वतःलाच विचारावं अग अक्कल-शून्य पोरी, एका उनाड थापाड्या माणसाच्या जाळ्यांत सापडलीस ? तुला कांहीं शरम ? काय म्हणावं तुझ्या अविचाराला ? चार पांच वेळा एकांतांत तिनं हा प्रयोग स्वतःवर केलाही होता. परंतु माणसाचा स्वभाव मोठा विचित्र आहे. स्वतःच्या अपराधाबद्दल क्षमाशीलत्व माणूस चटकन दाखवितो. दुसऱ्यावरचा रुसवा मात्र त्याला लवकर विसरतां येत नाहीं. त्यामुळें दिवाकराच्या प्रकरणाची कालांतरानं जी एकंदर फलश्रुति अचलेच्या बाबतींत झाली ती इतकीच कीं बाकीच्या साऱ्या गोष्टी ती विसरली, आईबापांच्या विषयीं तिचं मन अधिकच रुक्ष आणि रुष्ट झालं, आणि पुन्हां कुणाच्या प्रेमांत म्हणून सापडायचं नाहीं असा तिनं निश्चय केला. नकोच ती प्रेमाची भुरळावण ! नकोच ते खेळ ! तो अनुभव ! तें मायावी सुख ! पुन्हां फसण्याची ती शक्यता !...

कॉलेजांतल्या पांच वर्षांत पुष्कळ तरुण पुरुषांशीं तिचा कमी अधिक परिचय झाला. अनेकांनीं तिचं कमी अधिक प्रियाराधन केल. परंतु तिला कुणाविषयींच फारसं आकर्षण वाटलं नाहीं. दिवाकराच्या अनुभवामुळें पुरुष तेवढे सारे थापाडे, फसवे, लबाड असतात असा अचलेनं ग्रह करून घेतला होता. आणि त्या ग्रहामुळें तिच्या मनोभूमीला असं काठिण्य आलं होतं कीं तिच्यांत प्रेमाच्या लाघवी भाषेचं बीं कुणी कितीही कौशल्यानं टाकलं तरीही तें रुजत नव्हतं. कुणाही पुरुषाची व तिची दाट मैत्री जमली नव्हती. तिचं कुणावरही प्रेम बसलं नव्हतं. अर्थात् स्वतःच्या

लग्नाचा विचार तिनं केला नव्हता ..आणि त्यामुळेंच अनुताईनीं जेव्हां आग्रहाची आणि त्राग्याची परकाष्ठा केली तेव्हां ती अखेर म्हणूं शकली होती " ठीक आहे, होऊं द्या तुमच्या मनासारखं. करीन मी लग्न. " एखाद्या पुरुषावर तिचं प्रेम जडलेलं असतं तर अशी संमति तिनं कधींच दिली नसती. तें जडलेलं नव्हतं म्हणूनच आईचा हट्ट तिला पुरवितां येत होता...

पण तरीसुद्धां तिच्या मनांत साहजिकपणेंच पुन्हां पुन्हां येत होतं कीं आपलं चुकतं आहे कीं बरोबर आहे ? पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या आयुष्यांत लग्नाचा निश्चय म्हणजे सबंद आयुष्यावर परिणाम करणारा निर्णय असतो. पलीकडच्या प्रदेशांत सुख किती वाट्याला येणार आहे आणि दुःख किती त्याचा अदमास करतां येत नसतांना त्या प्रदेशाची सरहद्द ओलांडण्यासाठीं पाऊल उचलणाऱ्या माणसाला तर त्या निर्णयाची फारच धास्ती वाटणं साहाजिक असतं. पलीकडच्या खोलींत प्रकाश आहे कीं अंधार आहे हें तर माहीत नाहीं आणि उंबरठ्याखालीं जाण्यासाठीं पाऊल तर उचललेलं आहे, अशा स्थितींतल्या माणसाचं मन जसं हेलकावे खाईल तसं अचलेचं मन उलट सुलट विचारांनीं हेलावत होत. मनांतले सारे विचार मनांतच ठेवावे लागल्यामुळें आपण जें करीत आहों तें हिताचं ठरणार आहे कीं अहिताचं याचा अदमास घेणं तिला आणखीच कठीण झालं होतं. विचार गिळून गिळून तिचा घसा दुखूं लागला होता. आंसवं आवरून आवरून डोळे चुरचुरूं लागले होते...मैनाला दोन्ही हातांच्या मिठींत धरल्याबरोबर आणि तिचा साधा भोळा प्रश्न ऐकल्याबरोबर तिला वाटलं, मैनाशीं बोलावं, खूप खूप बोलावं...पण पुन्हां तिच्या मनांत आलं, नको, बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

मैनानं तिची हनुवटी पुन्हां ओढली, आणि थोडा बदलून प्रश्न केला, " तुला पाहृला येणार आहेत ?"

अचलेनं मान हालविली.

मैनानं विचारलं, " पाहृला म्हणजे काय ग आक्का ? "

अचलेला एकदम हंसू आलं. तिच्या मनांत आलं, खरंच पाह्यला म्हणजे काय ? या साध्या प्रश्नाचं उत्तर मोठ्या सूज्ञ माणसांना तरी–जीं सूज्ञ माणसं मुली पाह्यला जातात त्यांना तरी देतां येईल काय ?–पाह्यला म्हणजे काय ?– तिला आणखीच हंसू आलं. ती मैनाला म्हणाली, " अग पाह्यला येणार म्हणजे मला नाक, डोळे, कान आहेत कीं नाहीं पहाणार. मी बोबडं तोतरं बोलत नाहीं ना, लंगडी पांगळी नाहीं ना पहाणार. माझे हातपाय शाबूत आहेत कीं नाहीं पहाणार—"

अचला सांगू लागली तेव्हां प्रथम मैनाला वाटलं ती खरोखरच आपल्याला समजावून सांगणार आहे. पण मग तिच्या लक्षांत आलं कीं तिनं आपली चेष्टा चालविली आहे. तें ध्यानात येतांच ती हंसली. पण लगेच तिला वाटलं आपण इतक्या गंभीरपणें विचार-लेला प्रश्न अचलेनं थट्टेवारी न्यावा यांत आपला अपमान आहे. तिनं भुंवयांना आठी घातली, अचलेवर हात उगारला आणि चिडक्या स्वरांत म्हटलं, " अं ऽऽ ! बघ हं. " तिनं अचलेची हनुवटी दूर ढकलली.

तितक्यांत दारावरची घंटा वाजली. डॉक्टर दाराकडे गेले. "या या !" म्हणाले. सारजा लगबगीनं आली, अचलेच्या खोलींत डोकावली व हातवारे करीत हळूं आवाजांत म्हणाली, " आक्काताई ! आक्काताई ! मंडळी आली ! "

मघापासून ' मंडळी ' ' मंडळी' हा शब्द मैनानं वरचेवर ऐकला होता. ही मंडळी म्हणजे कसले प्राणी आहेत ते बघूं या तरी अशी मैनाला जोराची इच्छा झाली. अचलेच्या हातांच्या मिठीतून स्वतःला सोडवून घेऊन ती धांवतच खोलीबाहेर गेली.

अचला खोलींत एकटी राहिली...

भटांची माणसं तिला पाह्यला आलीं होतीं. नवरा मुलगाही आला असेलच. तो आतां तिला पहाणार होता. ती त्याच्यापुढें उभी राहणार होती. बसणार होती. सुधारलेल्या रीतीप्रमाणें कदा-चित् चार शब्द बोलणारही होती. आणि या प्रसंगानं तिचं भवि-

नव्य ठरणार होतं. साराच चमत्कार होता. हास्यास्पद! तिरस्करणीय!... अचलेच्या मनांत एकदम आलं, छे छे, हें सारं चुकतं आहे!... चुकतं आहे!... तिला विलक्षण भीति वाटली! आपले आईबाप आपल्याला ढकलताहेत असा तिला भास झाला! त्यांचा संताप आला! 'कोण तुम्ही मला हें करायला लावणार?' असं ओरडावसं तिला वाटलं ...

तितक्यांत मैना धांवत आली. अचलेचे दोन्ही हात तिनं धरले. "आक्का, चल. नानांनीं तुला बोलावलं आहे" असं म्हणून ती अचलेला ओढूं लागली...

: : ७ : :

समोरच्या मोठ्या आरशांतलं प्रतिबिंब आपलंच आहे यावर मैनाचा क्षणभर विश्वास बसेना.

ज्या वयात आरशांत पाहतांना मुली स्वतःचं सौंदर्य निरखून पहातात तें वय अजून तिच्यापासून दूर होतं. ज्या वयांत ती होती त्या वयांत आरशासमोर उभं राहिल्यावर मुली स्वतःच्या रूपाकडे, नाक डोळ्यांकडे, वर्णाकडे सहसा बघत नाहींत. अंगावरच्या कपड्या-लत्त्यांकडे व दागिन्यांकडे त्यांचं लक्ष असतं. वस्त्रालंकार मनाजोगे दिसले कीं त्यांना वाटतं आपण सुंदर दिसत आहोंत आणि मना-जोगे म्हणजे त्यांच्या मनाजोगे. वडील माणसांच्या नव्हे. किंबहुना कोणते कपडे आणि दागिने शोभून दिसतात याबाबत मोठ्यांचं आणि लहान मुलांचं एकमत बहुधा होत नाहीं. आणि मुलांनीं अंगावर काय घालावं काय घालूं नये याविषयीं मोठ्या माणसांनीं सक्ति केली तर मुलांना सारखं वाटत राहतं आपण अगदीं वाईट दिसत आहोंत. कितीही चांगला थाटमाट केला असला तरी त्यांना तो नकोसा वाटत राहतो... समोरच्या आरशांत पाहतांना मैनाचं लक्ष स्वतःच्या देखणेपणाकडे नव्हतं, कपड्यालत्त्यांकडे होतं; आणि विशेषतः कलाबतूनं मढविलेल्या लाल मखमलीच्या चपला दुकानदारानं आत्तां तिच्या पायांत घातल्या होत्या त्याकडे होतं. दुकानदार म्हणाला होता " अगदीं फिट बसल्या आहेत. आरशांत बघा. " त्यानं तिचा हात धरून बाजूच्या एका मोठ्या आरशापुढें नेऊन उभं केलं होतं. त्या मोठ्या बिलोरी आरशांत एक गोरीपान सडपातळ उंच मुलगी उभी होती. तिच्या कानांत इअररिंग्ज चमचमत होते. गळ्यांत मोत्यांचा सर होता. अंगांत उंची रेशमी

पोलकं होतं. खालीं कोऱ्या बनारसी साडीचा बोंगा होता. हातांत मोत्यांच्या बांगड्या होत्या. पायांत लाल मखमलीच्या जरतारी चपला होत्या!...हें आपलंच प्रतिबिंब आहे यावर मैनाचा क्षणभर विश्वास बसेना...

तिच्या मनांत आलं, असा थाट मीं कधीं केला नव्हता !... इतक्या आनंदांत मी कधीं नव्हतें !...

भटांच्या मंडळींनीं अचलेला पसंत केली आणि तिच्या लग्नाचा मुहूर्त ठरला तेव्हांपासून मैनानं पाहिलं तों घरांत मोठी धांदलच उडून गेली होती. मुहूर्त जसजसा जवळ आला तसतशी ती धांदल वाढत गेली. बहुधा रोज कुणाच्या तरी घरीं अचलेला केळवणाचं आमंत्रण असे. अनुताई बऱ्या होत्या, परंतु घराबाहेर पडूं शकत नव्हत्या. त्यामुळें अचलेबरोबर मैनाला जावं लागत होतं. एरवीं शाळा बुडवून जायला ती तयार झाली नसती. परंतु या नव्या आनंदांत ती मनापासून गर्क झाली होती. ज्या त्या घरीं अचलेच्या बरोबरीनं तिचं कौतुक होत होतं. सारीं माणसं तिला म्हणत, " आक्काची करवली ना तूं ! आक्काच्या बरोबरीनं तुझा थाट पाहिजे बाई ! " जिथें तिथें तिची प्रशंसा होत होती. थोरल्या बहिणीच्या लग्नांत इतकी मौज आणि इतका आनंद आपल्या वाट्याला येईल अशी तिची कल्पना नव्हती. ती मागेल ते तिला मिळत होतं. नव्हे, मागण्याची गरजच उरत नव्हती. जरीकाठी बनारसी साड्या, जरीच्या खणांची पोलकीं, मोत्यांच्या बांगड्या, मोत्यांचा कंठा, असा सारा थाट माट मागितल्यावाचून तिला मिळाला होता. कलाबतूच्या चपला तेवढ्या तिला मागाव्या लागल्या होत्या. परंतु तिनं नांव काढल्याबरोबर अचला म्हणाली होती, " चल, तुला हव्या तशा चपला घेऊन देते " आणि तिला घेऊन अचला निघाली होती ...

आतां लग्नाचा दिवस फक्त तीन दिवसांवर आला होता. आज अचलेला घरचं केळवण होतं. मैनाला घेऊन अचला निघाली तेव्हां अनूताईनीं मोडता घातला होता, " आतां

कशाला ग जातेस ? जेवायसाठीं बोलावलेलीं माणसं घरीं यायचीं आणि तुम्ही दोघी बाहेर निघालांत ? तिसऱ्या प्रहरीं सावकाश गेलांत तर नाहीं कां चालायचं ? " परंतु कलाबतूच्या चपला केव्हां पायांत घालायला मिळतील असं मैनाला झालं होत. तिची ती इच्छा पुरी करायला अचला तिच्याहीपेक्षा अधिक उतावीळ झाली होती. " आत्तां येतें ग पंधरा मिनिटांत " असं आईला सांगून अचला मैनाला म्हणाली होती, " चल. " " तुमच्या मनांत आल्यावर तुम्ही काय ऐकणार ? " असं अनुताई पुटपुटल्या होत्या, पण त्यांच्या स्वरांत रागापेक्षां कौतुकच जास्त होतं... बाजारांतलीं चार पांच दुकानं पालथीं घालूनही मैनाच्या पायाच्या तयार कलाबतूच्या चपला मिळाल्या नव्हत्या. मैनाला तर घाई झाली होती आजच्या आज, आत्तांच्या आत्तां चपला मिळावयास हव्यात. एकेका दुकानांतून बाहेर पडतांना मैनाची स्वारी अधिका-अधिक रडकुंडीस येऊं लागली होती. अचलादेखील वाढत्या रागानं शेरा मारीत होती, सारीं दुकानं यूसलेस, हवं तें कधीं मिळायचं नाहीं. या दुकानदारानं मात्र ताबडतोब कलाबतूच्या चपला कपाटांतून काढल्या होत्या, आणि मैनाच्या पायाला त्या अगदीं बरोबर बसल्या होत्या. जणूं तिच्यासाठींच त्या बनविल्या होत्या व तिची वाटच पहात होत्या. त्यामुळें दुकानदारानं दाखविलेल्या आरशापुढें ती उभी राहिली ती अतिशय आनंदांत. तिनं समोरच्या आरशांत पाहिलं त्यांत दिसणारं प्रतिबिंब आपलंच आहे यावर तिचा क्षणभर विश्वासच बसेना...

तिला वाटलं स्वतःच तें प्रतिबिंब पोटभर पाहून घ्यावं. पण तिला एकदम लाजल्यासारखं झालं. तिनं मान वळवून अचलेकडे पाहिलं आणि विचारलं " चांगल्या आहेत ? घ्यायच्या ?"

अचला म्हणाली, " घ्यायच्या तर ! " तिनं दुकानदाराला किंमत विचारली, पर्समधून पैसे काढून दिले, दुकानदारानं पावती करून दिली ती पर्समधें ठेवली, तेवढ्यांत चपलांचा कागदी खोका मैनानं हातीं घेतला होता तिला म्हटलं " चला. जाऊं या ना ? "

अचलेनं दुकानाच्या द।.ाकडे तोंड वळविलं त्याच क्षणीं दुकानांत शिरणाऱ्या एका तरुणानं म्हटलं, " हल्लो ! " तिनं त्या माणसाकडे पाहिलं. तिनं त्याला ओळखलं. तिच्या चर्येवर आश्चर्य प्रगट झालं. आणि आश्चर्याच्या मागोमाग आत्यंतिक संताप दिसला.

परंतु त्या तरुण पुरुषानं तिच्या चर्येकडे दुर्लक्ष केलं. मैनाकडे पाहून तो म्हणाला " ओ हो हो ! मैनाताईच कां ह्या ! " त्यानं वाकून तिचं तोंड प्रेमानं हातांत धरलं आणि विचारलं, " किती छान वाढली आहेस ग मैना ! पण आज एवढा थाटमाट कशा-साठीं ? काय घेतलं तरी काय ? "

खोका उचलल्यासारखं करून मैना म्हणाली, " कलाब्रतूच्या चपला. "

" कुणासाठीं ? "

" माझ्यासाठीं ! "

" आज वाढदिवस आहे कीं काय तुझा ? "

" वाढदिवस कुठला आला आहे ? लग्न ! "

" तुझं — ? " तो तरुण पुरुष हंसला.

नेहमींच्या संवयीप्रमाणें मैनानं खोक्यासकट हात उगारला आणि म्हटलं, " अं ऽ ऽ ! माझं नाहीं ! आक्काचं लग्न आहे. "

अचलेनं मैनाचा हात खसकन् ओढला आणि म्हटलं, " पुरे पुरे. चल. " आक्काच्या त्या अचानक रागाचं कारण मैनाला सम-जेना. तोंड वाईट करून ती अचलेच्या मागोमाग बाहेर पडली.

दुकानांत शिरलेला तो तरुण पुरुषही बाहेर पडला व अचलेच्या उजव्या अंगाला मैना होती म्हणून तिच्या डाव्या बाजूनं तिच्या बरोबर चालूं लागला. मैनाला कळेना तो कोण आहे तें व आक्का-बरोबर कां पावलं टाकीत आहे तें.

अचला इंग्रजींत म्हणाली, " जा ! जा ! आणि मेहेरबानी करून मराठींत बोलूं नकोस. जा ! जा ! "

तो तरुण पुरुष इंग्रजींत म्हणाला, " माझ्या सुदैवानं भेटलीस,

आणि न बोलतांच जाऊं कसा ? ”

“ मेहरबानी कर आणि जा. इथें रस्त्यांत देखावा करायचा आहे कां तुला ? ”

“ मला खूप खूप बोलायचंय तुझ्याशीं. ”

“ परंतु मला मुळींच बोलायचं नाहीं तुझ्याशीं. तुझी लायकी नाहीं—”

“ तेंच सांगायचं आहे तुला. ”

“ मला ऐकायचं नाहीं. जा रे बाबा ! मेहेरबानी कर माझ्यावर. जा ! ”

तो म्हणाला, “ पुन्हां कुठें भेटशील सांग म्हणजे जातों. ”

“ तोंडसुद्धां पाहणार नाहीं तुझं. ”

“ पण मी काय म्हणतों तें तुला ऐकलंच पाहिजे. ”

“ नाही ! नाहीं ! ”

“ माझ्यावर मेहेरबानी म्हणून— ”

“ नाहीं ! नाहीं ! जा म्हटलं ना ? ”

“ असाच तुझ्याबरोबर घरापर्यंत येईन आणखी— ”

ती म्हणाली, “ फार शहाणा आहेस ! ”

“ शहाणा म्हण मूर्ख म्हण, पण मलां तुझ्याशीं बोललंच पाहिजे. ”

“ नको रे नको ! जा ! तुझं ऐकून काय करायचंय मला ? मैनानं काय सांगितलं तें ऐकलंस ना ? आणखी तीन दिवसांनीं माझं लग्न व्हायचं आहे. ”

“ म्हणूनच माझं म्हणणं तुला ऐकायलाच हवं. तुझी माझी भेट व्हायलाच हवी— ”

“ शक्य नाहीं !— ”

तरी तो म्हणाला, “ कुठें भेटशील सांग. ”

अचलेनं फक्त जोरानं मान हालविली, ओठ दातांखालीं दाबला.

तो म्हणाला, “ पूर्वी ज्या बस स्टॉपवर येत होतीस तिथेंच ये.

त्याच वेळेस, मी तुझी वाट पाहीन— "

अचला पुन्हां जोरानं मान हालवून म्हणाली, " तुझ्या पायां पडतें, जा. लोक आपल्याकडे पाहताहेत बघ. जा ! "

" जातों. पण लक्षांत ठेव. संध्याकाळीं बस स्टॉपवर तुझी वाट पहात मी उभा राहीन. चुकूं नकोस. येशील ना ? "

त्याच्या प्रश्नाचं उत्तर अचलेनं दिलं नाहीं. ती फक्त अगदीं वैतागल्याप्रमाणें म्हणाली, " पुरे पुरे ! जा. "

तो तरूण पुरुष पावलं टाकीनासा झाला. अचला अधिकच झपाट्यानं निघाली, व मैनाला हात धरून ओढूं लागली. तिनं मागं पाहिलं नाहीं. पण मैनानं पाहिलं. तो तरूण पुरुष थोडा वेळ थबकून उभा राहिला होता, पण मग झपाझप चालत जाऊन दुकानांत शिरला... मैनानं अचलेला विचारलं " कोण होता ग तो ? "

अचलेच्या मनांत आलं, हिनं त्याला ओळखला नाहीं हें नशीबच म्हणायचं. तिला बरं वाटलं. ती हंसत म्हणाली, "आमच्या कॉलेजांतला ! "

" म्हणजे पुण्याचा ? "

" हं— "

" मग तुझ्याशीं तो भांडत कां होता ? आणि तूं त्याला सारखं गो गो कां म्हणत होतीस ? मला तर वाटलं त्याचं नांवच गोगो आहे— "

त्या तसल्या मनःस्थितींतही अचलेला मनस्वी हंसूं आलं.

मैनानं विचारलं, " सांग ना, तुझं त्याचं भांडण झालं होय ? "

" अग भांडण कुठलं ? आम्ही परीक्षेबद्दल बोलत होतों— "

" म्हणून इंग्रजींत होय ? "

" हुं- "

मैना मुकाट्यानं चालूं लागली. अचलेला वाटलं सुटलों आपण.

परंतु कांहीं वेळ गेल्यावर मैना म्हणाली, "पण आक्का—"

"काय?"

"त्यानं मलां कसं ग ओळखलं?"

तिच्या या प्रश्नाला समाधानकारक उत्तर देणं अशक्य होतं. अचलेनं तिचा हात खसदिशीं ओढला आणि रागाच्या स्वरांत ती म्हणाली "आतां मुकाट्यानं चलतेस कीं नाहीं? आधींच उशीर झाला आहे. जरा उचल पाऊल"... अचला इतक्या जोरानं चालूं लागली कीं तिच्या बरोबर राहण्यासाठीं मैनाला पळावंच लागलं. वरून रखरखीत ऊन लागत होतं. अचलेनं तिचीं बोटं अगदीं दुमडून जोरानं धरली होतीं. पायांतल्या जुन्या चपला संभाळून धांवताना मैनाला त्रास होत होता ... तिला अचलेचा फार राग आला. परंतु अचलेनं कलाबतूच्या चपलांची तिची हौस पुरविली होती हें तिला विसरतां येत नव्हतं. तीन दिवसांनीं तिचं लग्न होणार होतं हेंही विसरतां येत नव्हतं. तिनं आपल्या मनांतला राग काढून टाकला. तोंडावर हंसूं आणून ती पळत राहिली.

तिनं विचारलं "आक्का?"

"आतां काय?"

"आपल्या घरीं तुझ्या लग्नासाठीं किती पाहुणे गोळा झाले आहेत, नाहीं?"

"हुं."

"मग तारामावशी तेवढी कां नाहीं आली?"

"तिला बोलावलं नसेल नानांनीं."

"मी आठवण करणार आहे नानांना."

"छे! खुळी कां काय तूं? मुळींच बोलूं नकोस नानांजवळ!"

"कां?" म्हणून विचारावंसं मैनाला वाटलं. परंतु तिनं विचारलं नाहीं. ती गप्प राहिली. मनांतल्या मनांत मात्र तिला तारामावशीची फार आठवण आली. घरांत अचलेच्या लग्नाची धांदल उडालेली असतांना तारामावशी मात्र दूर असावी याचा

गेल्या कित्येक दिवस तिला अचंबा वाटला होता. जेव्हां जेव्हां ती विशेष आनंदांत असे तेव्हां तेव्हां तिला तारामावशीची आठवण होत असे, आणि तिच्यावाचून चुकल्या चुकल्यासारखं वाटत असे. तिच्या मनात येई कीं इतरांचं राहो, पण नानांनादेखील तिची आठवण राहिली नाहीं !... आत्तां कलाबतूच्या चपलांचं खोकं हातांत घेऊन घरीं जातांना ती स्वतः अगदीं विलक्षण आनंदांत होती. आणि त्यामुळेंच तारामावशीची आठवण झाल्याबरोबर तिच्या मनाला जें खोल दुःख झालं त्याची धारही फार तीक्ष्ण होती... घरीं पोंचेपर्यंत ती अचलेशी एक अक्षरदेखील बोलली नाहीं.

घरीं गेल्यावरही तिला व अचलेला पाहून अनुताई जरी रागानं म्हणाल्या "काय ग उशीर हा ! मिळाल्या कां नाहीं एकदांच्या चपला ?" तरी तिनं फक्त "मिळाल्या" एवढंच उत्तर दिलं. खोक्यांतल्या चपला काढून दाखवाव्या असं तिला वाटलं नाहीं. मात्र आपल्याप्रमाणेंच अचलाही गंभीर आणि गप्प झालेली पाहून तिला आश्चर्य वाटलं...

जेवणाची पंगत मांडली गेली. थट्टा, विनोद, आनंदाची बोलणीं सुरूं झालीं. मग मैना खुषींत आली. जेवणं झाल्यावर तिनं आपल्या कलाबतूच्या वहाणा साऱ्या मंडळींना दाखविल्यासुद्धां. परंतु तिनं पाहिल तों तिची आक्का मात्र अजूनदेखील गप्प गप्पच होती. तिची चर्या फार गंभीर दिसत होती. डॉक्टरांनीं तिला एकदां विचारलंदेखील, "बोलत कां नाहींस ग ? अशी गप्प कां झाली आहेस ?" ती हंसली व म्हणाली "बोलतें तर काय झालं." कुणीशी चेष्टा केली, "आतां मुहूर्ताचा दिवस केव्हां उजाडतो असं झालं असेल अचलेला. मग कसं तिचं चित्त लागणार बोलण्याकडे ?" तें ऐकून सारीं मंडळी हंसली. "पुरे बाई !" म्हणून अचला उठून गेली, ती पुन्हां मंडळींत येऊन बसलीच नाहीं.

पाहुणे गेल्यावरसुद्धां ती आपल्या खोलींत अंथरुणावर पडून राहिली. तीन वाजले. चार वाजले. घड्याळाचे काटे जस जस पुढें

सरकत होते तशी तशी मनांतल्या उलट सुलट विचारांची झुंज निकराला येत होती. ' जावं ' आणि ' न जावं ' यांतला झगडा उग्र होत होता...परंतु अखेर ती उठली. कुणाला कसलीही शंका येऊं नये म्हणून तिनं नवे कपडे केले नाहींत. पायांत साध्या चपला सरकाविल्या आणि कुणाला कांहीं न सांगतां बाहेर पडून ती जिना उतरूं लागली...

रस्त्यानं चालतांनादेखील तिला दहादां वाटलं, परत फिरावं. ती कितीदां तरी थबकली. परंतु तिचीं पावलं पुन्हां पुढें पडत राहिलीं. बस थांबण्याच्या जागेवरचा खांब दुरून दिसतांच ती स्वतःलाच ओरडून म्हणाली " परत फिर ! परत फिर ! " पण ती मागं वळली नाहीं. तितक्यांत खांबाच्या आड उभा राहिलेला दिवाकर थोडासा हालला आणि तिच्या दृष्टीस पडला. त्यानंही तिला पाहिलं, आणि पाहिल्या-बरोबर खिशांतला रुमाल काढून हालविला. तिच्या छातींत एकदम धस्स झालं. कुणी आपल्याला बघत नाहीं ना म्हणून तिनं चहूं बाजूंस बावरलेली नजर टाकली. ती खांबाजवळ पोंचायला आणि बस यायला एकच गांठ पडली. इकडे तिकडे न पहातां ती चढली. जिन्यानं वर गेली. दिवाकर आपल्या मागून येत आहे कीं नाहीं हें-देखील तिनं वळून पाहिलं नाहीं. एका बाकावर खिडकीपाशीं ती बसली आणि तिनं क्षणभर डोळे घट्ट मिटून घेतले. या एकंदर प्रयत्नाचा तिला विलक्षण थकवा आला होता. " आलीस ! थँक्स ! " हे शब्द ऐकल्यावर तिनं डोळे उघडून पाहिलं. तिच्या शेजारीं दिवाकर बसला होता. तो हंसत म्हणत होता, " मला वाटलं तूं येतेस कीं नाहीं ? "... पांच वर्षांपूर्वी ज्या दिवशीं ती त्याला प्रथम भेटली होती त्या दिवशीं त्याचे हेच शब्द तिनं ऐकले होते. त्याच्या तोंडावर अगदीं हेंच हास्य तिला दिसलं होतं... अचलेला क्षणभर भास झाला, मधलीं पांच वर्षं गेलींच नाहींत !... अगदीं पहिल्यांदाच आपण दिवाकराला चोरून भेटत आहोंत !...

अचला अगदीं गप्प राहिली. दिवाकरही कांहीं बोलला नाहीं. बोलला तरी तिनं ऐकलं नाहीं. ती त्याच्याकडे बघतही नव्हती. मान

वळवून तिनं खिडकीबाहेर नजर लावली होती. समुद्रकांठ, उंच उंच इमारती, माणसांची गर्दी, मोठाले चौक, दुकानं वेगानं मागं मागं सरकत होतीं, परंतु यांपैकीं कोणतीच गोष्ट अचलेच्या शून्य दृष्टीला नीट दिसत नव्हती. वाऱ्याच्या झोतामुळें बसचा वेग तेवढा तिला कळत होता आपल्या शेजारीं दिवाकर बसलेला आहे एवढी जाणीव तिला होती आणि ती मनांतल्या मनांत स्वतःला सारखा प्रश्न करीत होती, " याच्या भेटीसाठीं मी कां आलें ! कां आलें ! "

घरांतून बाहेर पडण्यापूर्वीं तिनं आपल्या मनाला परोपरीनं आवरल होतं. " जायचं नाहीं ! " असा घोष तिनं केला होता. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नव्हता...गेल्या पांच वर्षांत तिच्या मनांतली दिवाकराची आठवण पुष्कळच बुजली होती. परंतु ज्या दिवसांत ती बुजलेली नव्हती त्या दिवसांत जेव्हां जेव्हां दिवाकरबद्दलचा विचार तिच्या मनांत आला होता तेव्हां तेव्हां तिचा ऊर संतापानं भरून आला होता. तिला वाटलं होतं, दिवाकर जिथें कुठें असेल तिथें जाऊन त्याला भेटावं, त्याला फडा फडा बोलावं, त्याची निर्भर्त्सना करावी...नंतरच्या दीर्घ कालांत त्याची आणि तिची गाठ तर पडली नव्हतीच, परंतु त्याची बातमी देखील तिच्या कानांवर आली नव्हती. त्याची आठवणही तिला फार क्वचित् होई. आतां तिच्या संतापाची पूर्वींची तीव्रता राहिली नव्हती. पण तरीदेखील दिवाकराची आठवण होतांच तिच्या मनांत जी भावना उठे ती संतापाचीच असे. कधीं काळीं तो भेटला तर ' मला तुझं तोंड पहायचं नाहीं ' असंच त्याला सांगूं, असं ती मनाशीं म्हणत असे. आज अगदीं ध्यानीं मनीं नसताना तो दुकानांत भेटला तेव्हां तिनं त्याला तसं म्हटलंही. " जा ! जा ! " असं तिनं त्याला कितीदां निक्षून सांगितलं. तिचं ऐकून तो दूर गेला असता तर तिला वाईट वाटलं नसतं. पण त्यानं भेटण्याचा आग्रह धरला होता, आणि तो करतांना, " मला तुझ्याशीं खूप खूप बोलायचं आहे " " तुझी माझी भेट व्हायलाच हवी " असं म्हणतांना त्यानं जी चर्या केली ती

पाहिल्याबरोबर अचलेचं मन बदललं होतं. याला जें कांहीं सांगायचं आहे तें आपण ऐकलं पाहिजे असं तिला वाटलं होतं. एखाद्या व्यक्तीवर माणसाचं अंतःकरण खरं जडलेलं असलं कीं त्या प्रेमामुळें क्षमाशीलत्व उत्पन्न होतं, व प्रेम जितकं अमर्याद असेल तितकंच हें क्षमाशीलत्वही अमर्याद असतं. अचलेनं दिवाकरावर अगदीं मनापासून प्रीति केली होती. त्यामुळें दिवाकर अकस्मात् दृष्टीस पडल्याबरोबर त्याचा अपराध जसा तिला आठवला व त्याबद्दलचा संताप जसा उसळला होता त्याचप्रमाणें एके काळीं तिनं त्याच्यावर ज्या प्रीतीचा वर्षाव केला होता त्या प्रीतीचे झरेही एकदम वाहूं लागले होते. त्यामुळें तिला वाटलं होतं, लौकिक दृष्टीनं हा दिवाकर कितीही गुन्हेगार असला तरी कदाचित् तो तसा नसेलही. निदान आपल्याला सर्वस्वी फसविण्याचा त्याचा हेतु नसेल. आपल्यावर त्यानं खरीखुरी प्रीति केली असेल त्याचा म्हणून कांहीं खुलासा असेल. आणि असेल तर तो आपण ऐकायला हवा...

"जा जा" असं ती त्याला सारखं म्हणत राहिली होती ती जशी संतापानं तशीच आपलं मन अधिक द्रवेल या भीतीनं ...घरीं परत गेल्यावर एकीकडे तिला वाटत राहिलं होतं, दिवाकराला भेटण्यांत कांहीं अर्थ नाहीं, आणि दुसरीकडे ती मनाशीं म्हणत राहिली होती, कदाचित् दिवाकर वाईट नसेलही, त्याची भेट घ्यायला हवी...स्वतःच्या मनाशीं झगडता झगडतां तिला एकच गोष्ट अधिकाधिक स्पष्ट समजली होती ती ही कीं तिचं दिवाकरावर फार फार प्रेम होतं! अजूनसुद्धां! म्हणूनच ती त्याच्या सूचनेप्रमाणें बसस्टॉपवर गेली होती...आतां त्याच्या शेजारीं बसली होती. ती बोलत नव्हती. तो बोलत नव्हता. त्याच्या मनांतले विचार तिला माहीत नव्हते. तिला एवढंच कळत होतं कीं या घटकेला आपल्या मनांत त्याच्याविषयींचं प्रेम उचंबळून आलेलं आहे. तिला सारखा भास होत होता कीं गेलीं पांच वर्षं जणुं गेलींच नव्हतीं. जणुं ती प्रथमच त्याला चोरून भेटत होती!

पूर्वी ज्या बागेंत ती दोघं वारंवार जात असत त्याच बागेंत तीं आजही गेलीं. पूर्वी ज्या कोंपऱ्यांत एका ठेंगण्या डेरेदार झाडाखालीं हिरवळीवर बसत असत तिथेंच बसलीं. पूर्वीप्रमाणेंच दिवाकरानं आपला कोट काढला व घडी न करतां बेफिकीरीनं दूर टाकला. त्यामुळें जणु मधली पांच वर्षे गेलींच नव्हतीं असा अचलेच्या मनाला भास होतच राहिला. तिच्या मनांत जे विचार आले होते तेच त्याच्याहि मनांत आले असावेत. कारण कोट दूर टाकल्यावर आजूबाजूस पाहून तो म्हणाला.

" आपण पांच वर्षांनीं इथें येत आहोंत हे खरंच वाटत नाहीं. सगळं जसंच्या तसं आहे. ही बाग, या जागेवरचं हें झाड, ही हिरवळ ! कांहीं बदललं नाहीं. " बोलतां बोलतां तिच्याकडे बघून तो हंसला आणि म्हणाला " तूं देखील बदलली नाहींस. "

ती मनाशीं म्हणाली, बदललें नाहीं ? अरे, तूं माझी केवढी निराशा केलीस ! तिचं मला किती दुःख झालं ! केवढी मानहानि माझ्या वाट्याला आली ! तुझा किती संताप आला ! या आघातांनीं मी बदललें नसेन कशी ? हे सारे आघात मी कसे सोसले, आणि त्यांच्या आठवणी कशा बुजविल्या तें तुला काय सांगूं ? ... मी पूर्वीची अचला राहिलें नाहीं. मी बदललें आहे...

हे विचार तिनं बोलून दाखविले नाहींत. परंतु जणु ते समजल्याप्रमाणें व तिला उत्तर दिल्याप्रमाणें तो म्हणाला, " तूं बदलली असशील अशी मला फार भीति वाटत होती. तूं माझा तिरस्कार करीत असशील असं वाटलं होतं. सकाळीं जा जा म्हणालीस तेव्हां वाटलं खरोखरच माझं तोंड कधीं पहाणार नाहींस. तसं तुला वाटावं अशाच गोष्टी घडल्या होत्या. तुझा दोष नव्हता. सकाळीं मला वाटलं, तुझ्याबद्दलची माझी आशा संपली. संध्याकाळीं तूं कांहीं बस स्टॉपवर येणार नाहींस. पण आलीस. तूं बदलली नाहींस. प्रेम विसरली नाहींस. आतां मला आशा आहे .. "

अचलेला म्हणावंसं वाटलं, केवळ तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी तुला बसवर भेटायला आलें एवढ्यावरूनच म्हणतोस मी बदललें

नाहीं ? चुकतोस तूं. केवळ पूर्वीचं प्रेम आठवून मला राहवेना म्हणून मी आलें. तुझ्यावरचा राग गेला म्हणून नव्हे. जें दुःख मला तूं दिलंस तें फार मोठ होतं. त्या दुःखानं मला बदलून टाकलं आहे...

परंतु पुन्हां ती गप्पच राहिली. आणि पुन्हां तिच्या मनांतले विचार समजल्याप्रमाणें व ते ओळखून उत्तर दिल्याप्रमाणें तो म्हणाला, " तुला मी फार दुःख दिलं. मी एकदम नाहींसा झालों तेव्हां तुला काय वाटलं असेल तें मला कळत कां नव्हतं ? सारं कळत होतं. पण माझा इलाज नव्हता. तुझी माझी पहिली भेट झाली त्याच्याआधींच नको त्या गोष्टी मी करून बसलों होतों त्यांचे परिणाम मला टाळतां येतील अशी मला आशा होती. मीं खूप धडपडही केली. पण ते टळले नाहींत. एखादं विष बऱ्याच अवधी नंतर अंगावर उठावं त्याप्रमाणें जो गुन्हा तूं भेटण्याच्या आधीं मीं केला होता त्याची फळं भोगायचा प्रसंग माझ्यावर आला. तुला वाटलं असेल, मीं तुला खोटीं वचनं दिलीं. तुझी समजूत झाली असेल, मी तुझा मुद्दाम विश्वासघात केला, मी फार वाईट मनुष्य आहे. तशी तुझी समजूत झाली असेल तर तुझा दोष नाहीं. पण गुन्ह्याबद्दलची शिक्षा भोगतां भोगतां माझ्या जिवाला जास्त यातना होत होत्या त्या या विचाराच्या कीं माझ्याबद्दल तुझा गैरसमज झाला, आणि तो दूर करण्याची संधि मला कधीं मिळणार नाहीं..."

त्याचं बोलणं ऐकतांना ती त्याच्याकडे आश्चर्यचकित होऊन बघत होती. मनांतल्या मनांत ती कांहींशी गोंधळली होती. मधेंच त्यानं निश्वास टाकला, मान वळवून दुसरीकडे पाहिलं, पुन्हां तिच्या नजरेला नजर दिली, तरी ती कांहीं बोलली नाहीं. त्याच्या तोंडावर जें हास्य तिला दिसलं त्यांत खिन्नता होती. त्या खिन्नतेचा अर्थ तिला कळला नाहीं. परंतु तरी ती स्तब्धच राहिली.

दिवाकर म्हणाला, " तुझी माझी कधींच ओळख झाली नसती तर मीं किती तरी वाईट गोष्टी केल्या असत्या. आधीं

वाईट होतोंच. पण ज्या दिवशीं तूं पहिल्यांदा बसवर आलीस आणि आपण दोघं याच ठिकाणीं याच झाडाखालीं बसलों तेव्हां मीं मनाशीं निश्चय केला कीं आतां अगदीं चांगलं व्हायचं. तुझं प्रेम मिळवायचं असेल तर सारा वाईटपणा सोडला पाहिजे. चांगलं झालं पाहिजे. उनाडपणा, लबाडपणा पुरता टाकला पाहिजे. जें केलं होतं तें होऊन गेलं होतं. पण तुझ्या प्रेमासाठीं मी चांगला होणार होतों. मनांतल्या मनांत तुझ्या प्रेमाची शपथ घेऊन मीं निश्चय केला होता, चांगलं व्हायचं तो माझा निश्चय मीं पार पाडलाही. तुझं प्रेम माझ्यावर आहे हें समजल्यानंतर चुकूनदेखील लबाडीचं कृत्य करण्याचा विचार माझ्या मनाला शिवला नाहीं. मला वाटलं होतं, माझ्या पूर्वीच्या गुन्ह्यापासून खूप अंतरावर मी गेलों. तो गुन्हा मला कधीं गाठणार नाहीं. पण अखेर त्यानं गाठलं. तुझ्या दृष्टीनं मी वाईट ठरलों... " त्यानं एक सुस्कारा सोडला.

अजूनसुद्धां अचलेच्या मनांतला गोंधळ संपला नव्हता. फक्त तिच्या नजरेंत थोडा बदल झाला होता. आश्चर्याच्या जोडीला अनुकंपा आणि कांहीं एक विचित्र समाधान दिसूं लागलं होतं. तिचे डोळे म्हणत होते अरेरे, बिचाऱ्याचा निश्चय पार पडला नाहीं. मला ठकविण्याचा याचा हेतु नव्हता. याचं माझ्यावरचं प्रेम खोटं नव्हतं, खरं होतं... परंतु तिच्या तोंडांतून अक्षरदेखील निघालं नाहीं. ती नुसती त्याच्याकडे बघत राहिली.

परंतु तिनं कांहीं बोलावं अशी दिवाकराचीही अपेक्षा जणुं नव्हती. ती त्याच्याकडे बघत होती, त्याचं बोलणं ऐकत होती, एवढंच जणु त्याला पुरेसं होतं. तो पुढें म्हणाला, "जगाच्या दृष्टीनं मी गुन्हेगार ठरलों याचं मला अर्थात्‌च दुःख वाटलं. परंतु खरं दुःख झालं तुझ्या समजुतीनं मी लबाड नालायक ठरलों त्याचं. मला शिक्षा झाली ती कांहीं फार मोठी नव्हती. पण ती भोगून बाहेर पडल्यावर परिस्थिति अशी होती कीं दुसरं एक वॉरंट माझ्यावर शेकलं असतं. कारण माझा एक मित्र माझ्यावर उलटला होता. त्यामुळें शिक्षा भोगून सुटल्याबरोबर तुझ्याकडे धांव घेण्यासाठीं

जीव तळमळत होता तरीदेखील दूर राहिलों. जिथें पूर्वीची दुष्कृत्यं पाठलाग करणार नाहींत अशा ठिकाणीं लांब कुठें तरी परप्रांतांत जायचं ठरविलं. तुझ्या प्रेमाची शपथ घेऊन चांगलं होण्याचा जो निश्चय केला होता तो सोडला नाहीं. तूं दूर राहिली होतीस; परंतु माझ्या हृदयांत होतीस. आणि होतीस म्हणूनच चांगलं होण्याच्या प्रतिज्ञप्रमाणें वागलों. नशिबदेखील काढलं . . . " बोलतां बोलतां तो क्षणभर थांबला. त्याचा हात सहज पुढें झाला आणि तिच्या हातांत तो गुंतला. तिनं ' नको ' म्हटलं नाहीं याचं फार समाधान झाल्याप्रमाणें त्याचे डोळे चमकले. त्या समाधानाच्या ऊर्मींतच तो म्हणाला, " अचले, मी फार चांगला झालों आहे ! मोठा झालों आहे ! एका लहानशा लेदर फॅक्टरीचा मी मालक आहे. माझ्या हाताखालीं बावीस माणसं आहेत. मी ज्या बंगल्यांत राहतों तो लहानसाच पण टुमदार आहे. आज सकाळीं तुझी माझी ज्या दुकानांत भेट झाली तो दुकानदार माझ्याकडूनच माल मागवितो. सकाळपासून मला सारखं वाटत होतं, तुझी भेट होण्याचा योग यावा म्हणूनज मी लेदर फॅक्टरी काढली कीं काय ! " तो प्रथमच मोठ्यांदा हंसला...

आणि त्याचं तें हंसणं ऐकल्याबरोबर अचलेच्या मनाचा सारा गोंधळ संपला. आश्चर्याची आणि किंचित् अविश्वासाची जी निरगांठ इतका वेळ तिच्या मनाला काचत राहिली होती ती जणुं एकाद्या साध्या सुरगांठीसारखी एकदम सुटली . . . त्याचं सारं सारं बोलणं तिच्या एकदम लक्षांत आलं. तिन हंसून विचारलं, " कुठल्या गांवीं असतोस तूं ? "

" कानपूरला. "

" चांगलं आहे शहर ! "

" सुंदर आहे. पण खुद्द कानपूर शहरांत मी रहात नाहीं. शहरापासून दोन अडीच मैलांवर एक छोटीशी नवी वसाहत झाली आहे. त्या वसाहतींत राहतों. बंगल्याभोंवतीं मोठं आवार आहे. त्यांतच झोपड्या बांधल्या आहेत, त्यांत माझे कामगार राहतात. आवारांत

छोटीशी बाग केली आहे, तिथें फुलझाडं लावलीं आहेत. त्यावरचीं फुलं ओंझळींत घेऊन वास घेतांना दर वेळेस मला तुझी आठवण होते. मनांत येतं, माझी अचला या फुलांसारखी आहे."

त्याचं तें बोलणं ऐकतांना होणारं समाधान इतकं दाट आणि खोल होतं, कीं एखाद्या सुगंधाच्या दरवळानं जीव घाबरा व्हावा तसं अचलेला तें समाधान घेतां घेतां वाटलं ज्या तिच्या मनांत एके काळीं दिवाकराबद्दल तीव्र संताप होता त्या तिच्या मनांत आतां सहानुभूति आणि कौतुक भरून आलं. मानहानीच्या आणि निराशेच्या जखमांचे तिच्या मनावरचे वण पुसून निघाले. आपण व्यर्थ प्रेम केलं अशी जी जाणीव तिच्या मनाला सतत बोचत राहिली होती ती निघून गेली. आपलं प्रेम व्यर्थ गेलं नाहीं, तें सार्थकीं लागलं, त्याचा मोबदला म्हणून खरं प्रेमच आपल्याला मिळालं, या विचाराचा संतोष तिच्या अंतःकरणांत पसरला. विटंबना, निराशा, पश्चात्ताप यांचा भार दूर झाला. आनंदानं अंतःकरण हलकं झालं...

ती घरीं परत आली ती अशा हलक्या हर्षभरित मनानंच ! तिच्या लग्नाचा दिवस तीन दिवस दूर होता तो पळा पळानं घटके घटकेनं जवळ येऊं लागला. दोन दिवसांवर आला. एका दिवसावर आला लग्नाच्या आदल्या दिवशीं तिच्या घरांत खूपच धांदल उडाली. संध्याकाळीं सोनारदादा आले. अचलेसाठीं मुद्दाम करावयास दिलेले दागिने त्यांनीं बनवून आणले होते. "अचला कुठें आहे ?" "अचलेला बोलाव" अशा उद्गारांची एकच घाई उडाली. अचलेला शोधण्यासाठीं मैना धांवली. "आक्का घरांत कुठेंच नाहीं." असं सांगत ती परत आली. "कुठें गेली ? कुणाला कांहीं सांगून गेली कां ?" असे प्रश्न झाले. "नाहीं ! सांगून गेली नाहीं." अशीं उत्तरं मिळालीं. तितक्यांत डॉक्टर घरीं आले. घरांतली धांदल पाहून ते म्हणाले, "गेली असेल एखाद्या मैत्रिणीकडे. येईल आत्तां." सोनारदादांना ते म्हणाले "थांबा जरा." ते आपल्या खोलींत गेले. कोणतीं कामं झालीं आणि कोणतीं राहिलीं

त्याची यादी करून त्यांनीं टेबलावर ठेवली होती ती घेण्यासाठीं ते टेबलाजवळ गेले. यादीचा कागद त्यांना दिसला. त्या कागदावर ठेवलेलं एक निळं पाकिटही दिसलं ! पाकिटावरचं अचलेचं अक्षर पाहून ते चमकले. त्यांनीं पाकिट फोडलं आणि आंतला कागद काढला. तो वाचल्याबरोबर त्यांच्या डोळ्यापुढें क्षणभर अंधारच झाला. त्यांनीं पुन्हां एकदां तो कागद वाचला. मन घट्ट केलं. चेहरा सावरला. शेजारच्या खोलींत जाऊन ते सोनाराला म्हणाले, "दागिने ठेवून जा तुम्ही."

सोनार म्हणाला " मला कांहीं घाई नाहीं. बसतों."

" नको. जा."

" मग पुन्हां केव्हां येऊं ?"

" कळवितों."

कुणाशीं एक अक्षरही न बोलतां ते परत आपल्या खोलींत गेले आणि खुर्चीत येऊन पडले. हातांतला कागद त्यांनीं पुन्हां वर करून पाहिला. संतापानं आणि चिडीनं त्यांच्या डोळ्यांपुढें पडदा आल्यासारखं झालं होतं. तरीदेखील आधींच दोनदां वाचलेल्या त्या कागदावरच्या ओळी त्यांना थोड्या थोड्या दिसल्या...

त्यांचा हात खालीं झाला. बोटं सैल झालीं. पत्राचा कागद गळून खालीं पडला, तो त्यांनीं तसाच पडूं दिला... अनुताईच्या खोलींत बायकांचीं बोलणीं चाललीं होतीं, तीं त्याच्या कानीं पडत होतीं. मधेंच त्या बायका मोठ्यांदा हंसल्या. इतर खोल्यांतही गडबड धांदल चालली होती. पाहुण्यांबरोबर आलेल्या समवयस्क मुलांच्या मनरंजनासाठीं मैनानं फोनोग्राफ लावला होता... ते वेगवेगळे आवाज ऐकून डॉक्टरांच्या मनांत आलं, वा रे वा ! चांगली विटंबना चालली आहे ! त्यांना वाटलं, उठावं, अनुताईच्या खोलींत जावं, आणि साऱ्या पाहुण्या बायांना ओरडून सांगावं...परंतु त्यांनीं तसं केलं नाहीं. खुर्चीतून उठण्याची शक्तिच त्यांच्या अंगांत उरली नव्हती. त्यांच्या हातांपायांतील त्राण नाहींसा झाला होता... ते तसेच खुर्चीत पडून राहिले...किती वेळ कोण जाणे !

अनुताई हळूं हळूं पावलं टाकीत खोलींत आल्या. तें त्यांना समजलं नाहीं. खोलींतला दिवा लागला तेव्हां चमकून त्यांनीं डोळे उघडले, आणि खुर्चीच्या पाठीवर टाकलेली मान तशीच ठेवून अनुताईकडे पाहिल. त्या जवळ आल्या आणि म्हणाल्या " अचला अजून घरीं आली नाहीं."

ते बोलले नाहींत.

" कुठें गेली म्हणून समजायचं ? "

तरी ते गप्प राहिले.

" कुठें गेली असेल ? तुम्हांला कांहीं कल्पना आहे कां !

डॉक्टर एकदम म्हणाले, " होय, आहे."

इतक्यांत मैना खोलींत आली आणि सांगू लागली, " आई ! ए आई ! भटजी आले आहेत ते तुला आणि नानांना बोलावताहेत. ते म्हणतात उद्यां सकाळीं—"

बापाची चर्या पाहून ती थोडीशी चमकली, आणि आईजवळ सरकून तिनं तिच्या कमरेला विळखा घातला.

अनुताई डॉक्टरांना म्हणाल्या "तुम्हांला सांगून गेली म्हणायची. केव्हां येईल ?

" ती येणार नाहीं."

" म्हणजे काय ? "

आवाज उंच करून डॉक्टर म्हणाले, " येणार नाहीं म्हणून सांगितलं ना ? ऐकलं नाहींत कां तुम्ही ? "

" म्हणजे काय ? " अनुताई म्हणाल्या, " कुठें गेली आहे ती ? "

" नरकांत ! मसणांत ! "

त्यांच्या त्या शब्दांपेक्षांही त्यांच्या आवाजानं मैना अधिक भ्याली. अनुताईच्या अंगाशीं ती आणखीच बिलगली.

अनुताई म्हणाल्या " भरल्या लग्नघरांत असं काय अभद्र बोलतां ? "

डॉक्टरांचा आवाज आणखीच चढला. " अभद्र झालंय मग

त्याबद्दल बोलण्यानं जास्त काय होणार? भरल्या लग्नघरांत! हं:! आतां रिकामं करावं लागणार आहे घर! समजलीस?"

डॉक्टरांचं तें बोलणं ऐकून अनुताई अगदीं गोंधळून गेल्या. यांना वेड बीड लागलं आहे कीं काय अशी शंका घेतल्याप्रमाणें त्यांनीं चर्या केली. त्या म्हणाल्या, "अभद्र झालंय म्हणतां? काय झालंय? सांगा तरी."

"काय व्हायचं राहिलं आहे? तुझी मुलगी गेली!"

"गेली? म्हणजे?"

"म्हणजे मेली!"

"नाहीं हो नाहीं!" अनुताईंनीं एकदम गळा काढून म्हटलं, "असं वेडंविद्रं बोलूं नका."

त्या मोठ्यांदा हुंदके देऊं लागल्या तेव्हां मैना अगदीं भयभीत झाली. तिनं आईच्या ओच्यांत मान खुपसली आणि "आई ग" असं ओरडून गळा काढला.

डॉक्टर मोठ्यांदा ओरडले, "चूप! चूप! रडूं नका! पोरटी मेली तर रडायला काय झालं?"

अनुताई थोड्याशा वाकल्या. दोन्ही हातांनीं डॉक्टरांचा खांदा गदगदा हालवून त्या म्हणाल्या "अहो, पण तुम्ही हें सांगतां काय! मेली मेली असं काय म्हणतां?

"तसंच म्हणायला हवं. तुझी पोर मेली असंच तूं समज. मी तरी तसंच समजतों." खालीं पडलेलं पत्र त्यांनीं चुरगळून उचललं व अनुताईंच्या हातांत तें कोंबीत ते म्हणाले "वाच वाच तुझ्या पोरीनं काय लिहिलं आहे. हें लग्न नको म्हणून ती घरांतून निघून गेली. त्यापेक्षां मेली असती तर काय बिघडलं असतं? तोंडाला काळं तरी फासलं गेलं नसतं! आतां भटांच्या माणसांना काय सांगायचं? लोकांत छी थू होईल ती कशी सहन करायची? तूं आणि मी दोघेही विष पिऊन मरून जाऊं त्यापेक्षां!" ते खुर्चीतून ताडकन उठले आणि पिसाटासारखे हातवारे करीत येरझारा घालूं लागले.

मैना आईला सोडून त्यांच्याजवळ गेली आणि " नाना ! अहो नाना ! " असा गळा काढून त्यांना बिलगली.

डॉक्टरांनीं तिच्या थोबाडींत दिली आणि तिला दूर ढकललं. ते खूपच मोठ्यांदा ओरडले, " रडायचं नाहीं ! चूप ! चूप ! " आणि ते पुन्हां खुर्चीत धाडकन बसले.

त्यांना आपला संताप अनावर झाला होता.

पांच वर्षांपूर्वीं दिवाकराच्या नादीं लागल्याबद्दल त्यांनीं अचलेच्या थोबाडींत दिल्या होत्या. या वेळेस ती त्यांच्यासमोर उभी असती तर त्यांनीं तिला छडीखालीं फोडूनच काढलं असतं. परंतु ती निघून गेली होती. त्यांच्यासमोर नव्हती. डॉक्टरांना वाटत होतं, मनांतल्या संतापाला वाट देण्यासाठीं शेजारीं वाकून उभ्या राहिलेल्या अनुताईंना झोडपून काढावं. मैनाला बडवावं. स्वतःच्या तोंडांत फडा फडा मारून घ्याव्या. अचला कुठें गेली, कुणाबरोबर गेली त्यांना माहीत नव्हतं. तर्कदेखील करतां येत नव्हता. फक्त ' निघून जातें ' एवढंच तिनं पत्रात लिहिलं होतं. दिवाकर परत आल्याची शंका त्यांना येण्यासारखी नव्हती. तो आपल्या घरींदेखील गेलेला नव्हता. दुसरीकडेच उतरला होता. चंद्रनिवासमधल्या माणसांच्या दृष्टीस तो पडला नव्हता. ती कुठें गेली, कुणाबरोबर गेली, हे प्रश्न डाक्टरांच्यी मनांतही येत नव्हते. ती गेली—लग्नाच्या आदल्या दिवशीं घरांतून नाहींशी झाली एवढंच त्यांना कळत होतं. आणि त्या गोष्टीचाच त्यांना भयंकर संताप आलेला होता...

पांच वर्षांपूर्वीं ती दिवाकराच्या नादीं लागली होती. तिनं त्याच्या चोरून गाठीभेटी घेतल्या होत्या. त्याचा फोटो आणि त्याचीं पत्रं जवळ ठेवलीं होतीं. तें सारं पाहून डॉक्टर अतिशय रागावले होते आणि तिचे डोळे उघडावे म्हणून त्यांनीं तिच्या तोंडांत भडकावल्या होत्या. परंतु त्या वेळेचा त्यांचा राग काहींच नव्हे अशी संतापाची विलक्षण आग त्यांच्या मनांत आतां पेटली होती. त्या वेळेस ती मूर्खपणानं एका उडाणटप्पूच्या

नार्दी लागली होती एवढंच. आतां तिनं त्याहून फार भयंकर अशी गोष्ट केली होती. तिच्या लग्नाचं देवक उद्यां सकाळीं बसायचं होतं, आणि आज ती घरांतून निघून गेली होती. घरांतल्या साऱ्या माणसांच्या तोंडाला तिनं काळं फासलं होतं. कुटुंबाच्या अब्रुचे कोळसे केले होते. भटांचीं माणसं आतां काय म्हणतील ! लोकांत केवढं हंसू होईल ! फजिती ! बदनामी ! लज्जा ! दुसरं कांहीं वाट्याला येणार नव्हतं. यापुढें चारचौघांत तोंड दाखवायची सोय उरणार नव्हती. " मेली. मेली ! " असं ते मनाशीं घोकीत होते. परंतु त्यांना हेंही ठाऊक होतं की पोरगी मेली असं समजावं आणि सोडून द्यावं असं कितीहि म्हटलं तरी तें सोपं नव्हतं. भटांचीं माणसं फाडून खातील ! शेजारीं पाजारी उपहास करतील ! कुत्सितपणानं हंसतील. घरोघर चर्चा होईल. चेष्टेला आणि कुटाळकीला मोठाच विषय मिळेल !...

या साऱ्या विचारांनीं डॉक्टर अत्यंत संतप्त झाले. एखादी बंदुकीची गोळी अकस्मात् लागावी, जखमेंतून रक्ताच्या चिळकांड्या उडालेल्या दिसाव्या म्हणजे माणसाची जशी अवस्था होईल तशी



त्यांची झाली. हातांनीं डोकं घट्ट आवळून धरून ते कांहीं वेळ खुर्चींत बसले ... पण मग एकदम उठले. " रडूं नका ! रडायचं नाहीं म्हणून सांगितल ना ! चूप ! " असं अनुताईवर आणि मैनावर ओरडले आणि मग त्यांनीं भराभर अंगावर कपडे चढविले.

अनुताईनीं त्यांना विचारलं " कुठें निघालांत तुम्ही ? "

डॉक्टर दाराच्या चौकटींत पोचले होते,ते मागं वळून न पाहतां म्हणाले, " तुझी पोर मेल्याची वर्दी दिली पाहिजे ना ! भटांकडे जायला नको ? उशीर करण्यांत काय अर्थ आहे ? जाऊन येतों ! " ते तरा तरा पुढें झाले. " अहो पण जरा थांबा तरी-- " असं अनुताई मोठ्यादा ओरडल्या, पण डॉक्टरनीं लक्ष दिलं नाहीं. त्यांनीं धाडकन दार लोटून घेतलं, आणि ते जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागले.

अनुताई जागच्या जागीं उभ्या राहिल्या. " आई ! आई ! " असे गळे काढीत मैनानं त्यांना घट्ट मिठी मारली. परंतु त्यांनीं खालीं मान करून तिच्याकडे पाहिलदेखील नाहीं. पिशाच्च दृष्टीस पडल्यावर माणसाची चर्या व्हावी तशी त्यांची चर्या भकास झाली होती. त्यांच्या डोळ्यांतली शक्तिच संपली होती. एखाद्या उंच अरुंद कड्यावर मोठ्या प्रयत्नानं तोल सावरून उभं राहिल्याप्रमाणें त्या जागच्या जागीं उभ्या राहिल्या होत्या. पण मग त्यांचे हातपाय थरथर कांपूं लागले. दुसऱ्याच क्षणीं त्या खालीं कोसळल्या. मैनानं खालीं बसून त्यांना मिठी मारली, आणि " आई ! आई ! " असा टाहो फोडला. अनुताई डोळे उघडीनात तेव्हां ती उठली, पलीकडच्या खोलींत धांवली, आणि पाहुण्या बायकांपैकीं एकेकीजवळ जाऊन, तिचे ओंचे धरून ती ओरडून म्हणाली, " चला हो ! लवकर तिकडे चला ! आई बघा कशी करते आहे ! "... तें ऐकतांच साऱ्या बायका अनुताई-कडे धांवल्या...मैना एखाद्या भ्रमिष्टासारखी इकडे तिकडे धांवूं लागली, भेदरलेल्या नजरेनं सारा प्रकार पाहूं लागली... गेल्या कांहीं दिवसांत ज्या घरांत पूर्वीं कधीं नव्हे असा आनंद भरलेला

तिला दिसला होता त्या घरावर केवढी भयंकर अवकळा एकदम पसरली होती ! वादळी वाऱ्यानं झाडं उन्मळून पडलीं आणि फुलवेली उध्वस्त झाल्या कीं एखाद्या उपवनाला उजाडपणा यावा तसा उजाडपणा घराला आला होता. जो आनंद घराच्या खोली खोलींत भरला होता तो एकाएकी पार नाहींसा झाला होता. दुःखाचा अंधार जिकडे तिकडे पसरला होता. या अंधारांतून आपलं घर कांहीं आतां कधीं बाहेर पडणार नाहीं असं त्या क्षणीं मैनाला वाटलं...

तसंच झालंही ! अचला एकाएकीं निघून गेली, एका दिवसावर आलेला तिच्या लग्नाचा समारंभ रद्द झाला, जमलेलीं पाहुणी माणसं घरोघर निघून गेलीं ! परंतु अचलेच्या निघून जाण्याचे परिणाम एवढ्यावरच थांबले नाहींत. तिच्या कृत्यानं डॉक्टरांच्या व अनुताईच्या मनाला जो भयंकर धक्का दिला तो फार दीर्घ काल टिकणारा होता. डॉक्टर वरकरणीं आपला उद्योग करीत होते, मनांतलं दुःख आणि संताप मनांतच ठेवीत होते. अनुताईची गोष्ट निराळी होती. त्यांच्या मनाला बसलेल्या हबक्यानं त्यांची तब्येत झपाट्यानं ढांसळूं लागली... अचला एकाएकीं घरांतून नाहींशी झाली या विचारापेक्षां तिचं ठरलेलं लग्न मोडलं आणि आपली नाचक्की झाली, हाच विचार डॉक्टरांच्या मनांत अधिक स्थिर झाला. ती कुठें गेली असेल, सुखांत असेल कीं दुःखांत असेल, या प्रश्नांत त्यांचं मन गुंतलं नाहीं. घरांतून नाहींसं होऊन तिनं घराची बेअब्रू केली, या एकाच कल्पनेंत त्यांचं मन गुरफटलं गेलं. शेजारी पाजारी म्हणूं लागले डॉक्टरांची मुलगी बदचालीची असली पाहिजे, त्याशिवाय कां ती लग्नाच्या आदल्या दिवशीं घरांतून पळून गेली. लोकांचे असले कुत्सित उद्गार डॉक्टरांच्या कानांवर आल्यांवाचून राहिले नाहींत. ते ऐकून त्यांना वाटे लोकांच्या तोंडाला काय हात लावायचा, आपलाच दाम खोटा ! लोक काय म्हणतील तें मुकाट्यानं ऐकून घेतलं पाहिजे, सोसलं पाहिजे असा अगतिकपणा आपल्या वाट्याला आलेला पाहून त्यांचा संताप अधिकच वाढे.

अचलेनं आपला अक्षम्य गुन्हा केला आहे या विचाराखेरीज दुसऱ्या कोणत्या विचाराला त्यांच्या मनांत अवकाशच उरला नाहीं. अचलेचं पुन्हां कधीं तोंड बघायचं नाहीं एवढाच निश्चय ते मनाशीं घोकीत राहिले. अचलेला दुसरी कोणतीही शिक्षा ते करूं शकत नव्हते. मनांतला संताप ज्यायोगें कमी होईल अशा कोणत्या तरी विचाराचं समाधान तर त्यांना हव होतं. अचलेचं पुन्हां तोंड म्हणून पाह्यचं नाहीं हा निश्चय त्यांना थोडंसं समाधान देऊं शकत होता !...

अनुताईंची गोष्ट वेगळी होती. मुलांच्या बाबतींत बाप आणि आई या दोघांची प्रतिक्रिया सारखीच क्वचित् असते. दोघांचंही मुलांवर प्रेम असतं खरं, परंतु मुलांच्या गुणांबद्दल त्यांचं कौतुक करण्यांतदेखील आईची आणि बापाची भूमिका एकच नसते. मुलं वाईट निघालीं म्हणजे आईच्या आणि बापाच्या प्रतिक्रियेंतला भेद विशेषच स्पष्ट दिसतो. अचला घरांतून गेली यापेक्षां तिनं कुटुंबाची बेअब्रू केली हा विचार डॉक्टरांनीं अधिक केला ; उलट अचला आपल्याला सोडून गेली हा विचार अनुताईंनीं अधिक केला. आतां लोकांत तोंड दाखवायला जागा उरायची नाहीं असं अनुताईंना-देखील वाटलं. परतु त्याबद्दलची शरम त्यांच्या मनांत प्रबळ झाली नाहीं. अचला कुणाबरोबर गेली असेल, कुठें असेल, काय करीत असेल, सुखांत असेल कीं रडत असेल, अशा विचारांनींच त्यांचं मन कष्टी झालं. अचलेचं तोंड पुन्हां कधीं पाह्यचं नाहीं असं त्यांच्या मनांत आलं नाहीं. उलट ती पुन्हां आपल्याला केव्हां दिसेल असं त्यांना फार तीव्रतेनं वाटलं...लग्न मोडल्यानंतर चार दिवस डॉक्टर जेवले नाहींत. परंतु त्यांची अन्नावरची वासना उडाली होती ती संतापानं ! आणि त्यांना जेवणखाण नकोसं वाटलं तें फक्त चार सहा दिवस. नंतर ते जेवूं खाऊं लागले, हळूं हळूं आपला नित्याचा उद्योगही करूं लागले. अनुताईंनीं अन्न वर्ज्य केलं तें संतापानं नव्हे, तर दुःखानं. घराची अब्रू खराब झाली हा डॉक्टरांच्या मनांतला मुख्य विचार होता. त्यांच्या अहंकाराला मोठा धक्का

बसला होता. इतर कोणत्याही हानीपेक्षां अहंकाराची हानि पुरुषाला अधिक असह्य होत असते. डॉक्टरांनाही खरं दुःख झालं तें आपला सारा अहंकार चिरडला गेला, लौकिक धुळीला मिळाला याचा...उलट अनुताईंना अचलेचा राग आला, तिनं फार वाईट गोष्ट केली असं वाटलं, परंतु रागापेक्षां अचलेची करुणा त्यांना जास्त आली. भरल्या घरांतून मुलगी उठून गेली आणि परदेशी झाली याचं त्यांना अनावर दुःख झालं. त्याना अन्न गोड लागेना, आणि त्यांनीं खाणंपिणं सोडलं तें कायमचंच...

वास्तविक एका दिवसावर आलेलं अचलेचं लग्न मोडलं हें संकट म्हणायचं झालं तर डॉक्टर आणि अनुताई दोघावरही आलं. त्या संकटामुळें नवराबायकोंतला जुना विसंवाद कमी व्हायला हवा होता. दोघं मनानं एकमेकाजवळ यायला हवीं होतीं. परंतु तसं झालं नाहीं. डॉक्टर संताप करून घेत होते व अचलेचं तोंड पुन्हां कधीं न पाहण्याचा निश्चय पुन्हां पुन्हां बोलून दाखवीत होते हें अनुताईंना योग्य वाटत नव्हतं; आणि अनुताई दुःख करीत होत्या व अचलेला डोळे भरून कधीं पाहीन म्हणत होत्या हें डॉक्टरना पसंत नव्हतं...

अनुताई म्हणत "अचला कुठें गेली त्याचा शोध करायला नको कां?"

डॉक्टर गप्प रहात असत.

"तिच्या कोण कोण मैत्रिणी होत्या तें मला थोडंसं माहीत आहे. त्यांचे पत्ते मी सांगतें. त्यांच्याकडे जाऊन शोध करा."

"तूं जा अन् करै शोध वाटल्यास."

"माझे पाय असते तर गेलेंच असतें. मी अशी अपंग झालें आहे म्हणून तर तुम्हांला सांगतें आहे."

"मी जाणार नाहीं!"

"असं म्हणून कसं चालेल? एखादा बाप असता तर त्यानं त्रिखंड शोधलं असतं. पोलिसांत वर्दी दिली असती. वर्तमानपत्रांत जाहिरात दिली असती--"

डॉक्टर एकदम म्हणाले, " हो. आणि चार लोकांना जी बेअब्रू माहीत आहे ती जगजाहीर केली असती—"

" अशा संकटाच्या वेळेस स्वतःच्या अब्रूकडे पाहतात काय ! "

अब्रूकडे पाहतात काय ! हा काय प्रश्न विचारते आहे ही मूर्ख बाई !... मनाशीं असं आश्चर्य करीत डॉक्टरानीं विचारलं, " मग कशाकडे पाहतात ! "

" घरांतून गेलेली मुलगी परत कशी येईल हें आधीं पाहिलं पाहिजे आईबापांनीं—"

" आईबापांनीं ! मी तिचा बाप नाहींच मुळीं—"

" पण मी तिची आई आहे ना—"

" आई कसली, मूर्ख बाई आहेस झालं ! " असं म्हणून डॉक्टर उठून निघून जात.

अनुताई अंथरुणावर रडत पडून रहात.

असले खटके चार पांच वेळां झाले. मग बंद झाले. नवरा-बायकोंतलं जुनं मानसिक अंतर आणखीच वाढलं. नवरा दुष्ट आहे, कठीण हृदयाचा आहे, असं अनुताईनीं ठरविलं. बायको मूर्ख, अक्कलशून्य आहे, असं डॉक्टरांनीं ठरविलं...

अचलेचा शोध करण्यासाठीं हिंडणं, फिरणं अनुताईंना शक्यच नव्हतं. परंतु ती कुठें गेली, कुणाबरोबर गेली तें घरांत बसल्या बसल्या समजून घेण्याचा एक उपाय त्यांना सुचला, व तो त्यांनीं अमलांत आणला. त्यांनीं ज्योतिषी बोलावून आणले, प्रश्न सांगणारे मांत्रिक बोलावून आणले, व त्यांचा सल्ला घेतला. कुणी सांगितलं, तुमची मुलगी पूर्व दिशेला गेलेली आहे. कुणी सांगितलं पश्चिमेला. एक म्हणाला, तुमची मुलगी यवनाबरोबर गेली आहे. दुसरा म्हणाला तिच्याबरोबर एक म्हातारी आहे. एकानं सांगितलं, दीड वर्षांत ती परत येईल. दुसऱ्यानं सांगितलं सहा महिन्यांत मंगळाची बाधा संपेल आणि ती परत येईल. कुणी पंचवीस रुपये लाटले, कुणी पन्नास रुपये लाटले, कुणी सत्यनारायण करायला सांगितला. कुणी कुलस्वामिनीला पूजा बांधायला सांगितली, कुणी कडकडीत अकरा

सोमवार करायला सांगितले. अनुताईंनीं या साऱ्या गोष्टी केल्या. या प्रकारांनीं डॉक्टर आणखीच चिडले. आपली बायको म्हणजे एक मूर्खांतली मूर्ख बाई आहे अशा दृढ समजुतीनं ते अनुताईशीं वागूं लागले...

अनुताईंनीं खाणंपिणं सोडलंच होतं. त्यांचं दुःख कमी होण्या ऐवजीं वाढत होतं. थोड्याच दिवसांत त्यांची तब्येत इतकी ढास-ळली कीं डॉक्टरांना फार चिंता वाटूं लागली. त्यांनीं चार गोठे डॉक्टर बोलावून आणले आणि अनुताईची तब्येत तपासून घेतली. परंतु त्या तपासणीचा काय उपयोग होता? अनुताईंनीं औषध घ्यायचंच बंद केलं होतं, आणि त्याबद्दल डॉक्टर कितीही रागावले तरी त्याची पर्वा त्या करीनाशा झाल्या होत्या... डॉक्टर मनां-तल्या मनांत समजून चुकले कीं बायकोचं आयुष्य आतां फार उरलं नाहीं... मुलगी मूर्खपणानं घरांतून निघून गेली म्हणून तिचा त्यांना संताप आला होता. बायकोनं मूर्खपणानं आत्महत्त्येचा मार्ग धरला होता म्हणून आतां तिचाही त्याना संताप आला. त्यांच्या मनांतल्या साऱ्या मृदु गोड भावना संपल्यासारख्या झाल्या...

मैनाला वाटे, या घराला घर कसं म्हणायचं? थोरली बहीण नाहींशी झालेली, आई मृत्युशय्येवर पडलेली, बाप सर्वस्वी विमनस्क झालेला! कुणाच्याच मनांत कुणाबद्दलच ओलावा नाहीं! कुणीच कुणाशीं मायेनं एक शब्ददेखील बोलत नाहीं! एकत्र बसणं नाहीं. एकत्र भाषण नाहीं! याला घर म्हणायचं कीं रान!... ती शाळेंत जात होती, अभ्यास करीत होती, आपल्या स्वतःच्यांचं जगांत कसंबसं जगण्याचा प्रयत्न करीत होती. पण तिच्या जगाची हद्द आईच्या रुग्णशय्येला भिडलेली होती! ती शक्य तितका वेळ अनुताईजवळ बसून रहात असे. आईनं आपल्याशीं कांहीं बोलावं अशी अपेक्षाच ती ठेवीत नसे. तिच्याजवळ बसून राहणं आपलं कर्तव्य आहे हें तिला समजत होतं. आपली आई आतां फार दिवसांची सोबतीण नाहीं हें तिनं ओळखलं होतं. आईकडे पाहतां पाहतां तिच्या मनांत अनेकदां येई, उद्यां काय होणार आहे कुणास

ठाऊक ?... शाळेंतल्या वर्गात बसल्या बसल्या तिला वाटे, आपण घरीं जाऊं तेव्हां आई असेल कीं नाहीं ?...धास्तावलेल्या मनानंच ती वर्गातल्या अभ्यासाकडे लक्ष देण्याचा प्रयत्न करी...

वर्गाच्या दाराशीं सारजा डोकावलेली पाहतांच मैनाच्या छातींत धस्स झालं.

मास्तरांनीं सारजाकडे पाहिलं आणि विचारलं. " कोण पाहिजे बाई तुम्हांला ? "

सारजा म्हणाली ' सुलाख्यांच्या मैनाताई आहेत ना या वर्गात ? '

" हं, आहेत. कां ? "

" त्यांना घरीं न्यायसाठीं मी आलें आहे. "

" बरं आहे. तास संपल्यावर येतील."

" नाहीं नाहीं. लगोलग बोलावलं आहे."

मास्तर पुढें कांहीं बोलणार तोंच मैना आपलं दप्तर घेऊन उठली व म्हणाली, " सर मला जाऊं द्या. " त्याच्या परवानगीची वाट न पाहतां ती घाईनं दारांत गेली व सारजाला म्हणाली "चल."

शाळेंतून बाहेर पडून रस्त्याला लागेपर्यंत ती खालीं मान घालून झपाझप पावलं टाकीत चालली. मग मात्र ती रस्त्यांतच थबकली. सारजेचा ओचा धरून तिनं विचारलं "आईचं जास्त झालंय काय ?"

आपण कुठें उभ्या आहोंत त्याचं भान सारजाला राहिलं नाहीं. मैना आतां पांच वर्षांची लहान राहिली नव्हती, दहा वर्षांची मोठी होती, याचाही तिला विसर पडला. भर रस्त्यांत तिनं मैनाला उचलून घेऊन छातीशीं धरलं आणि गळा काढला " मैनाताई ! बाई सोडून गेल्या आपल्याला ! बाई गेल्या हो ! "

ते भयंकर शब्द ऐकल्याबरोबर दुःखाच्या आगीनं आपलं सारं अंग पेटल्यासारखं मैनाला वाटलं. तिनं सारजेच्या गळ्याभोवतीं अगदीं घट्ट घट्ट मिठी मारली, आणि तिच्या खांद्यावर तोंड दाबून आपले सारे हुंदके दडपून टाकले. तरीदेखील " आई ! " असा शब्द तिच्या तोंडून बाहेर पडलाच ! आणि सारजानं मिठींत धरलेलं तिचं अंग गदागदा हाललंच !

## : : ८ : :

स्टेशनावरच्या त्या गुळगुळीत फरसबंद विस्तीर्ण हॉलसारख्या जागेंत माणसांची वर्दळ, धांदल, आणि गडबड ज्या घटकेस चाल-लेली नाहीं अशी घटका असते कीं नाहीं कुणास ठाऊक ? असेलही. रात्रीची अखेरची गाडी सुटल्यापासून पहाटेस पहिली गाडी येऊन दाखल होईपर्यंत कदाचित् खूप उंच छपराची ही लांब रुंद फरसबंद जागा मोकळी आणि शांत रहात असेल. परंतु त्या मध्यां-तरांत जाणारा किंवा येणारा प्रवासी त्या ठिकाणीं वावरत नाहीं म्हणूनच तिथें स्तब्धता असते. त्यामुळें ती स्तब्धता प्रवाशाच्या दृष्टीस पडण्याचा संभव नसतो. सामान्य माणसाला हें ठिकाण दिसतं तें सदा गजबजलेलंच. वरचेवर गाड्या सुटत असतात, येत असतात. प्लॅटफॉर्मच्या दारांतून माणसांचे लोंढे आंत शिरत असतात, बाहेर पडत असतात. लहान मोठे बोजे डोक्यावर घेऊन लाल डगलेवाले हमाल धांवत असतात. प्रवासान मळलेले, शिणलेले, तारवटलेल्या डोळ्यांचे किंवा प्रवासाला निघालेले ताजे तवाने, परीटघडी झकपक पोषाक केलेले स्त्रीपुरुष घाईनं पावलं टाकीत असतात. पोरं रडत असतात किंवा आनंदाच्या आरोळ्या ठोकीत असतात. हमालांच्या हातगाड्यांचीं चाकं फरशीवर वाजत असतात. लोक केरकचरा टाकीत असतात, फळांच्या साली फेकीत असतात, मेहेतरांचे झाडू ती घाण गोळा करण्यासाठीं फरशीवर फिरत असतात. मधेंच कुणी तरी मोठ्यांदा हांका मारीत कुणामागं तरी धांवत असतं, भल-त्याच माणसाला आपण हाका मारल्या हें लक्षांत आल्यावर ओशाळं होत असतं. मधेंच कुणाचा तरी कुणाला धक्का लागतो. त्यांतून भांडणाची ठिणगी पडते, किंवा " माफ करा हं ! " " छे !

छे ! त्यांत कसली माफी ?" अशा उद्गारांच्या रूपानं माणुसकीचे पाझर वहात असतात, या कोलहगाच्च गाडी सुटण्याच्या वेळेस पोर्टरनं वाजविलेली घंटा खणखणत असते, गार्डाची कर्कश शिटी वाजत असते, गति घेणाऱ्या गाडीच्या अवजड चाकांचे लोखंडी लंगर हालल्याप्रमाणें आवाज होतात, गाडी निघून जाते, निरोप देण्यासाठीं आलेलीं माणसं जनावरांच्या कळपांप्रमाणें भरारा परततात. एक प्लॅटफॉर्म एकदम रिकामा आणि भकास झाल्यासारखा कांहीं वेळ दिसतो...

असा हा चक्रनेमिक्रम या ठिकाणीं अव्याहत चाललेला असतो. वर्दळीची भरती–ओहोटी सारखी चालू असते. तिच्याकडे तटस्थपणानं पहाण्यांत मनाची मोठीच करमणूक होत असणार. या करमणुकीचा कुणाला कंटाळा येईल कां ? ...

या विस्तीर्ण हॉलच्या एका कडेला "व्हीलर कंपनी"चा वर्तमानपत्रांचा आणि पुस्तकांचा मोठा स्टॉल आहे, तो संभाळणाऱ्या वेंकटरामनला तरी या करमणुकीचा कधींच कंटाळा येत नसे. एखाद्या सैनिकानं वाळूच्या पोत्यांआड खंदकांत उभ राहवं त्याप्रमाणें कमरेभोंवतीं खादीची स्वच्छ लुंगी आणि अंगांत बिनकॉलरचा पायघोळ स्वच्छ परीटघडीचा खादीचा खमीस घालून, बहुधा खमीसाच्या खिशांत दोन्ही हात कोंबून, उभ्या राहणाऱ्या वेंकटरामनला भोंवतालची ती गर्दी धांवपळ धांदल पाहण्यांत मोठी गोडी वाटत असे. दूरची ती गर्दी ज्याप्रमाणें त्याचं लक्ष वेधून घेई त्याप्रमाणेंच वर्तमानपत्रं आणि पुस्तकं विकत घेण्यासाठीं स्टॉलवर गर्दी करणाऱ्या माणसांकडे त्याला निरखून पहातां येत असे. प्रत्यक्ष विक्री करण्याचं आणि पैसे मोजून घेण्याचं काम करण्यासाठीं वेगळा नोकर होता. तें काम वेंकटरामनला करावं लागत नसे. स्वतः निर्माण केलेल्या सृष्टीच्या पसाऱ्याकड पाहणाऱ्या परमेश्वराप्रमाणें, किंवा एखाद्या गजबजलेल्या सभेच्या अध्यक्षाप्रमाणें खमीसाच्या खिशांत हात घालून तो आपल्या जागीं उभा असे, आणि दाट केंसाळ भुंवयांखालच्या कटकटीत डोळ्यांनीं दूरची

धांवपळ आणि स्टॉलवर जमलेलीं माणसं चाहेल तितका वेळ पहात असे. एखादी सुंदर स्त्री स्टॉलवर आली आणि एखादं वर्तमानपत्र उचलून पैसे देऊन झटकन निघून गेली कीं त्याला वाईट वाटत असे. एखादा पुरुष हें पुस्तक उघडून वाच तें पुस्तक उघडून वाच असं करीत निवड करण्यासाठीं फार वेळ रेंगाळला कीं त्याला त्याचा राग येई. "हें काय वाचनालय आहे कां हो?" असा प्रश्न तो विचारीत नसे, परंतु त्याच्या ओठांवर येई. पुस्तकांची चाळाचाळ करणारी स्त्री असली तर गोष्ट निराळी असे. आणि ती स्त्री तरुण व सुंदर असली तर वेंकटरामनची मुळींच तक्रार नसे. एवढंच नव्हे तर तो थोडासा जागचा हाले, नव्यानं आलेलीं पुस्तकं शेल्फवरून काढी आणि तीं पुढें करून इंग्रजींत म्हणे, "हें तुम्हीं वाचलं आहे कां? फार गाजलेलं पुस्तक आहे. स्वस्त किंमतीची पॉकेट बुक आवृत्ति नुकतीच निघाली आहे." त्या तरुण सुंदर स्त्रीशीं चार शब्द बोलायला मिळाले कीं वेंकट-रामनला फार बरं वाटे. स्वतःच्या त्या नोकरीबद्दल त्याचं मत फार चांगलं होत असे. त्या स्त्रीनं सारी पुस्तकं परत ठेवलीं आणि फक्त दोन आण्यांचं एक वर्तमानपत्र घेतलं तरी मग त्याची तक्रार नसे...

ही मुलगी मात्र तसं करणार नाहीं, एकादं तरी पुस्तक घेईलच, याबद्दल वेंकटरामनची खात्री होती. तिला पुस्तकं दाखवावी व तिच्याशीं कांहीं बोलावं असा विचार त्याच्या मनांत येत होता. पण तो त्यानं आवरून धरला होता. एक पुस्तक उघडून वाचीत ती उभी होती, ती एखाद्या चित्रासारखी दिसत होती. सडपातळ, उंच बांध्याची, बारीक जांभळ्या बुंदांचं पांढरं पातळ नेसलेली, मोठ्या पाणीदार डोळ्यांची, मधेंच डोक्यावर भुरभुरणारे काळेभोर केस पुस्तकांतली मान वर न करतां नाजूक बोटांनीं अलगद मागं करणारी ती गोरीपान तरुण मुलगी दुरून निरखण्यांत सुख होतं. तिच्याशीं कांहीं बोलून तें सुंदर चित्र बिघडवावं असं वेंकटरामनला वाटेना. तो तिच्याकडे टक लावून बघत राहिला. ती सुमारें वीस

वर्षांची असावी असा त्यानं तर्क केला. ती कोणत्या तरी कॉलेजांत शिकत असेल असंही त्यानं ठरविलं. आणि त्याच्या मनांत असंही आलं कीं या महाराष्ट्रीय नायकांचं नेसणं संवरणं आणि त्यांची केशभूषा मोठी सुंदर खरी. नाहीं तर आमच्या देशांतल्या " अम्मा " ! ज्या नोकरीनिमित्त महाराष्ट्राच्या या सर्वांत मोठ्या शहरीं तो आला होता त्या नोकरीला त्यानं धन्यवाद दिले... तो तिच्याकडे बघत राहिला. तिनं जरा पुस्तक दूर केलं कीं शेल्फवरची कोणतीं पुस्तकं काढून तिच्यापुढें ठेवायचीं हें त्यानं केव्हांच ठरविलं होतं. तिची थोडीशी हालचाल केव्हां होते याची तो वाट पहात होता....

तितक्यांत दहा बारा तरुण विद्यार्थ्यांचं एक टोळकं च्या टोळकं हॉलमध्यें प्रगट झालं. एखादी गाडी पकडावयाची असल्याप्रमाणें त्यांची धांवाधांव झाली. " दहा नंबरचा प्लॅटफॉर्म ! " " तो बघ तो पलीकडचा ! " " गाडी उभीच आहे ! " " आटप, पाय उचल ! " अशीं त्यांचीं आपापसातलीं उंच आवाजांतलीं बोलणीं झालीं. त्यांतला एकजण मधेंच टोळकं सोडून दूर झाला, व खांद्यावर लोंबणारा कॅमरा सरसावून आपल्या मित्रांना ओरडून म्हणाला, " व्हा पुढें. जागा धरा. " कुणीं त्याला विचारलं, " तूं कुठें निघालास ? " तो ओरडून म्हणाला, " पेपर घेऊन येतों. दोन मिनिटांत आलोंच ! " धांवत कॅमेरा सरसावीत तो स्टॉलवर आला. तो काळसर पण उंचनिंच होता. एखाद्या निष्णांत खेळाडूप्रमाणें अंगानं मजबूत. गरम पँट आणि पुरत्या बाह्यांचा चौकटीचा शर्ट घातलेला. कांहींशा उभट चेहऱ्याचा. त्याच्या धांवण्यांत सफाई होती. वेंकटरामननं मनाशीं ठरविलं हा हॉकी उत्तम खेळत असला पाहिजे...

त्या तरुण विद्यार्थ्यानं स्टॉलजवळ आल्याबरोबर एक वर्तमानपत्र उचलून घेतलं. विजारीच्या खिशांतून नोट काढून पुढें टाकली. पैसे घेण्यासाठीं हात पुढें करून तो उभा राहिला...

तितक्यांत त्याचं लक्ष पुस्तक वाचणाऱ्या त्या सुंदर मुलीकडे गेलं. त्यानं क्षणभर तिच्याकडे पाहिलं, मनाची खात्री करून घेतली,

आणि मग तिच्याजवळ सरकून तो म्हणाला " हलो ! मिस सुलाखे. "



मैनानं दचकून पुस्तक बाजूला केलं. त्याला पहातांच ती हंसली, आणि नाजुक आवाजांत म्हणाली, " हलो ! "

" कुठं गांवाला निघाली आहेस कीं काय ! "

" नाहीं. "

" मग ?— "

" माझी बहीण यायची आहे. गाडी पाऊण तास लेट आहे म्हणून एखादं पुस्तक घ्यायसाठीं इथें स्टॉलवर आलें. तिकडे प्लॅटफॉर्मवर माझे नाना बसले आहेत. आईसुद्धां आली आहे. "

" असं ? ," असा त्यानं उद्गार काढला. परंतु त्याच्या स्वरात उत्सुकता नव्हता. उलट तुझ्या आइबापांबद्दल कशाला मला सांगतेस असाच अर्थ होता.

तिनं विचारलं- " तूं कुंठ निघाला आहेस ? "

" आमची ट्रिप जाते आहे. "

" असं कां ? मजा आहे बुवा !. " मग तिनं मोठ्या

घड्याळाकडे पाहिलं आणि म्हटलं, " आतां जायला हवं मला परत प्लॅटफॉर्मकडे. " तिनं पुस्तकाची किंमत विचारली, पैसे दिले, आणि त्या तरुण विद्यार्थ्याकडे बघून म्हटलं, " अच्छा ! "

तो म्हणाला, " एक मिनिट थांब. "

मैनानं भुंवया उचलून त्याच्याकडे प्रश्नार्थक नजरेनं बघितलं.

तो म्हणाला, " मघाच्यासारखी थोडा वेळ उभी राहतेस कां ? पुस्तक वाचीत ? "

" म्हणजे काय ? "

त्यानं गळ्यांतल्या कातड्याच्या पिशवींतून कॅमेरा काढला, उघडला, आणि म्हटलं " थोडी उभी रहा. मघासारखी. फार सुंदर दिसत होतीस. "

" चल ! कांहीं तरीच ! "

" खोटं नाहीं. " त्यानं दोन्ही हातांनीं कॅमेरा उचलला आणि दोन चार पावलं दूर सरकून तो एका डोळ्याला लावला.

मैना म्हणाली " म्हणजे काय ? फोटो काढतोस कीं काय माझा ? " ती दूर होऊं लागली.

" प्लीज प्लीज ! रहा ना उभी. असं काय करतेस ? "

" माफ कर. वेडा तर नाहीस तूं ?" असं म्हणून ती प्लॅटफॉर्मच्या दिशेनं झपाझप पावलं टाकूं लागली. मधेंच ती थबकली, वळली, आणि हसून म्हणाली, ' रागावूं नकोस लिमये. दुसऱ्या एखाद्या वेळेस— " मग ती पुढें गेली.

ती दिसेनाशी होईपर्यंत लिमये तिच्याकडे बघत राहिला. स्टॉलवरच्या माणसानं त्याला आठवण केली " तुमचे पैसे घ्या ना परत" तेव्हां तो वळला. कॅमेरा परत कातड्याच्या पिशवींत घालतांना त्याचा चेहरा उतरलेला होता. त्याची आणि वेंकटरामनची सहज दृष्टादृष्ट झाली. वेंकटरामन हंसला आणि इंग्रजींत म्हणाला, " बेटर लक नेक्स्ट टाइम ! "

लिमयेनंही दात दाखविले आणि म्हटलं " हां, लेट अस होप सो ! "

" तुम्ही दोघं एकाच कॉलेजांत आहांत कीं काय ? "

" हां. "

" एकाच वर्गांत ? "

" नो ! मी. एम. ए. झालों आहे. लेक्चरर आहे. ती यंदा बी. ए. होईल. शिवाय माझा विषय गणित, तिचा मराठी— "

" ओ ! आय सी ! "

लिमयेनं पैसे खिशांत घातले आणि प्लॅटफॉर्मकडे धूम ठोकली.

मैना प्लॅटफॉर्मच्या दारांतून शिरली आणि घाईघाईनं पुढें गेली. नाना आणि तारामावशी ज्या बाकावर बसलीं होतीं त्याची खूण तिनं लक्षांत ठेवली होती परंतु ती खूण सांपडेना. बाक आढळेना. नाना आणि मावशीही दिसेनात ! ती पुढें गेली, मागं आली. पुन्हां तिनं वर खालीं एक फेरी घातली. ती मनाशीं म्हणाली, हें काय ? हीं गेलीं कुठे ? ती गोंधळून जागच्या जागीं उभी राहिली. तिनं चहूंबाजूंस निरखून पाहिलं. मग प्लॅटफॉर्मचा नंबर पाहिला. आणि तो पहातांच ती स्वतःशींच मोठ्यांदा हंसली. तिच्या लक्षांत आलं कीं घाईत निराळ्याच प्लॅटफॉर्मवर ती आली होती !

क्षणापूर्वी तिच्या मनाचा गोंधळ उडून तिच्या छातींत धस्स झालं होतं. आतां स्वतःची चूक लक्षांत येतांच तिच्या छातींतली धडकी तर थांबलीच, परंतु तिला हंसूदेखील आलं. आपण व्यर्थ भ्यालों होतों या विचारानंच केवळ नव्हे, तर आतांशा आपण अभिष्टासारख्या पुष्कळदां वागतों याही विचारानं ... ती मनाशीं आश्चर्य करूं लागली, माणूस फार आनंदांत असलं म्हणजे त्याचं मन ठिकाणावर रहात नाहीं कीं काय कोण जाणे ! . . .

तिचीं गेलीं कित्येक वर्षे फार फार आनंदांत गेलीं होतीं. आणि आज तिच्या आनंदाला सीमा उरली नव्हती दहा वर्षांनीं तिची आक्का तिला भेटणार होती. पहिल्या बाळंतपणासाठीं ती येणार होती, व रहाणार होती. नानांनीं तिच्यावरचा रोष सोडला होता. तारामावशीनं त्यांचं मन वळवून त्यांना तो सोडायला लावला होता ! . . .

ज्या दिवशीं सारजा तिला बोलवयासाठीं शाळेंत आली होती आणि भर रस्त्यांत तिनं "मैनाताई! आपल्या बाई आपल्याला सोडून गेल्या हो!" असा गळा काढून तिला उचलून पोटाशीं धरलं होतं, त्या दिवशीं तिला वाटलं होतं आतां मात्र आपल्या घरांतल सुख कायमचं संपलं . . . नंतरच्या दिवसातही तिला असंच वाटत राहिलं होतं कीं या घरांत आनंदाचीं प्रकाशकिरणं आतां कधीं शिरायचीं नाहींत. तें आतां उदासपणाच्या अंधारानं असंच सदा भरलेलं राहणार. इतर समवयस्क मुलींप्रमाणें आपल्या वाट्याला हंसणं खेळण कधीं येईल अशी अपेक्षाच तिनं सोडून दिली होती. . . एक वर्ष असं गलं होतं . . .

एके दिवशीं रात्रीच्या जेवणानंतर ती नेहमींप्रमाणें खोलींत जाऊन अभ्यासाच्या टेबलाजवळ बसली होती.

नाना खोलींत आलेले पाहून तिला आश्चर्य वाटलं. ते कधीं येत नसत. आपल्याच खोलींत पुस्तक वाचीत बसत. अभ्यास करतां करतां जांभया येऊं लागल्या कीं पुस्तकं बाजूला सारून आपल्या कॉटवर ती पडत असे आणि निजत असे. एखाद्या बोर्डिंगांत रहात असल्याप्रमाणें आपलं आयुष्य चाललेलं आहे असं तिच्या मनांत येई. पण त्याला इलाज नव्हता. आयुष्याची हीच तऱ्हा आपल्या वाट्याला आलेली आहे असं स्वतःशीं म्हणायला ती शिकली होती . . . त्यामुळें नाना तिच्या खोलींत आले तेव्हा तिला आश्चर्य वाटलं . . .

त्यांनीं विचारलं, "काय मैनाताई, काय चाललं आहे?"

ती इतकी गोंधळली होती कीं काय बोलावं तें तिला सुचेना. तिन फक्त हातांतलं पुस्तक खालीं करून मांडीवर धरलं आणि बापाकडे पाहिलं.

"तुझे हेडमास्तर भेटले होते."

मैना बघतच राहिली.

"त्यांनीं विचारलं यंदा तुमची मैना बसणार कीं नाहीं वरच्या यत्तेच्या स्कॉलरशिपच्या परीक्षेला."

मैनानं मान खालीं घातली आणि ती गप्पच राहिली.

डॉक्टरांनीं तिच्या केसांवरून हळूच हात फिरविला, पाठीवर थोपटल्यासारखं केलं, आणि विचारलं " काय ? बसणार ना ? "

मैनानं मान हालविली. खालचा ओठ दांतांखालीं दाबून धरला. हुंदका फुटेल अशी तिला भीति वाटली.

डॉक्टरांनीं तिला हळूंच जवळ ओढली आणि म्हटलं, "बसणार ना ? बोल कीं ? "

मैनाला हुंदका अनावर झाला. परंतु रडतां रडतां ती म्हणाली, " मला मास्तरनीं विचारलं होतं पण मीं त्यांना सांगितलं नाहीं म्हणून."

" तें कां ? गेल्यों परीक्षेंत तर तुझा पहिला नंबर आला होता. "

मैनाला आणखी एक हुंदका आला. त्या हुंदक्यांतच ती म्हणाली " यंदा शेवटचा येईल. माझी पूर्वींची हुशारी आतां राहिलीं नाहीं. माझं लक्ष अभ्यासाकडे लागत नाहीं. मास्तरांना माहीत आहे. विचारा त्यांना—"

डॉक्टरनीं तिचे दोन्ही हात हातांत घेतले आणि म्हटलं, "तुझं लक्ष अभ्यासाकडे कां लागत नाहीं तें मला माहीत आहे. त्याचा दोष माझ्याकडे आहे. साऱ्याच गोष्टींवरून माझं लक्ष उडालं आहे. तुझ्याकडेसुद्धां माझं लक्ष राहिलं नाहीं म्हणून तुझं लक्ष अभ्यासांत नाहीं. माझी मोठी चूक झाली. पण आतां मी ती दुरुस्त करणार आहे. घराचा घरपणा नाहींसा व्हावा अशा गोष्टी घडल्या. तुझ्या आक्कानं तसं केलं. नंतर तुझी आई सोडून गेली. परंतु घराचा घरपणा गेला तर गेला असं कायमचं समजून कसं चालेल ? तो परत आणायला हवा. निदान तुझ्यासाठीं. तूं अजून मोठी व्हायची आहेस. आतां तुझं सुख हेंच माझं कर्तव्य. तुझ्या सुखासाठींच मला जगायचं आहे. तुझ्या सुखासाठींच घराचा घरपणा कायम टेवला पाहिजे .."

अशा प्रकारें ते पुष्कळ वेळ बोलत राहिले. त्यांचे प्रेमळ शब्द

ऐकण्याची मैनाची दीर्घ काळाची भूक भागली. एखाद्या मोठ्या दुखण्यांतून उठलेल्या माणसाला उठून चालतां आलं कीं नवाच आनंद व्हावा तसा आनंद तिला झाला. तिला क्षणभर भास झाला कीं आपला बाप जणुं दूर कुठें तरी प्रवासाला गेला होता तो परत आला आहे आणि आपल्याशीं बोलत आहे....

डॉक्टरांनीं शेवटीं म्हटलं, " समजलीस ?—आतां सांग पाहूं, स्कॉलरशिपच्या परीक्षेला बसणार कीं नाहीं ? "

आतां त्यांचा तो प्रश्न ऐकून तिला हुंदका आला नाहीं. ती हसली. पण ती म्हणाली, " छे हो नाना ! कांहीं तरीच काय ? गेल्या वर्षांत मी अगदीं ढ झालें आहे. "

" बरं बरं ! ' ढ ' झाली असलीस तरी ' ज्ञ ' व्हायला कांहीं अवकाश नाहीं लागायचा. साचलेला धुरळा झाडून टाकला कीं खालचं शंभर नंबरी सोनं चकाकल्याशिवाय राहील कीं काय ? "

" हो हो. तुम्ही चढवा मला हरबऱ्याच्या झाडावर ! "

" तें कां म्हणून ? मागच्या वर्षीं पहिली स्कॉलरशिप मिळवलीस तूं— "

" मागच्या वर्षींची गोष्ट निराळी होती. तारामावशी होती मला शिकवायला. "

तिचे ते शब्द ऐकल्याबरोबर नानांचा चेहरा किती गंभीर आणि खेदपूर्ण झाला तें तिच्या एकदम लक्षांत आलं.

त्यांच्या गांभीर्याचं आणि खिन्नतेचं कारण तिला कळत नव्हतं. त्याबद्दल कांहीं तर्कही तिला करतां येत नव्हता. परंतु त्यांची ती चर्या पुढें कित्येक दिवस तरी तिला वरचेवर आठवत राहिली होती.

एके दिवशीं सकाळीं चहाच्या वेळेस नानांनीं तिला विचारलं " दोन दिवस सारजा आणि तूं घरांत एकट्या रहाल कां ? " तिनं कां असं विचारण्यापूर्वींच ते पुढें म्हणाले, " गांवाला जाऊन यावं म्हणतों. "

तिनं विचारलं " कुठें ? कुठल्या गांवाला ? "

" थोडं काम आहे. "

गांवाचं नांव सांगायचं त्यांनीं मुद्दाम टाळलं कीं सहजगत्या सांगितलं नाहीं त्याबद्दल मैनानं क्षणभर मनाशीं विचार केला. पण मग ती म्हणाली " जाऊन या कीं. "

डॉक्टरांनीं सारजाला विचारलं "मैनाला नीट संभाळशील ना?"

मैनाला वाटलं त्यांना म्हणावं " मी येऊं कां तुमच्याबरोबर ?" किती तरी दिवसांत ती प्रवासाला गेली नव्हती, आगगाडींत बसली नव्हती. ज्या वयात आगगाडींत बसण्याची हौस वाटावी असंच तिचं वय अजून होतं. पण तिनं विचार केला ज्या अर्थी नाना आपण होऊन ' तुला घेऊन जातों ' असं म्हणाले नव्हते त्या अर्थी आपल्याला घेऊन जाणं त्यांना सोयीचं वाटत नसावं. तिनं मनांतला प्रश्न मनांतच ठेवला. सारजा चुलीवरच्या भांड्यांत ढवळाढवळ करीत पाठमोरी उभी होती, तिनं तोंड न वळवितांच डॉक्टरना सांगितलं " सभाळीन तर काय झालं ! " मैना म्हणाली, " ती मला संभाळील. अन् मी तिला संभाळीन."

डॉक्टर हसले. त्यांनीं विचारलं, " जाऊन येऊं ? "

" अगदीं खुशाल " मैना म्हणाली, " दोन दिवसांत याल ना परत ? "

" तर ! कदाचित् एका दिवसांतदेखील येईन. "

डॉक्टर गेले. जातांना आपली नेहमीची डॉक्टरी बॅग त्यांनीं नेली नाहीं. मैना मनाशीं म्हणाली " पेशंटला पाह्यला गेलेले दिसत नाहींत नाना. कांहीं दुसऱ्या कामाला गेलेले दिसतात. "

ते परत आल्यावर तिनं विचारलं, " झालं कां काम ? "

त्यांनीं नुसती मान हालविली. त्यांचा चेहरा गंभीर आणि कष्टी दिसला.

नंतरच्या चार सहा दिवसांत मैनानं पाहिलं तों मध्यंतरीं त्यांनीं आणलेलं आनंदाचं अवसान नाहींसं झालं होतं. पूर्वींप्रमाणें ते तिच्याकडे अगदींच दुर्लक्ष करीत नव्हते. चहा पितांना जेवतांना गप्पा काढून बोलत होते. परंतु बोलण्याच्या वेळेस त्यांचं खरं चित्त कुठें तरी दूर असल्यासारखं वाटे. बोलतां बोलतां ते एकदम गप्प

होत. क्वचित् सुस्कारा सोडीत. मनांतल्या मनांत कसला तरी विचार ते करीत असले पाहिजेत. कसला कोण जाणे !...

कामासाठीं दोन दिवस जाऊन येतों म्हणून ते पुन्हां गांवाला गेले. पुन्हां परत आले ते असंच गंभीर आणि खिन्न होऊन. घरांत आनंदानं वावरण्याचा आणि तिच्याशीं हसत खेळत बोलण्याचा प्रयत्न ते करीत परंतु त्याची चर्या स्पष्ट सांगे कीं त्या प्रयत्नाचा त्यांना त्रास होत होता.

ते पुन्हां गांवाला निघाले तेव्हां मैनाला वाटलं त्यांना म्हणावं, नका जाऊं. किंवा त्यांना विचारावं, आतांशा तुम्ही आपल्या मनाला कसला त्रास करून घेतां... ती कांहीं बोलली नाहीं. परंतु ते गेल्यावर ती मनाशीं म्हणत राहिली कीं आतां हे परत येतील, आणखी खिन्न झालेले दिसतील.

परंतु या खेपेस तसं घडलं नाहीं.

ती शाळेंतून परत आली तों नानाच दार उघडायसाठीं पुढें आले. तिनं विचारलं " हें काय ! आजच आलांत ? "

त्यांनीं कांहीं उत्तर न देतां फक्त मान हालविली. परंतु ते अगदीं मोकळेपणानं हंसले.

सारजानं डॉक्टर आले म्हणून चहा आणि फराळाचं तयार केलं होतं. डाक्टरांच्या बरोबर तीही चहा घ्यायला बसली.

आजही डॉक्टरांचं लक्ष खाण्याकडे किंवा बोलण्याकडे नव्हतं. परंतु त्याचं कारण त्यांच्या मनातली खिन्नता नव्हती. त्यांचं चित्त आजही दूरच कुठें तरी होतं. परंतु त्यांच्या चर्येवर उल्हास दिसत होता. मधूनच ते विनाकारण हंसतदेखील होते. मधेंच ते म्हणाले, " आपल्या घराला चांगला नवा रंग देऊन घ्यायला हवा. किती तरी वर्षांत रंग दिला नाहीं. दारांचे आणि खिडक्यांचे पडदेसुद्धां जुने झाले आहेत, विटले आहेत. नवे आणावेत, नाहीं ? " मैनानं हंसून मान हालविली. तिच्या मनांत आलं, नाना कसल्या तरी आनंदांत आहेत खचित. कसल्या कोण जाणे !...

चहा आपटल्यावर नानानीं तिला आपल्या खोलींत नेलं, आणि

सूटकेसमधला एक डबा काढून तिच्या हातीं दिला.

तो डबा पाहिल्याबरोबर मैनानं ओळखला. त्यावरचं चित्र तिला पक्कं आठवत होतं. तारामावशी आपल्या रेशमाच्या लड्या त्या डब्यांत ठेवीत असे. तारा भरतकाम करीत बसली कीं तो सुंदर डबा मांडीवर घेऊन बसण्याची मैनाला परवानगी असे. ती तारामावशी-कडे बघत राही. ती हळूंच विचारी " मावशी ! —"

तिच्याकडे न बघतां तारा विचारी " काय महाराज ! काय म्हणणं आहे ! "

" हा डबा तूं मला देणार आहेस ना ! "

" होय. देणार आहे."

" मग दे ना."

" इतक्यांत नाहीं. तूं मोठी झालीस म्हणजे देणार आहे. नुसता डबाच देणार नाहीं. भरतकाम करायला शिकविणारसुद्धां आहे तुला."

" आतां नाहीं कां मी मोठी ? तूं तर नेहमीं म्हणतेस आमची मैना मोठी शहाणी."

" मोठी शहाणी म्हणजे फार शहाणी. मोठी आणि शहाणी नाहीं."

व्याकरणाचा तो श्लेष मैनाला कळत नसे. तिला वाटे मावशी बोललेला शब्द परत घेत आहे. ती विचारी, "मी मोठी झाल्यावर तरी खाचित देणार आहेस कां डबा ! "

" अगदीं नक्की."

मग अखेरचं मागणं म्हणून मैना विचारी " एक रेशमाची लडी तरी घेऊं कां ! "

तारा मावशी हंसे आणि म्हणे, " घे. "

कोणत्या रंगाची लडी घ्यावी त्याबद्दल मैनाच्या मनाचा निर्णय लवकर होत नसे. गुलाबी रंग हातांत उचलून घेतला कीं तिला वाटे केशरी रंग अधिक चांगला. तो घेतला कीं गडद हिरवा रंग घ्यावासा वाटे. ती सगळा डबा पालथा करी, आणि लडींशीं चाळा करीत

राही. सारेच रंग आळीपाळीनं तिच्या मनाला भुरळ घालीत. एकाच लडीची निवड करणं तिला मोठं अन्यायाचं वाटे. मग ती हळूंच एका रंगाची लडी फ्रॉकच्या खिशात घाली, आणि दुसऱ्या रंगाची लडी हातांत घेऊन दाखवीत विचारी " ही घेऊं ? " तारा म्हणे " घे. " मावशीला फसविल्याच्या आनंदानं मैनाला हंसूं येई. चोरी उघडकीस येण्याच्या आंत पळालेलं बरं असा विचार करून ती लगबगीनं कॉटवरून खाली उतरे आणि मावशीला म्हणे, " आम्ही जातों. आमच्या शाळेला उशीर होईल ना. " मावशी हंसून म्हणे " हं. पळा पळा. "

अशा पुष्कळ रेशमाच्या लड्या मैनानं लाटल्या होत्या. असाच तो डबासुद्धां लाटण्याची तिची इच्छा होती. परंतु डबा कांहीं फ्रॉकच्या खिशांत मावण्याजोगा नव्हता. मावशीला चुचकारून तो मागूनच घ्यायला हवा होता. किंवा मोठं होईपर्यंत थांबायला हवं होतं... पण मग मावशी एके दिवशीं निघून गेली होती ! तो सुंदर डबा तिच्याबरोबर गेला होता !...

तो डबा आतां तिच्या हातांत येत होता ! तिनं तो अतिशय आनंदानं हातांत घेतला आणि उघडला. आंत रंगीबेरंगी रेशमाच्या लड्या शिगोशीग भरलेल्या होत्या. तें पहातांच मैनाचा आनंद आणखी वाढला. " अय्या ! " असा उद्गार तिच्या तोंडीं विशेष शोभावा इतकी ती आता मोठी झाली होती. हातांत धरलेला डबा नाचवीत तिनं विचारलं, " मावशीनं दिला होय ? "

डॉक्टरांनीं मान हालविली. ते हंसले.

" तुम्हांला कुठें भेटली मावशी ? "

ते हंसले आणि म्हणाले, " तुलासुद्धां भेटणार आहे ती आतां. "

" केव्हां ? आपण जायचं तिच्याकडे ? "

" अंहं. "

" मग ? "

" तीच येणार आहे इकडे. "

" अय्या ! " असं म्हणून मैना सैंपाकघरांत धांवली आणि सारजाला तिनं बातमी सांगितली, " ए ! आपली मावशी येणार आहे. "

टेबलावर मांडलेली ताटं फडक्यानं पुशीत सारजानं विचारलं " कुणी सांगितलं ? "

" नानांनीं. चल, विचार खरं कीं खोटं तें. " ती तिचा ओचा ओढूं लागली.

" अहो अहो " असं म्हणून सारजानं आपला ओचा सोडवून घेतला, आणि ती मोठ्यादा हसूं लागली. ती म्हणाली " मावशी आल्या कीं मग तुमचा पाय कांहीं घरांत टिकणार नाहीं. जेवण–खाणसुद्धां तिकडेच कराल. बरं झालं माझं काम कमी होईल. "

सारजाचं भविष्य कांहीं खोटं नव्हतं.

तारा आल्यानतर मैना रात्रंदिवस तिच्याकडेच राहूं लागली. मावशी परत आली म्हणून तिला स्वतःला तर विलक्षण आनंद झालाच होता. परंतु तिनं पाहिलं तों तिचे नानाही आतां अगदीं पूर्ण आनंदात असलेले तिला दिसत होते. घरांतली दुःखाची छाया पार नाहींशी झाली होती. जिकडे तिकडे हंसरं प्रसन्न वातावरण भरलं होत... ती एखादे वेळेस नानांना विचारी " आतां पुन्हां नाहीं ना मावशी निघून जाणार ? "

" मला काय विचारतेस ? तिला विचार. "

" आतां मला न सांगता सवरता मावशी गेली तर पहा तर खरं. "

डॉक्टर हंसत आणि म्हणत " अरे तिच्या ! पण मला काय बजावतेस ? काय धाक दाखवायचा असेल तो तिला दाखव. "

मैना म्हणे, " मागं ती गेली तेव्हां तुम्ही जाऊं दिली तिला. म्हणून तुम्हांलाही सांगून ठेवतें. "

" असं असं ! बरं आहे लक्षात ठेवूं आम्ही. तिला कधीं जाऊं

द्यायची नाहीं एवढंच ना ?" असं म्हणून डॉक्टर तिला कुरवाळीत. मैनाला फार बरं वाटे.

अशीं वर्षामागून वर्षं गेलीं. सुखामागून दुःख, दुःखामागून सुख, पुन्हां दुःख, असा अनुभव मैनाच्या वाट्याला आला होता. त्यामुळें तिच्या मनांत वारंवार येई, या सुखाला एकदम धक्का तर बसणार नाहीं...

परंतु तिचं सुख कमी होण्याऐवजीं वाढत गेलं.

एके दिवशीं नानांनीं तिला विचारलं, "तूं सारखी तिकडे मावशीच्या घरांत असतेस हें बरं काय ?"

ती म्हणाली "कां ? तुम्हांला आवडत नाहीं कां ?"

"आवडतं."

"मग झालं तर. जिकडे मावशी तिकडेच मी असणार."

"म्हणूनच मीं आतां एक उपाय काढला आहे. तो केल्यावर तरी तू इकडे या घरांत टिकशील."

"काय करणार आहांत ?"

"तारालाच इकडे आणणार आहे. तुझी आई म्हणून !"

त्यांच्या तोंडचे ते शब्द ऐकल्याबरोबर मैनाची चर्या एकदम बदलली. तिला आनंद झाला होता खचित. परंतु कांहीं तरी अनपेक्षित कानीं पडल्यासारखं तिला वाटलं होतं. तारामावशी तिला अत्यंत प्रिय होती. लहानपणीं तर ती तिचं परब्रह्म होती. आणि आतां मोठेपणींही ती तिची फार आवडती होती...परंतु ती कधीं आपली आई होईल याची तिला पुसटदेखील कल्पना नव्हती. ...लहानपणींदेखील तिला वाटलं होतं की मावशी जितकी आपल्याला आवडते तितकीच नानांना आवडते. परंतु त्या दोघांतल्या भावनेचं स्वरूप त्या वेळीं तिच्या आकलनशक्तीच्या पलीकडे होतं...आतां तारा परत आल्यानंतर त्या दोघांच्या वागण्याकडे ती अधिक वाढलेल्या समजानं बघूं शकत होती...आतां तर तिला सोळावं वर्षं होतं. मॅट्रिकची परीक्षा पास होऊन ती कॉलेजांत गेली होती. स्त्री—पुरुषांतलं आकर्षण तिला थोडं फार कळूं

लागलं होतं. मावशीचं आणि नानांचं एकमेकावर प्रेम आहे याचा बोध तिला होऊं लागला होता...परंतु तो झाला तरीदेखील नाना मावशीशीं लग्न करतील आणि मावशी आपली आई म्हणून घरांत येईल अशी शक्यता तिच्या मनांत कधीं आली नव्हती... त्यामुळें नानांचं तें बोलणं ऐकल्याबरोबर तिला एकदम विलक्षण आश्चर्य वाटलं "हॅ! कांहीं तरीच" असा उद्‌गारदेखील तिच्या ओठाशीं आला. तिनं तो बाहेर पडूं दिला नाहीं. परंतु तिच्या तोंडावरचा विस्मयाचा भाव तिला चटकन लपवितां आला नाहीं...

नानांनीं तिला विचारलं, "मीं असं केलं तर तुला आवडेल ना?"

मग ती एकदम हंसली व म्हणाली "हो."

मनांतल्या मनांत मात्र तिला वाटलं, आतां मावशीला तोंड कसं दाखवायचं! तिचं नानांचं लग्न होणार आहे हें आपल्याला ठाऊक झालेलं असतांना तिच्याकडे जायचं कसं? पूर्वींसारखं मनमोकळेपणानं तिच्याशीं बोलणं चालणं आपल्याला कठीण जाईल. कांहीं एक नवाच संकोच वाटेल. कांहीं दिवस तरी...

परंतु नंतर तिला अनुभव वेगळा आला. तिला संकोच तर वाटला नाहींच, उलट असंच वाटलं कीं जणुं मावशी आपली आई होणार ही गोष्ट अगदीं उजूच होती. तिच्या दुधावर ती वाढली नव्हती एवढंच, परंतु तिनं जी माया सतत केली होती ती आईच्या मायेहून काकणभर जास्तच नव्हती काय? आई करील अशी कोणती गोष्ट तारामावशीन केली नव्हती? प्रत्यक्ष आईबद्दल जो जिव्हाळा तिला क्वचितच वाटला होता तो तिला तारांबद्दल नेहमीं वाटला होता. अगदीं लहानपणापासून. तारा एकाएकीं निघून गेली तेव्हां आईनं टाकलेल्या मुलासारखा पोरकेपणा तिला वाटला होता. ती कित्येक वर्षांनीं परत आली आणि भेटली तेव्हां आईच पुन्हां भेटल्यासारखं तिला वाटलं होतं... तिनं तिला आई म्हणून कधीं हांक मारली नव्हती एवढंच. बाकी ती तिची आईच होती...त्यामुळें नानांनीं आपल्या मनांतला हेतु

तिच्याजवळ उघड केल्यानंतरही ताराकडे जाण्यांत, राहण्यांत, तिच्याशीं बोलत बसण्यांत मैनाला संकोच वाटला नाहीं. तिच्या मनांत फक्त एवढंच येई कीं नानांनीं जी गोष्ट आपल्याला सांगितली ती मावशी कां आपल्याला सांगत नाहीं ? आपल्याला ती गोष्ट कळलेली आहे हें मावशीला माहीत आहे काय ... ? तिच्याकडे पाहतां पाहतां या प्रश्नांचा ठाव घेण्याचा ती प्रयत्न करी. तिचा तो प्रयत्न साधत नसे. मग तिला वाटे स्पष्टच विचारावं. परंतु तिच्या ओठापाशीं आलेले शब्द बाहेर पडत नसत.

एके दिवशीं रात्रीं जेवतांना नाना तिला म्हणाले, " उद्यां सकाळीं मी गांवाला जाऊन येणार आहे."

तिनं विचारलं " कुठें ? "

कुठें तें सांगण्याऐवजीं नाना म्हणाले " मी आणि तारा दोघं जाणार आहोंत. संध्याकाळीं परत येऊं."

मैना म्हणाली " बरं."

" मग तारा इथं आपल्या घरांत राहूं लागेल, तुझी आई म्हणून."

ते एवढंच बोलले. मग त्यांनीं अगदीं गप्प बसून जेवण आटपलं व ते आपल्या खोलींत निघून गेले.

त्यांच्या बोलण्याचा अर्थ मैनाच्या लक्षांत आला होता. तिला एवढंच नवल वाटत होतं कीं मावशीनं अजूनदेखील आपल्याला कांहीं कां सांगितलं नाहीं ? याबद्दल मावशीवर किती रागावावं आणि कसं रागावावं याचा ती विचार करूं लागली.

परंतु दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं ती शाळेंतून परत आली तों दार उघडायला आलेली तारा तिच्या दृष्टीस पडली. तिनं आंत पाऊल टाकल्याबरोबर तारानं तिला उचलून घेतलं, पोटाशीं घट्ट धरलं, तिचे मुके घेतले आणि ती रडूं लागली. रागावण्याचे मैनाचे सारे बेत विरून गेले. तारानं तिला आंतल्या खोलींत नेलं, जेवणाच्या टेबलावर बसविलं, आणि तिच्याकडे पाहून म्हटलं " मैना ! "

मैनानं पाहिलं तों तिच्या कपाळीं कुंकू होतं, गळ्यांत मंगळसूत्र

होतं, हातांत बांगड्या होत्या, तिच्या कोऱ्या साडीचा गंमतीदार वास येत होता...तिच्याकडे पाहतां पाहतां मैनाला हंसू आलं... मग तिनं एकदम " आई ! " असं म्हणून तिला मिठी मारली.

नंतरच्या दिवसात सुखाला केवढी भरती आली होती. वर्षा-मागून वर्षे गेलीं. मैना कॉलेजांतल्या दोन परीक्षा पास झाली. आता सुखांत एकच उणीव तिला वाटत होती. तिची आक्का दूर होती. ती कधीं घरीं येण्याची आशा नव्हती. तिच्यावरचा राग सोडायला आणि बहिष्कार उठवायला नाना मुळींच तयार नव्हते. परंतु तारानं बोलून बोलून त्याचं मन अखेर वळविलं होतं, अचलेला पत्र धाडून बोलवावयास लावलं होतं. ती आतां येणार होती. तिला उतरवून घेण्यासाठींच नाना, तारा, आणि ती स्वतः अशीं तिघंजणं आत्तां स्टेशनावर आलीं होतीं... आक्का येणार आणि रहाणार हें ठरल्यापासून मैना अशा कांहीं आनंदांत होती कीं त्या आनंदामुळें कित्येकदां तिची अवस्था भ्रमिष्टासारखी होई...

आपण भलत्याच प्लॅटफॉर्मवर आलों हें लक्षांत आल्यावर तिला आपल्या भ्रमिष्टपणाचं हंसूं आलं. माणूस फार आनंदांत असलं कीं असंच भ्रमिष्टासारखं वागतं कीं काय असं मनाशीं म्हणत ती घाई-घाईनं पावलं टाकीत दारांतून बाहेर पडली, आणि शेजारच्या प्लॅटफॉर्मवर नंबर पाहून आंत शिरली. कुणी तरी म्हणालं " हल्लो ! " तिनं थबकून पाहिलं. सुरेश लिमयेच पुन्हां तिच्यापुढें उभा होता ! तिनं विचारलं, " हें रे काय ? अजून गेला नाहींस कां तूं ? "

" तूं फोटो काढूं दिला नाहींस. तो काढल्याशिवाय जायचं नाहीं अशी प्रतिज्ञा केली होती."

" चेष्टा बस कर. अजून प्लॅटफॉर्मवरच कसा रेंगाळत ओहस, सांग."

" आमची फार फजीति झाली ! अगदीं झक्कपैकीं ! "

" काय झालं ? "

"आम्ही गाडींत बसलों बिसलों. मारामारी करून जागा मिळविली. गाडी सुटणार इतक्यांत कळलं कीं ती गाडी नेरळला थांबत नाहीं. आम्हांला तर जायचय माथेरानला. मग काय, सुरू झालेल्या गाडींतून टाकल्या उड्या आम्ही सगळयानीं. आतां या दुसऱ्या गाडीनं जाणार आहोंत."

"पण आतां ही तरी गाडी नेरळला थांबणार आहे कां?"

तें ऐकताच सुरेश लिमये मोठयांदा हंसला.

मैनाची नजर दूरच्या बाकाकडे गेली. नाना आणि आई दोघांनींही आपल्याकडे नेमकं पाहिल्यासारखं तिला वाटलं. तिच्या मनांत आलं, इतका वेळ आपण कुठें नाहींशा झालों म्हणून ती दोघं मनाशीं आश्चर्यच करीत असतील. कदाचित् त्या दोघाना अशीही शंका येईल कीं या तरुण मुलाबरोबरच ती इतका वेळ होती. त्यांना तशी शंका आली तर तें बरं नव्हे अशा विचारान तिचं तोंड गोरंमोरं झालं. ती सुरेश लिमयेला म्हणाली, "बरं जातें रे. माझे वडील तिकडे वाट पहाताहेत." सुरेशनं विचारलं, "कुठें?" नजरेची खूण करून ती म्हणाली, "ते बघ. त्या बाकावर." तिन पाहिलं तों नानाची आणि आईची नजर आतां तिच्याकडे नव्हती. मघाशीं तरी त्यानीं आपल्याला खरच पाहिलं काय कां आपल्याला उगीचच भास झाला, असं तिच्या मनांत आलं...

तिला भास झाला होता हेंच खरं होतं. नाना आणि तारा तिची वाट पहात असतील ही तिची कल्पनादेखील चुकीची होती. "व्हीलरच्या स्टॉलवर एखादं चांगल नवं पुस्तक मिळालं तर पाहतें हं" असं सांगून ती बाकावरून उठून गेली तेव्हांपासून नानांना तिची आठवण राहिली नव्हती. उशिरा येणाऱ्या गाडीची आपण वाट पहात आहोंत, आणि त्या गाडीनं अचला येणार आहे, याचंदेखील भान ते विसरले होते. त्यांच्या अंगावरून माणसं जात येत होतीं. त्यांच्या पाठीमागच्या प्लॅटफॉर्मवरील आगगाडींत प्रवासी येऊन बसत होते. गजबज चालू होती. समोरच्या रिकाम्या खंदकांतल्या रुळावरून मालगाडीचे डबे मागेपुढें ओढून नेले जात होते...परंतु

यांपैकीं कोणत्याही गोष्टीकडे त्यांचं लक्ष नव्हतं. त्या घटकेला त्यांना स्पष्ट जाणीव होती ती फक्त एका गोष्टीची. ते फार फार सुखांत होते ! आणि जिच्यावर त्यांनीं प्रेम केलं व जिनं त्याच्या आयुष्यांत सुख आणलं ती तारा त्यांच्याजवळ बसली होती ! ... या जाणीवेमुळें ते अणदीं गप्प झाले होते. ताराशींदेखील बोलावंसं त्यांना वाटत नव्हतं. फक्त बाकाच्या पाठीवर टाकलेल्या त्यांच्या हाताला तिचा थोडासा स्पर्श होत होता तेवढा त्यांना पुरेसा वाटत होता...त्यांच्या मनांत येत होतं, असं सुख माझ्या वाट्याला येईल असं कुणी सांगितलं असतं तर खरं वाटलं नसतं मला... अचला घरांतून नाहींशी झाली, अनुताईनीं दुखणं वाढवून घेतलं आणि अखेर त्यांचा अंत झाला तेव्हां त्यांना वाटलं होतं, आपल्या साऱ्या आयुष्याची माती झाली...

अनुताईच्या मृत्यूला बरेच दिवस झाल्यानंतर त्यांच्या मनांत येऊं लागलं होतं, आतां मीं ताराशीं लग्न कां करू नये ? त्यांची कल्पना होती कीं या गोष्टीला तारा ताबडतोब कबूल होईल. ते तिच्या भेटीसाठीं धांवत गेले होते. तारानं त्यांची निराशा केली होती....

ती त्यांना म्हणाली " नको. जें घडूं नये म्हणून मी तुम्हांला सोडून येऊन इकडे राहिलें तें आतां घडायला नको. "

डॉक्टरांनीं तिला आवेशानं विचारलं, " माझ्यावर तुझं प्रेम राहिलं नाहीं काय ? "

" असं भलतं बोलूं नका. मी पूर्वींच मनानं तुमची झालें. तुमचीच आहे. "

" पण आतां नुसतं मनानं कशासाठीं एकमेकाचं राह्यचं ? आतां अडचण कोणती ? " -

तें ऐकतांच तारा फार गंभीर झाली.

डॉक्टर म्हणाले, " सांग ना. आतां अडचण कुठली राहिली आहे ? "

तारा म्हणाली, " जी अडचण होती ती आतां उरली नाहीं

हीच मोठी अडचण आहे. समजत कसं नाहीं तुम्हांला ?"

"मला समजतही नाहीं, आणि पटतही नाहीं." त्यांच्या स्वरांत स्पष्ट राग होता.

"असे रागावूं नका." तारा मृदु स्वरानं म्हणाली, "माझं म्हणणं नीट ऐकून घ्या. पूर्वीं तुमचा संसार मला उस्कटायचा नव्हता. त्या बाई मूर्ख होत्या असं मला कितीही वाटलं. जें सुख मला मिळावं तें लायकी नसतांना त्यांना हक्कानं मिळालेलं पाहून मला त्यांचा कितीही मत्सर वाटला, तरी तें त्यांच्यापासून हिरावून घेण्याची माझी इच्छा नव्हती. मला कुणाचा घात करायचा नव्हता. पाप करायचं नव्हत. म्हणूनच तुमच्या संयमाची खात्री वाटेनाशी झाल्याबरोबर मी दूर झालें. सात वर्षं दूर राहिले ना ?"

डॉक्टरांनीं घाईनं प्रश्न केला, "पण आतां ?"

तारा म्हणाली, "आतां !—तुमच्या प्रश्नामागचा विचार मला कळतो. परंतु तुमचा विचार चुकीचा आहे. तुमची कल्पना अशी कीं पूर्वीची अडचण उरली नाहीं, तेव्हां आतां मी तुमच्याशीं लग्न करायला हरकत नाहीं. पण तस नाहीं. अडचण दूर झाली हीच आतां अडचण आहे. लोक म्हणतील अनुताईच्या मरणाचीच ही दोघं वाट पहात होतीं. पूर्वीं त्या जिवत होत्या तेव्हां एकादे वेळेस माझं मन फार भरकटत असे. वाटे, त्यांच्यापासून तुम्हांला ओढून घ्यावं आणि आपलंसं करावं. लोकांनीं वाईट म्हटलं तरी हरकत नाहीं. कधीं कधीं माझा मत्सर अनावर होत असे. पण आतां मत्सराचं कारणच उरलं नाहीं. तुम्ही मोकळे झालां आहांत. कुणापासून मी कांहीं हिरावून घेणार आहे अशांतली गोष्टच आता उरली नाहीं. पण म्हणूनच कीं काय कोण जाणे, लोक काय म्हणतील तें मनांत येतं, आणि वाटतं नको..."

तिचं असलं बोलणं डॉक्टरांना पटत नसे. परतु तिच्यावर जुलूम करण्याचीही त्यांची इच्छा नव्हती. ते फक्त वरचेवर तिच्याकडे जाऊन तिला भेटूं लागले व आग्रह करूं लागले. शेवटीं एके दिवशीं ती म्हणाली, "मी मुंबईस येतें. परंतु लग्नाची घाई तुम्ही

करतां कामा नये. त्याबद्दलचा निर्णय तुम्ही माझ्यावर सोपवायला हवा." डॉक्टरांनीं दोन वर्षे वाट पाहिली होती. अखेर त्यांची इच्छा पूर्ण झाली होती. त्यांच्या सुखांत कोणतीही उणीव राहिली नव्हती.

परंतु तारा मात्र वरचेवर त्यांना म्हणे कीं "माझ्या सुखांत अजून एक उणीव आहे. खरं म्हणजे तुमच्या सुखांतसुद्धा ती आहे. तुम्ही हट्टानं ती कबूल करीत नाहीं एवढंच."

डॉक्टर विचारीत "कोणती उणीव म्हणतेस ?"

"अचला आपल्या घरीं येऊ शकत नाहीं ही. तिला एकदां बोलावून घ्या."

ते म्हणत, "तुझं वाटेल तें ऐकेन. परंतु हें नाहीं ऐकणार. त्या पोरीनं फार मूर्खपणा केला. मला भलतं दुःख दिलं. मी तिला कधीं क्षमा करू शकणार नाहीं."

ज्या दिवशीं अनुताईचा मृत्यु झाला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं कानपुराहून त्यांना अचलेचं पत्र आलं होतं. पत्र खूप मोठं होतं. तिनं आपल्या मनांतले सारे विचार त्यांत लिहिले होते. दिवाकराशीं लग्न करून आपण किती सुखांत आहोंत त्याचं वर्णन केलं होतं. त्याची क्षमा मागितली होती. परंतु त्यांनीं तें पत्र रागानं केराच्या टोपलींत टाकून दिलं होतं. फक्त अनुताईच्या मृत्यूची बातमी त्यांनीं तिला कळविली होती, पण मला भेटायला येण्याची गोष्टदेखील तूं मनांत आणूं नकोस असं बजवलं होतं. त्यानंतरही अचलेचीं पत्रं मधून मधून त्यांना आलीं होतीं. एका पत्रात मैनाशीं पत्रव्यवहार करण्याची परवानगी तिनं मागितली होती. परंतु डॉक्टरांनीं तिला जबाब दिला नव्हता. तरीदेखील चार सहा महिन्यांनीं एखादं पत्र अचलेकडून येतच असे. तें आलं कीं डॉक्टर केराच्या टोपलींत टाकीत असत...

हें सारं त्यांच्याकडून कळलं तेव्हां तारा म्हणाली, "तुमचं चुकतं आहे."

डॉक्टरांनीं रागानं विचारलं "कसं ?"

ती म्हणाली " नीट ऐकून घेणार असाल तर सांगतें. लग्नाच्या आदल्या दिवशीं अचला घरांतून निघून गेली यांत तिची काय चूक झाली ? तुमची नाचक्की झाली हें कबूल आहे. परंतु ती झाली नसती आणि भटांच्या घरांत अचला गेली असती तर जे परिणाम घडले असते त्यापेक्षां तुमची तात्पुरती बेअब्रू झाली हेंच कमी वाईट झालं नाहीं कां ?-- "

" कांहीं तरी बोलतेस. "

" नाहीं, माझंच म्हणणं खरं आहे. शांतपणें विचार कराल तर तुम्हांला पटेल. तुमच्या म्हणण्याप्रमाणें अचलेनं लग्न करून घेतलं असतं तर तुमची अब्रू शाबूत राहिली असती, परंतु तिचं काय झालं असत ? ती जन्माची दुःखी नसती कां झाली ? आणि तिला दुःखी केल्याचं दुःख तुम्हांला नसतं का झालं ? आतां ती सुखांत आहे. दिवाकर फार वाईट आहे अशी तुमची कल्पना होती तीही खोटी ठरली आहे. तिचं काय चुकलं असं तुम्हांला म्हणतां येईल ? "

डॉक्टर म्हणाले " बरं बुवा. नाहीं चुकलं. ती शहाणी. आम्ही मूर्ख. मग तर झालं ? "

" असं वैतागून म्हटलंत तर त्यानं माझं समाधान कसं होईल ? "

" मग काय करूं म्हणतेस ? " डॉक्टर हसले.

ती हंसून म्हणाली, " लेकीवर राग किती दिवस धरायचा याचा विचार करा. मी तुमच्या घरांत आलें. या घरांतल्या सुखांत कोणतंही न्यून राहवं असं मला वाटत नाहीं. तुमचे पूर्वीचे राग लोभ काय असतील ते असोत. अचलेवरचा राग तुम्हांला योग्य वाटत असला तरीदेखील तुम्ही तो सोडायला हवा. माझ्यासाठीं. "

डॉक्टरांनीं तिला जवळ घेतलं आणि म्हटलं, " तुझ्यावर फार प्रेम आहे माझं. "

ती म्हणाली " म्हणूनच केवळ माझं सुख पहाण्याचा स्वार्थीपणा मला करायचा नाहीं. तुम्ही अचलेवर बहिष्कार घातला आहे त्याचं

तिला किती दुःख होत असेल हें तुम्हांला कदाचित् कळत नसेल. तुम्ही पुरुष आहांत. मला कळतं. परवांच्या पत्रात तिनं तुम्हांला काय लिहिलं आहे वाचलंत ना? दहा वर्षांत तिला दिवस गेले नव्हते. आतां गेले आहेत. माहेरीं यावसं तिला किती वाटत असेल. बोलावून घ्या तिला."

"मी नाहीं तिला पत्र लिहिणार."

एखाद्या हट्टी मुलासारखी त्याची चर्या झाली. ताराला हंसूं आलं. ती म्हणाली "तुम्ही नका लिहूं. मी लिहीन. मग तर झालं.?"

अशा प्रकारें तारानं घरांत आनंद आणि सुख आणलं होतं. त्यांच्या संसारांतलीं सारीं शल्यं काढून टाकलीं होतीं. समाधान वाढविलं होतं...

बाकाच्या पाठीवर टाकलेला हात डॉक्टरांनीं थोडा आणखी पसरला व ताराचा खांदा धरून प्रेमानं तिला किंचित् आपल्याकडे ओढल्यासारखं केलं...

तारा कोणत्या विचारांत होती कोण जाणे! त्यांच्या हाताचा स्पर्श झाल्याबरोबर तिनं मान वळवून त्यांच्याकडे पाहिलं आणि हंसत विचारलं, "काय?"

"काहीं नाहीं" असं म्हणून डॉक्टर हंसले.

तितक्यांत मैना घाईनं पावलं टाकीत त्यांच्याजवळ आली व म्हणाली "आक्काची गाडी आली ना!" तिनं दूर बोट दाखविलं. गाडीचं एंजिनं दिसूं लागलं होतं. लाल डगलेवाले हमाल धांवत येऊन रांगेत बैठक मारूं लागले होते.

उठता उठतां तारानं मैनाला विचारलं, "किती वेळ नाहीशी झाली होतीस ग!"

हातांतलं पुस्तक दाखवून मैना म्हणाली, "चांगलं पुस्तकच सापडेना ग. शेवटीं हें आणलं."

धाड धाड करीत, वाफेचे सुस्कारे सोडीत, चाकांचा घणाण घणाण आवाज करीत एंजिन आलं आणि पुढें गेलं. डब्यांमागून

डब्बे सरकले. खिडक्यांत उभी राहिलेलीं माणसं नजरेपुढून गेलीं. अखेर गाडी पुरती थांबली. आरोळ्या उठल्या, धांवाधांव झाली.

"अग ती बघ! त्या डब्यात!" असं म्हणत मैनान ताराला ओढीत नेलं. डब्याच्या चौकटींत उभ्या राहिलेल्या अचलेला खालीं ओढून घेऊन तिनं तिला मिठीच मारली. मिठीचा पहिला आवेग संपल्यावर ती अचलेला म्हणाली "कापूस चांगलाच स्वस्त झालेला दिसतो आहे ग."

आक्का म्हणाली, "होय बाई, मी फार सुटलें आहे खरी." तितक्यात तिची नजर ताराकडे गेली. पुढें होऊन तिनं तिला मिठी मारली आणि म्हटलं, "आई!"

डॉक्टर दूर उभे होते. पण त्या तिघींच्या मिठ्या पाहून त्याना गहिंवर आला होता. तारापासून दूर होऊन अचला त्यांच्याजवळ सरकली तेव्हां एका हातान तिला जवळ घेऊन दुसऱ्या हातानं त्यांनीं आपले डोळे पुसले.

तीं प्लॅटफॉर्मच्या दाराकडे निघालीं. मैनानं अचलेचा हात आपल्या खांद्यावर धरून ठेवला होता, आणि आपला हात तिच्या कमरे-भोंवतीं लपेटला होता.

"हल्लो!" असा शब्द ऐकतांच तिनं वळून पाहिलं. समोरून सुरेश लिमये येत होता. त्यानं हंसून विचारलं, "आली कां बहीण?"

"आली ना. ही बघ कीं." मैनाच्या मनांत एकदम काय आलं कुणास ठाऊक, ती त्याला म्हणाली "ए! फोटो काढांयचा आहे ना तुला? आमच्या दोघींचा काढतोस कां?"

"विथ प्लेझर!" असं म्हणून सुरेश लिमयेने कॅमेरा काढला, दोन पावलं मागं सरकत डोळ्याना लावला, "स्टेडी" म्हटलं, फोटो काढला, "आणखी एक घेतों हं" म्हणून पुन्हां एकदां क्लिक केलं आणि शेवटीं मोठा सफाईदार सलाम करून तो म्हणाला, "थँक यू!"

" थँक यू " म्हणून मैना हंसली व त्याला म्हणाली, " आतां तरी पुरी झाली ना प्रतिज्ञा ? "

तो मिस्किलपणानं हंसला व म्हणाला, " झाली ! पण अर्धीच ! "

' काय च्रावट आहेस ' अशा अर्थी मैनानं मानेला झटका दिला आणि अचलेला ओढीत ती म्हणाली, " चल."

अचलेनं तिला विचारलं " कोण ग ? "

" मग सांगेन सावकाश " असं म्हणत मैना पावलं टाकीत राहिली. चालतां चालतां तिनं हळूंच नानांकडे आणि ताराकडे पाहिलं. त्या दोघांच्या मनांत काय आलं होतं त्याचा अदमास घेण्याची तिची इच्छा होती.

: : ९ : :

अचला मोटारींत बसली ती मनांतल्या मनांत थोडीशी चकित होऊनच.

नानांची स्वतःची एवढी चांगली मोटार असेल अशी तिची कल्पना नव्हती.

परंतु मग तिच्या मनांत आलं कीं यांत आश्चर्य करण्यासारखं कांहीं नाहीं. ती लग्नापूर्वी घरीं होती तेव्हांच नानांची प्रॅक्टिस चांगल्यापैकीं होती. गेल्या दश वर्षांत स्वतःची मोटार ठेवण्याइतकी त्यांची भरभराट झालेली दिसली नसती तर तेंच आश्चर्य होतं...

तिच्या मनांतलं आश्चर्य नाहींसं झालं आणि मग निर्भेळ आनंद तेवढा उरला. आपला बाप चांगला पैसेवाला आहे आणि घरच्या सुंदर मोटारींत बसून आपण हिंडूं शकतों या कल्पनेचा कोणत्या मुलीला आनंद होणार नाहीं !

गाडीच्या मागच्या बाजूस ताराच्या दोन्ही बाजूंस दोघी बहिणी बसल्या. पुढच्या बाजूस ड्रायव्हर नानांच्या शेजारीं बसला, आणि नाना ड्रायव्हिंग करूं लागले. गाडींत गर्दी कितीशी होती, तूं कानपुरहून किती वाजतां निघालीस, तुझ्या घरांतल्या नोकर माणसांशीं तूं हिंदींतच बोलत असशील ना, तुझी साडी छान आहे, इकडे असल्या मिळत नाहींत, केवढ्याला घेतलीस—अशा प्रश्नांची मैना अचलेवर सरबत्ती करीत होती. अचला उत्तरं देत होती. दोघी बहिणी सारख्या बोलत होत्या आणि मधून मधून उगीचच हंसत होत्या...

गाडी थांबली. अचलेनं इकडे तिकडे पाहिलं आणि विचारलं, " हें काय ? इथें कुठें थांबलों आपण ? " उजव्या किंवा डाव्या

हाताला चंद्रनिवासची इमारत तिला दिसेना. "आपलं घर आलं ?"

डॉक्टर खालीं उतरले. ड्रायव्हर सरकून हाकण्याच्या जागीं बसला. डॉक्टर गाडीच्या मागच्या बाजूच्या खिडकीशीं उभे राहिले आणि ताराकडे बघत म्हणाले, "तुम्ही जा आतां घरीं. मी नेहमीप्रमाणें हॉस्पिटलमधलं काम आटपलं कीं घरीं येईन."

तारा म्हणाली, "उशीर नका करूं. घरीं लेक पाहुणी आली आहे. लक्षात राहील ना ?"

"तर !" असं म्हणून डॉक्टर हंसले व मग अचलेकडे पाहून म्हणाले, "दोघी बहिणींना गप्पांच्या नादांत माझी आठवण राहील कां तें त्यानाच विचार."

मैना आणि अचला हंसल्या. "अच्छा" असं म्हणून डॉक्टर दूर झाले. आणि एका मोठ्या इमारतींत शिरले. अचलेनं तोंड बाहेर काढून इमारतीच्या दुसऱ्या मजल्यावरची मोठी पाटी वाचली. ती वाचून तिला आश्चर्य वाटलं. नानानीं स्वतःचं स्वतंत्र हॉस्पिटल आणि क्लिनिक काढलं होतं म्हणायचं ! तिला कल्पना नव्हती. परंतु मघांप्रमाणेंच तिचं आश्चर्य क्षणात ओसरलं आणि आनंद तेवढा शिल्लक राहिला. ज्या इमारतावर हॉस्पिटलची पाटी होती ती सुंदर होती. पाटी खूप मोठी होती. नानांचं हॉस्पिटल फार उत्तम चाललं असलं पाहिजे...

गाडी चालूं झाल्यावर मैना अचलेला म्हणाली, "तुझं बाळंतपण घरच्या हॉस्पिटलमध्यें होणार आक्का. फर्स्टक्लास हॉस्पिटल आहे नानांचं."

अचला म्हणाली "मला कल्पना नव्हती. किती दिवस झाले नानांनीं हॉस्पिटल काढलं त्याला ?"

मैनानं ताराकडे बघून विचारलं. "किती वर्षे झालीं ग ?"

तारानं उत्तर दिलं नाहीं. ती नुसती हंसली, "ज्या वर्षीं माझ्याशीं लग्न केलं त्या वर्षींच त्यांनीं हॉस्पिटल काढलं." असं सांगण्याचा तिला संकोच वाटला. तिचं आणि डॉक्टराचं लग्न झाल्यापासून धंद्याची खूपच भरभराट झाली होती व त्यांचा लौकिक फार वाढला

होता. मुंबईतल्या साऱ्याच डॉक्टरांची या काळांत चलती झाली होती. ज्यांची स्वतःची मोटार नाहीं असा डॉक्टर क्वचितच आढळण्यासारखा होता. मात्र ज्यानीं पैसा आणि लौकिकही खूप मिळविली असे थोडे डॉक्टर होते. या थोड्यांपैकीं डॉक्टर सुलाखे होते. ते ताराला नेहमीं म्हणत, "तू माझ्या घरांत आलीस आणि येतांना जसं सुख आणलंस तसं भाग्यही आणलंस." ती त्याना म्हणे, "माझ्यावरच्या अति प्रेमामुळे तुम्हांला असं वाटतं एवढंच. तुमचं भाग्य मी कशाला आणायला हवं? तुमच्या अंगचे गुणच असे आहेत कीं भाग्य हात जोडून तुमच्यापुढे उभं राहिलंच पाहिजे..." असलीं बोलणीं किती वेळां झालीं होतीं त्याला गणति नव्हती... तीं बोलणीं ताराला आठवलीं. या दोन मुलींना तीं काय सांगायची अशा विचारानं ती कांहीं न बोलतां गप्प राहिली .... नानांचं हॉस्पिटल निघाल्याला किती वर्षे झालीं या प्रश्नाच उत्तर आपल्याला मिळालं नाहीं हें अचलेच्या लक्षांतच राहिलं नाहीं. मैनाची आनंदी बडबड सारखी चालली होती. त्यांत तिचं चित्त रमून गेलं...

चंद्रनिवासच्या दारापुढें गाडी उभी राहिली. मैनाच्या कोणत्या तरी बोलण्यानं अगदीं पोट धरधरून हंसतां हंसतां "आता मात्र कमाल झाली!" असं म्हणून अचलेनं डोळ्यांवर हात ठेवला होता. मैनाही मागं डोकं टेकून खदखदून हंसत होती. तारा त्यांना म्हणाली, "अग हंसणं पुरे आतां. घर आलं. उतरायचं आहे कीं नाहीं?" अचलेनं डोळ्यांवरचा हात काढला, "अय्या" असं म्हटलं, झटकन खालीं उतरून ती रस्त्यात उभी राहिली. चंद्रनिवासच्या प्रवेशद्वाराकडे बघत! ज्या दारांतून दहा वर्षांपूर्वी बाहेर पडतांना पुन्हां कधीं या दारांतून आपण आंत येऊं असं तिला वाटलं नव्हतं, त्या दारांतून आतां ती आंत शिरणार होती! खूप परिचयाचं तें प्रवेशद्वार तिला क्षणभर नवीनच भासलं. ती सबंद इमारतच तिला अर्धवट ओळखीची अर्धवट नवीन वाटली. तिनं झटकन दारांतून दृष्टि दूरवर टाकली. मधल्या विस्तीर्ण आवारांतलीं सुरूचीं झाडं आतां इतकी उंच झालीं होतीं कीं रस्त्यावर उभ्या राहि-

लेल्या अचलेला त्यांचें शेंडे दिसत नव्हते... दहा वर्षांनंतर आपण या इमारतींत शिरत आहोंत हा विचार अचलेच्या मनांत अगदीं जोरानं आला. किंचित् गोंधळल्यासारखंदेखील तिला वाटलं. परंतु तें क्षणमात्रच. कारण दुसऱ्याच क्षणीं मैनाचा हात तिच्या कमरे-भोंवतीं लपेटला गेला. "चल ना. वाट कसली पाहतेस?" असे मैनाचे शब्द तिला ऐकूं आले. पुढें जाण्यासाठीं तिनं पाऊल उचललं...

तितक्यांत तारा तिला म्हणाली, "बऱ्याच पायऱ्या चढायच्या आहेत. ही मैना धांवेल आणि तूंही तिच्या मागं धावशील—"

मैना म्हणाली, "काहीं तरीच तुझं. मी तिला धांवायला कशी लावीन? तिनं फार जपून जिने चढले पाहिजेत एवढं मला कळत नाहीं होय?"

तारा म्हणाली, "कळतं ग. पण लक्षांत नाहीं राह्यचं तुझ्या आक्काला घेऊन पळूं कीं उडूं असं झालंय तुला आनंदानं. म्हणून सांगितलं. अगदीं सावकाश या दोघीजणी. मी पुढें होतें. अचला इतक्या वर्षांनीं आली, घरांत पाऊल टाकण्यापूर्वीं तिच्या पायांवर पाणी ओतायला हवं, तिच्यावरून भाकर तुकडा ओवाळून टाकायला हवा." बोलतां बोलतां तारा पुढें झटकलीच.

दोघी बहिणी किंचित् थबकल्या होत्या त्या चालूं लागल्या. तितक्यात "मैनाताई! अहो मैनाताई!" अशा हांका ऐकूं आल्या, आणि मागोमाग इमारतीच्या दर्शनी भागांत जीं दुकानं होतीं त्यातल्या एका दुकानांतून सुमारें चोवीस पंचवीस वर्षांचा एक तरुण लगबगीन उतरला व जवळ येऊन म्हणाला, "आक्का आल्या कीं काय?" त्यानं अचलेला नमस्कार केला. त्याचा नमस्कार अगदीं व्यवस्थित ब्राह्मणी शिष्टाचाराचा होता. परीटघडी लेंगा, शर्ट, जाकीट असा पोषाखही अगदीं व्यवस्थित होता. पण तरीदेखील त्याची एकंदर चर्या ब्राह्मणाची वाटत नव्हती. अचलेला क्षणभर कळेना तो कोण तें. जणुं तें ओळखून तो तरुण म्हणाला, "मला ओळखलं नाहींत?"

मैना चटकन म्हणाली, " अग सुतारमामांचा सदू नाहीं कां हा? मामा आतां थकून घरीं बसले आहेत. पण सदूनं धंद्याचा जम उत्तम बसवला आहे. लहान मुलांच्या खेळण्यांचं दुकान थाटलं आहे त्यानं याच बिल्डिंगमध्यें. चार वर्षं झालीं. "

" अस्सं होय! आत्तां ओळखलं हो!" अचला हंसत म्हणाली, " लहानपणीं तुझी आणि या सदूची केवढी मैत्री होती!"

मैना म्हणाली, " ती मैत्री आठवली कीं वाटतं उगीच झालों आपण मोठ्या. नाहीं रे सदू? नाना सांगतात कीं तूं बाजा फार चांगला वाजवायचास. आणि मला गच्चीवर नेऊन गोष्टी सांगायचास—"

सदू हंसला, आणि अचलेला म्हणाला, "एक मिनिटभर या ना दुकानांत."

अचला म्हणाली, " आतां घाईत कशाला? सावकाश येईन तुझं दुकान पाह्यला."

मैना म्हणाली " आतां अचलेला बाळ झालं कीं तुझ्या दुकानांतलीं खूप खूप खेळणीं खरेदी करावी लागतीलच कीं आम्हांला. "

सदू हंसला व म्हणाला " काय तुमचं बोलणं मैनाताई! माझ्या दुकानांतलीं खेळणीं विकत घ्यायचीं होय तुम्ही! अक्काच्या बाळासाठीं मीं आहेर नाहीं कां करणार!"

" कर कीं. नको कोण म्हणतंय? पण शिवाय आम्ही विकत घेतलीं तर!—"

सदूला हंसू आलं. त्यानं अचलेला बजावलं, " केव्हां तरी सवडीनं यायला हवं बरं कां दुकानांत."

" येईन ना! अगदीं अवश्य येईन" असं अचलेनं म्हटलं आणि दोघी बहिणींनीं प्रवेशद्वारांतून आंत पाऊल टाकलं.

अचलेनं समोर दूरवर आणि सभोंवार नजर टाकली आगाशी-आगाशींत माणसं उभी होतीं. परंतु तीं तिच्या ओळखीचीं असणं किंवा त्यांना तिची ओळख असणं फारसं संभवनीय नव्हतं. त्या

उंच उंच खिडक्या, त्या गॅलऱ्या जुन्या होत्या. परंतु दहा वर्षांचा कालप्रवाह वाहून गेला होता. बिऱ्हाडाबिऱ्हाडांतलीं माणसं बदललीं असतील. मोठी माणसं म्हतारी झालीं असतील, मुलं मोठा झालीं असतील, कांहीं मुली सासरी गेल्या असतील, नव्या सासुरवाशिणी कांहीं घरात आल्या असतील—असे विचार अचलेच्या मनात झरकन आले. आपल्या परिचयाच्या जुन्या जागेत आपण उभ्या आहोंत असही तिला वाटलं; या कुठल्या नव्या ठिकाणीं आपण आलों अशा विचारानं तिचं मन किंचित् भांबावलंही...मैनाबरोबर जिन्याच्या पायऱ्या चढतांनाही तिला त्या नव्याही वाटत होत्या, ओळखीच्याही वाटत होत्या...दिवाकराला भेटण्यासाठीं चोरून बसच्या स्टॉपवर जातांना कितीदा तरी याच पायऱ्यावरून ती धांवली नव्हती कां ? घर सोडून जाताना यातलीच एकेक पायरी उतरतांना तिचं पाऊल अडखळलं नव्हतं काय, आणि मनाचा निश्चय कायम ठेवणं तिला कठीण वाटलं नव्हतं काय ?...त्या पायऱ्या तिला चांगल्या आठवत होत्या, आणि नव्याही वाटत होत्या...एकेका मजल्यावर दोन्ही बाजूंच्या बिऱ्हाडाच्या नांवाच्या पाट्या ती वाचीत होतों, व हे गुप्ते कोण बरं, हे तासकर कोण बरं, असं स्वतःला विचारीत होती. एखाद्या पाटीकडं बोट दाखवून मैना सागत होती, "मागें इथें पाध्ये रहात हेते बरं कां आक्का. पण ते ब्रह्मदेशांत गेले तेव्हां त्यांनीं ब्लॉक विकून टाकला. आतां इथें देव राहतात. यांची मुलगीसुद्धा नुकतीच बाळंत झाली. नानांच्या हॉस्पिटलमध्येंच..."

रात्रीं जेवल्यानंतरसुद्धां इतर गप्पा मारतां मारतां अचला मधूनच विचारींत होती "चव्हाणांच्या म्हाताऱ्या दुर्गाताई आहेत कां ग अजून ?" "समोरच्या तिसऱ्या मजल्यावरच्या देवधराच्या घरांत आतां कुत्रीं किती आहेत, चार कीं सहा ?" मैना तिला माहिती पुरवीत होती. दिवाकरच्या माणसांबद्दल मात्र तिनं मैनाला कांहींच विचारलं नाहीं. शिक्षा भोगून सुटून आल्यापासून दिवाकरानं वडिलांचा संबंध अजिबात सोडला होता. वडिलांनीं आल्यावर

कधींदेखील खरी ममता केली नाहीं, आपल्या नाटकी उद्योगांत सदा मग्न राहून आपल्या शिक्षणाची सर्वथा आबाळ केली, म्हणूनच अपगा दुर्गतीनीं निवालों, अशी त्याची भावना झाली होती. आपलं लग्न झाल हेंही त्यानं घरीं कळविलं नव्हतं. ताराचं आग्रहाचं पत्र आलं आणि अचला माहेरीं यायला निघाली तेव्हां त्यानं तिला बजावून सांगितलं, आमच्या घरीं जायच्या भानगडींत पडूं नकोस. आई-बापांनीं काय मोठा संबंध ठेवला आहे तर आपण ठेवायचा.... म्हणून दादासाहेबांच्या कुटुंबाबद्दल अचलेनं मैनाला विचारलं नाहीं...

परंतु मैनाच आपण होऊन म्हणाली, "समोरच्या दादासाहेबांची हकीगत माहीत असेलच तुला."

अचला म्हणाली, "नाहीं. आमचा त्यांचा पत्रव्यवहार नाहीं. काय हकीगत म्हणतेस?"

"त्यानीं ब्लॉक विकून टाकला कीं."

"असं?"

"हो ना खूप देणं झालं म्हणे त्यांना. म्हणून ब्लॉक विकून टाकला आणि सांगली मिरजेकडे कुठें शेती आहे तिकडे राहायला गेले आहेत."

एकदम आठवण झाल्याप्रमाणें चर्या करून अचलेनं विचारलं, "तुझा लहानपणाचा मित्र नंदू कुठें आहे आतां?"

"तो मात्र इथेंच आहे. इथें म्हणजे चंद्रनिवासांत नाहीं, मुंबईत. बसचा कंडक्टर झाला आहे. परवांच मला अचानक भेटला होता. मीं त्याला प्रथम ओळखलाच नाहीं. पर्समधली पावली काढून पुढें केली आणि म्हटलं चर्चगेट. त्यानं विचारलं काय ओळख लागते कां? चंद्रनिवासांत तुमच्यासमोर रहात होतों ना आम्ही. मग मीं ओळखलं आणि मला एकदम हंसू आलं."

"असं काय? गंमतच म्हणायची!"

शेवटीं निजायच्या खोलींत जातां जातां तारा मैनाला म्हणाली, "आतां निजूं दे ग तिला. खूप दिवस राह्यची आहे आक्का

आपल्याकडे. सगळ्या गप्पा आज रात्रीं मारून संपविल्या पाहिजेत असं नाहीं ना ? " असं म्हणून तिनं खोलींतला दिवाच मालविला.

अंगावर पांघरूण ओढून घेतां घेतां मैना म्हणाली, " आम्ही काय कुक्कुलीं बाळं आहोंत कां ग आम्हांला दामटून निजवते आहेस ती ? "

" बाळाहून बाळं झालां आहांत तुम्ही दोघीजणी ! " असं म्हणून मोठ्यांदा हंसत तारा गेली.

मैना अचलेला म्हणाली " लाव ग पुन्हां दिवा. तुझ्या बंग-ल्याचे फोटो तूं दाखवणार आहेस ना ? ते बघायचे राहिले आहेत कीं. "

अचला म्हणाली, " आतां निजूं या. "

मग मैनाची बडबड बंद झाली. थोड्या वेळानं तिला झोपही लागली.

अचला उठली आणि आगाशींत गेली. घरीं आल्यापासून आगाशींत जाण्याची इच्छा तिला दहादां झाली होती. परतु समोर वीरकरांच्या जागेंत कुणीं उभं असलं तर आपण दिसूं या शंकेनं तिनं ती इच्छा दाबली होती...आतां वीरकरांची माणसं समोर नाहींतच असं तिला कळलं होतं ... ती आगाशींत गेली आणि भिंतीशीं थोडसं वाकून स्वस्थ उभी राहिली ... माणसाच्या मनांत फार दु:ख किंवा फार आनंद अचंबळून आलेला असला कीं त्याला एकांताची मधूनच लहर येते. अचलेला तशी लहर या क्षणीं आली होती. स्वतःच्या आनंदाच्या सोबतींत अगदीं एकटं घटकाभर रहा-वंसं तिला वाटत होतं. भिंतीशीं उभं राहिल्या राहिल्या मनांतल्या आनंदाचा निर्वेध उपभोग ती घेत होती...

चंद्रनिवासांतल्या बहुतेक बिऱ्हाडांत निजानीज झाली होती. क्वचित् एखाद्या ब्लॉकमध्यें एखादा दिवा होता. परंतु आवारांतल्या चार कोपऱ्यांतले चार दिवे लागलेले होते. आभाळांतला चंद्रही अगदीं माथ्यावर आलेला होता. त्यामुळें सारी इमारत उजळून

निघाली होती...खालच्या आवारांतल्या सुरूच्या झाडांच्या शेंड्यांवर चंदेरी मुलामा दिल्यासारखा भासत होता. अगदीं मधोमध जें मोठं झाड दिसत होत तें प्राजक्ताचं असलं पाहिजे. कारण त्याच्या फुलांचा दरवळ सुटला होता. अचला मनाशीं म्हणाली, मी पाहिलीं तेव्हां सुरूचीं झाड किती छोटीं होतीं. आणि हें प्राजक्ताचं झाड नव्हतंच. निदान असल्याचं मला आठवत नाहीं. पूर्वीं आवारात मोर होते ते संध्याकाळीं तिला दिसले नव्हते. कुठें आडोशाला बसले होते कीं मेले बिले होते! मोर किती वर्षं जगतात कुणास ठाऊक! समोरच्या व उजव्या अंगाच्या ब्लॉक्समध्यें सामसूम होती, तिथल्या, माणसांचे दिवसाचे व्यवहार थांबले होते, कुणी सुखाची झोप घेत असतील, कुणी अंथरुणावर तळमळत असतील. सुखाची आणि दुःखाची ये-जा घराघरांत चाललेली होती, कांहीं सुखदुःखं भूत-कालांत जमा होत होतीं, त्यांच्या जागीं नवीं सुखदुःखं उभीं रहात होतीं. सुखदुःखांप्रमाणेंच माणसांतले ऋणानुबंध संपत होते. एक वेळ अशी होती कीं समोरच्या वीरकरांचा नंदू आणि रामराव दाणींचा अमू मैनाला खेळायला बोलवायसाठीं आले नाहींत असा एकदेखील दिवस जात नसे. आतां ते दोघे तिच्या आयुष्यातून निघून गेले होते. नंदू बसकंडक्टर झाला होता, अमू खोपोलीच्या विजेच्या कारखान्यांत नोकरी करीत होता म्हणे. व्यक्तिव्यक्तींचे संबंध संपले होते, त्यांची जागा दुसऱ्यांनीं घेतली होती...अचलेच्या मनांत आलं, माणसाच्या एकंदर जीवनाची हीच तऱ्हा आहे म्हणायची. या चंद्रनिवासातल्या माणसांच्या व्यवहाराकडे पाहणं म्हणजे मानवी जीविताचा एक तुकडा सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं ठेवून पाहण्यासारखंच आहे...

तितक्यांत पूर्वीं समोरच्या ज्या ब्लॉकमध्यें वीरकर रहात असत त्यांतला एक दिवा लागला, आणि एक तरुण पुरुष आपल्या उघड्या छातीवर हात चोळीत चोळीत बाहेर आगाशींत आला व सिगरेट पेटवून ओढूं लागला... अचलेच्या मनांत आलं, पंधरा वर्षांपूर्वीं समोरच्या त्या जागेला तिच्या दृष्टीनं केवढं महत्व होतं! त्या जागेकडे किती उत्सुकतेनं

ती नजर टाकीत असे. त्या ब्लॉकमधल्या खोल्याखोल्यांतली माणसांची हालचाल लक्षपूर्वक बघत या ठिकाणीं ती किती वेळां उभी राहिली होती. दिवाकरानं आगाशींत येऊन कसल्या तरी संकेताची हळूच खूण केली कीं तिचं हृदय केवढ्यांदा धडधडूं लागत असे . . . पण आतां त्याच जागेबद्दल तिचा कांहं मात्र भावना उरली नव्हती. तिच्या सुखाचा आणि त्या जागेचा कांहीं संबंध नव्हता. दिवाकरानं तिला फार सुखी केलं होतं. आणि त्या सुखातलं उरलं सुरलं न्यून तारामावशीनें दूर केलं होतं. संध्याकाळपासून केवढ्या ममतेनं तारामावशी तिच्याशीं वागली होती ! तिच्या प्रकृतीची चौकशी किती प्रेमानं तिनं केली होती; आणि तिच्या प्रसूतीचे बेत किती कौतुकानं केले होते ! ती म्हणाली होती, "दहा वर्षांनीं तुला दिवस गेले आहेत. कदाचित् तुझं बाळंतपण अवघड जाणार असेल. पण तूं काळजी करू नकोस. घरचीच उत्तम व्यवस्था आहे. उद्यां सकाळीं तुला घेऊन मी हॉस्पिटलमध्यें जाईन. डॉक्टर तुझी संपूर्ण तपासणी करतील." अशा बोलण्यानं अचलेला धीर आला होता. आपली पहिली खेप सुखाचीच होईल अशी खात्री वाटली होती. बाळंतपणासाठीं आपण इकडे आलों हें फार बरं झालं असं वाटलं होतं... पण तरीसुद्धां जो विचार आतांशा अनेक वेळां तिच्या मनांत येई तो आतां या क्षणीं पुन्हां आला. प्रसूतीच्या प्रत्येक घटकेला कोणत्या दिव्यांतनं आपल्याला जावं लागणार आहे ? मातेच्या उदरांतून अपत्य बाहेर यायचं म्हणजे निसर्गाचा एक मोठाच चमत्कार. त्या चमत्काराचा प्रत्यक्ष अनुभव खरोखर कसा असेल ! तिनं सहज वर पाहिलं. माथ्यावरून चंद्र आतां ढळला होता. आकाशाचा विस्तार केवढा भव्य वाटत होता. भोंवतालची स्तब्धताही अचलेला त्या क्षणीं एकदम भव्य अशी वाटली, आणि तिच्या मनांत आलं, आपली प्रसूति म्हणजे निसर्गाच्या या एकंदर भव्यतेचाच एक लहानसा अंश आहे . . . तितक्यांत तिच्या पोटांत अगदीं स्पष्ट जोराची हालचाल झाली. आतांशा ज्या ज्या वेळेस ती हालचाल झालीशीं वाटे त्या त्या वेळेस तिच्या मनांस येई, थोडीशी असह्य परंतु किती

सुखाची संवेदना ही ! स्त्रीला मिळणारा हा एक अपूर्व अनुभव आहे खरा. त्या अनुभवावाचून स्त्रीच्या जीवनाला पूर्णत्व येत नाहीं म्हणतात तें कांहीं खोट नाहीं . . . तिच्या पोटांत आणखी हालचाल झाली. ती स्वतःशीच हंसली ... तितक्यांत समोरच्या ब्लॉकमधला दिवा मालविला गेला, आणि त्या क्षुल्लक गोष्टीमुळें भानावर आल्याप्रमाणें अचला आगाशिच्या भिंतीपासून दूर झाली आणि खोलीच्या दाराकडे वळली . . .

खोलींतला दिवा तिनं लावला नाहीं. परंतु बाहेरून खोलींत आलेल्या अंधुक उजेडांत तिनं पाहिलं तों मैना जागी असलेली तिला दिसली. तिनं विचारलं " काय ग, झोप नाहीं लागली तुला ? "

मैना म्हणाली " लागली होती. पण एक स्वप्न पडलं अन् जागी झालें. "

" कोण दिसलं स्वप्नांत ? स्टेशनावर भेटलेला तो कॅमेरावाला ?"

" शीः ! तो कशाला दिसतो आहे ? तूं बाळंत झालीस असं स्वप्न पडलं. आणि तुला झालेला मुलगा दिवाकरासारखाच अगदीं काळामिट्ट कुरूप दिसला. " असं म्हणून मैना हंसूं लागली.

तिला हळूंच चापट मारल्यासारखं करून अचला म्हणाली, " असं कां ? तुला कसलं पुत्ररत्न होईल तें पाहीनच कीं. अन् काय ग, माझ्या बाळंतपणाची स्वप्नं माझ्यापेक्षां तुलाच जास्त पडताहेत होय ? "

मैना हंसली आणि म्हणाली, " खोटं नाहीं आक्का. तूं बाळंत व्हायसाठीं घरीं आली आहेस याचा मला भलताच आनंद झाला आहे. माझं सारं लक्ष लागलं आहे आई आतां तुझीं डोहाळजेवणं करील तेव्हां किती मजा होईल त्याकडे. इकडे ये म्हणून तुला पत्र लिहिलं तेव्हापासून तुझीं किती डोहाळजेवणं करायचीं, कशीं कशीं करायचीं याचे बेत आम्ही दोघींनीं दहादां केले आहेत. "

तें ऐकून अचलेला फार आनंद झाला, पण मैनाच्या अंगावरचं

पांघरूण सरकवीत ती म्हणाली " बरं बरं. पण नीज आतां. "

मैनानं अचलेला सांगितलं तें कांहीं खोटं नव्हतं. तिच्या डोहाळजेवणाचे बेत तारानं खरोखरच आधींच करून ठेवले होते. त्यांपैकीं एकेक बेत मोठ्या उत्साहानं पार पडूं लागला. प्रत्येक वेळेस मैना कामाची मोठी धांदल उडवून घरभर नाचूं लागली. झोपाळ्यावरचं डोहाळजेवण होतं त्या दिवशीं तर मैनानं डॉक्टरांनादेखील बजावून सांगितलं कीं " आज तुम्ही घरीं राह्यलं पाहिजे. "

डॉक्टर म्हणाले," वा ग वा ! शहाणीच आहेस. तुम्हां बायकांत मिसळूं कीं काय मी ? "

" मिसळूं नका हो. पण इकडे आपल्या खोलींत बसून सारं ऐका तरी. "

" हॅः ! त्यांत काय ऐकण्यासारखं आहे ? "

मैनानं डॉक्टरांकडे निरखून पाहिलं. गेल्या पंधरा दिवसांत तिला शंका आली होती की अचला घरीं आली म्हणून तिला स्वतःला आणि ताराला जितका आनंद झाला होता तितका नानांना कांहीं झाला नव्हता. ते वरकरणी आनंद दाखवीत होते. परंतु त्यांचा आनंद मनापासूनचा नव्हता. त्यांच्या मनांत खोल कुठें तरी नाराजीची आणि रागाची अढी होती. अचलेला त्यानीं संपूर्ण क्षमा केल्यासारखं दिसत नव्हतं. घरांत एकेका डोहाळजेवणाची गडबड चाललेली असे. परंतु नाना कधींच घरांत नसत... तिनं त्यांची चर्या निरखून बघत विचारलं, " आपल्या लेकीचं बायका कसं कौतुक करतात तें ऐकावंस नाहीं कां वाटत तुम्हांला ? "

" अग तुमचीं तीं बायकी गाणीं, उखाणे— "

" त्यांतसुद्धां मजा असते बरं कां नाना. पण आज थोडी निराळी मजा आहे. माझ्या एका मैत्रिणीला मीं बोलावलं आहे. रेडिओवर गाणारी आहे ती. ती गाणं म्हणणार आहे. तें तर

ऐकाल कीं नाहीं? आज तुम्हीं घरांत राह्यलंच पाहिजे. राहीन म्हणा पाहूं?"

"बरं बुवा राहीन."

दुपारीं जेवण आटोपल्यावर डॉक्टर आपल्या खोलीकडे निघाले तेव्हां तिनं त्यांना पुन्हां आठवण केली. "आज आम्ही सोडल्याखेरीज जायचं नाहीं बरं कां हॉस्पिटलमध्यें! लक्षांत आहे ना?"

डॉक्टर हसले आणि तिला म्हणाले, "जेलरचं काम चांगलं करशील तूं."

तिसऱ्या प्रहरीं आमंत्रित बायका आल्या. त्यांनीं झोपाळा शृंगारला, कोरं लुगडं, कोरी चोळी, दागिने अशा थाटांतल्या अचलेला त्यांनीं झोपाळ्यावर बसविली आणि तिला फुलांचा शृंगार घातला. कौसल्येच्या डोहाळ्यांचं गाणं एका पाहुणीनं सुरू केलं तितक्यांत त्या बाईला थांबवून मैना म्हणाली "जरा थांबा हं." ती धांवत खोलीबाहेर गेली. तिनं कां थांबा म्हटलं त्याचा बोध बायकांना होईना. "काय करते आहे कुणास ठाऊक!" तारा कौतुकानं म्हणाली.

मैना नानांच्या खोलींत गेली आणि त्यांना म्हणाली, "पली-कडच्या खोलींत एक मिनिट चला."

त्यांनीं विचारलं "मी? कशाला?"

"आक्का कशी दिसते तें बघा तरी!" त्या क्षणीं तिच्या मनांत खरोखरच आलं होतं कीं गर्भारपणाच्या तेजानं अचलेचं रूप विशेषच खुललं होतं, आणि एखाद्या नक्षत्रासारखी ती दिसत होती. साजशृंगारांत झोपाळ्यावर बसलेल्या अचलेला नानांनीं एकदां पहावी असं मनांत आल्यामुळेंच बायकांना जरा थांबायला सांगून ती त्यांच्याकडे धावली होती. त्यांच्या हातांतलं पुस्तक तिनं काढून घेतलं आणि म्हटलं, "चला ना."

"वेडी कां काय तूं मैने?"

" वेडी म्हणा कांहीं म्हणा. या वेळेस तुम्ही आक्काला एकदा पाहवंच अशी माझी फार इच्छा आहे. "

डॉक्टर उठले. पलीकडच्या खोलीकडे मैनाबरोबर गेले. त्यांनीं आंत पाऊल टाकलं नाहीं. नुसतं खोलींत डोकावून पाहिलं. दाराच्या चौकटींत ते दिसल्याबरोबर खोलींतल्या बायका जागच्या जागीं उठून उभ्या राहूं लागल्या. अचलादेखील झोपाळ्यावरून उतरली आणि खूप लाजल्याप्रमाणें " अय्या ! " असं पुटपुटून तिनं तोंड फिरविलं व आपल्या दोन्ही हातांत लपविलं.

डॉक्टर तिला म्हणाले, " बैस ग बैस " आणि ते परत फिरले.

जो प्रकार झाला त्याला उद्देशून साऱ्याच बायका खो खो करून हसूं लागल्या. कांहीं बोलण्याऐवजीं खुदखुदू हंसण्याचा गुण लहान मुलींतच असतो असं नव्हे. वय वाढलं तरी न जाणारा बायकांचा गुण आहे तो. अचलेनं मैनाला चापट मारली आणि म्हटलं, " नानांना कशाला घेऊन आलीस ग ? "

मैनानं उत्तर देण्याऐवजी तिचे खांदे धरून म्हटलं, " बैस बैस आतां झोंपाळ्यावर. " कौसल्येचे डोहाळे म्हणणाऱ्या पाहुणीकडे वळून ती म्हणाली, " हं, आतां म्हणा. तुमचं हें डोहाळ्याच गाणं संपलं कीं माझी मैत्रीण पदं म्हणणार आहे बरं कां. "

डोहाळ्यांचीं गाणीं चालू असतांना तिनं मधेंच एकदां नानांना चहा नेऊन दिला व त्यांना नोटीस दिली की एवढं गाणं संपल्यावर माझी मैत्रीण पदं म्हणणार आहे. तीं ऐकल्यावर जा तुम्ही हॉस्पिटलमध्यें.

डॉक्टर म्हणाले, " आज तुझ्या ताब्यांत सांपडलों आहे खरा."

ती हंसली आणि परत बायकांच्या बैठकींत गेली.

तिच्या मैत्रिणीच्या पदांचा कार्यक्रम संपल्यावर नानांच्या खोलींत ती पुन्हां आली व म्हणाली, " आतां सोडतों आम्ही तुम्हांला." माझ्या मैत्रिणीचीं पदं तुम्हांला कशी काय आवडलीं असं ती त्यांना विचारणार होती. परंतु त्यांच्या चर्येवर तिला आनंद दिसला नाहीं, त्यांच्या हातांत एका इंग्रजी साप्ताहिकाचा लांबट सचित्र अंक

होता त्याकडे ते अर्धवट पहात होते, आणि त्यांच्या मुद्रेवर थोडीशी रुष्टता दिसत होती. ओठाशीं आलेला प्रश्न मैनानं परतविला, व ती त्यांच्याजवळ गेली. तिला कळेना, नानांचा चेहरा असा नाराज कां ? त्यांना खुलविण्यासाठीं ती म्हणाली, " अगदीं उत्तम झाला आमचा प्रोग्रॅम. बायका म्हणत होत्या. आक्काचा फोटो काढायला हवा होता. झोपाळ्यावर बसलेला— "

" हा फोटो बघ—" नाना चटकन म्हणाले व मासिकाचं उघडलेलं पान त्यांनीं तिच्यापुढें धरलं.

त्या पानावरचा फोटो मैनानं पाहिला. तो तिला ओळखतां आला नाहीं. म्हणून तिनं पुन्हां पाहिला, आणि मग डॉक्टरना विचारलं " कुणाचा हा हा फोटो नाना ? "

डॉक्टर म्हणाले, " त्या फोटोंत जी बाई तुला दिसते आहे ना तिच्या जागीं खरं म्हणजे तुझी आक्का असायची ! "

त्यांच्या बोलण्याचा बोध न झाल्याप्रमाणें तिनं त्यांच्याकडे बघितलं.

ते म्हणाले, " फोटोखालचा मजकूर वाच म्हणजे तुला कळेल. ज्याच्याशीं अचलेचं लग्न आम्ही ठरविलं होतं त्या भटांच्या मुलाचा फोटो आहे तो. मोठ्या हुद्याच्या जागेवर आहे तो हल्लीं. सरकार त्याला आपल्या खर्चानं यूरपच्या प्रवासाला पाठवीत आहे. म्हणून निघाला आहे बायकोला घेऊन. अचलेनं आमचं ऐकलं असतं, मूर्खपणा केला नसता तर एका मोठ्या अधिकाऱ्याची बायको म्हणून तिला मिरविता आलं असतं आणि यूरपच्या प्रवासाला गेली असती ! "

त्यांचं तें म्हणणं मैनाला पटलं नाहीं. 'आक्का काय कमी सुखांत आहे' असा प्रश्न विचारावंसं तिला वाटलं. जणुं तिचा प्रश्न समजल्याप्रमाणें डॉक्टर म्हणाले, " हें सुख नकोसं वाटलं तिला. " ते रागारागानं खुर्चीतून उठले आणि एकीकडे कपडे करतां करतां बोलत राहिले,

" मोठेपणा तरी नशिबांत हवा ना. भाग्य लाथाडलं आणि वर आमच्या तोंडाला काळं फासलन्. चांगली मोठी ऑफिसराची

बायको झाली असती आणि यूरपच्या दौऱ्याला गेली नसती आज ! लोकांत अभिमानानं सांगतां आलं असतं माझी लेक नवऱ्याबरोबर यूरपला गेली म्हणून. आज लोक विचारतात अन् मी काय सांगतों ! लेक कुठें असते, तर कानपूरला ! नवरा काय करतो, तर खेटरांचा कारखानदार आहे !"

अशा प्रकारें बडबडत धुसफुसत त्यांनीं कपडे चढविले. पोषाख संपल्यावर त्यांनीं थर्मामीटरमधला पारा झटकावा त्याप्रमाणें आपली रागाची लहर थंड केली व चर्यादेतील बदलली. तिच्या जवळ येऊन तिच्या हातांतला तो अंक घेऊन त्यांनीं तो मिटून दूर टाकला आणि म्हटलं, " जाऊं दे. आतां रागावण्यात काय अर्थ आहे हें मलाही समजतं. परंतु खरं सांगू तुला, मनांतली अढी जात नाहीं. अचलेनं या लग्नाचा हट्ट करायला नको होता. आमची बेअब्रू करायला नको होती. केवळ ताराच्या आग्रहासाठीं मीं तिला माहेरीं आणली. आली तेंही बरंच झालं. परंतु मी मनापासून तिला क्षमा करूं शकत नाहीं. कदाचित् माझं चुकत असेल. पण मला वाटतं माझ्या जागीं कोणताही बाप असता तरी त्याला असंच वाटलं असतं. तुम्ही पोरी मूर्खासारख्या कुणाच्या तरी प्रेमात पडतां आणि आईबापांना कायमच दुखवून ठेवतां— "

तिच्याकडे रोखलेली नजर त्यांनीं वळाविली. टेबलावरचे कांहीं कागद घेण्यासाठीं त्यांनीं दोन पावलं टाकलीं. ते पुन्हां तिच्याकडे वळले तेव्हा मुद्दाम हंसल्याप्रमाणें ते हंसत होते. " अच्छा " ते म्हणाले, " जातों मी. चालूं द्या तुमचं. "

ते खोलीबाहेर पडले. मैना त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघत जागच्या जागीं उभी राहिली. तिच्या मनांत आलं, माझी शंका बरोबर आहे म्हणायची. नानांनीं आक्काला कांहीं मनापासून क्षमा केलेली नाहीं. ते वरवर आनंद दाखवीत आहेत खरे, परंतु त्यांच्या मनांत अढी आहे...' तुम्ही पोरी मूर्खासारख्या कुणाच्या तरी प्रेमांत पडतां आणि आईबापांना कायमचं दुखवून ठेवतां. '...नानांच्या या उद्गारांवर तिनं उलट उत्तर केलं नव्हतं. परंतु आतां तिच्या

मनांत आलं ' तुम्ही आईबाप कुणाशीं तरी लग्न ठरवितां आणि मुलींना कायमचं दुखवून ठेवतां ' असं नाहीं कां उलट म्हणतां येणार ?... कुणी तरी कुणाला तरी दुखवायचं असं या प्रेमाच्या प्रश्नाला स्वरूप बहुधा कां यावं ? ... आईबापांचं प्रेम गमावून बसायचं कीं जें प्रेम स्वतःला हवंसं वाटतं तें गमावायचं अशा ओढाताणीच्या स्वरूपांतच वयानं वाढलेल्या मुलींपुढें तारुण्य बहुधा उभं कां रहावं ? यौवनाच्या उंबरठ्यापाशीं पोचतांना पाऊल पुढें टाकूं कीं मागं घेऊं अशी मुलींची द्विधा मनःस्थिति कां व्हावी ?. . मैनाला समजेना...

" मैना, मी निघालें ग " हे शब्द कानीं पडतांच ती आपल्या विचारांतून जागी झाली. तिनं पाहिलं तों तिची गाणारी मैत्रीण दाराच्या चौकटींत उभी होती. ती पुढें झाली आणि तिचे खांदे धरून म्हणाली, " वा ग वा ! तूं पुष्कळ निजशील. आम्ही जाऊं दिलं पाहिजे ना तुला ? तुझी घाई मी चालूं देणार नाहीं. आणखी एक पद म्हटलं पाहिजे तुला. "

" आणखी ? अय्या ! माझा गळा बसला आहे ग आज. "

" कॉफीचा कप देऊन उतरवूं कीं त्याला आपण. काढ पायातल्या चपला. इतक्यांत नाहीं जाऊ देणार. " तिनं तिला ओढीत नेलं, आणि सांगितलं, " आमच्या नानांना फार आवडलं बरं का तुझं गाणं. "

तिनं तिला बैठकीच्या खोलींत नेलं आणि खालीं बसवून म्हटलं, " कोणचं पद गाऊन दाखवतेस बोल ? "

ती मैत्रीण विचार करण्यासाठीं थोडी थांबली व नंतर म्हणूं लागली—"

" गंगा यमुना डोळ्यांत उभ्या कां
जा, मुली जा ! दिल्या घरीं तूं सुखी रहा."

त्या भावपूर्ण गाण्याचे गोड स्वर ऐकतां ऐकतां मैनाचे विचार पुन्हां चाळविले गेले. मुलीनं बिनतक्रार दिल्या घरीं जावं आणि सुखी रहावं अशी बापाची नेहमींच इच्छा असायची तर ! कवींना देखील बापाच्या या इच्छेंत काव्य दिसत होतं ? ती इच्छा म्हणजे

कवींनीं मान्य केलेला एक संकेत होता ?... उलट ज्या कवितेंतली मुलगी बापाला म्हणत आहे, बाबा तुमच्या डोळ्यांत पाणी कशासाठीं, जें घर मीं माझ्या मनानं निवडलं आहे त्या घरीं मी सुखानं राहीन, अशी कविता एखादा कवि कां रचीत नाहीं ?...

तिनं पाहिलं तों तें गाणं ऐकतां ऐकतां मोठ्या बायकांच्या डोळ्यांतून अश्रू झरझर वहात होते... तिचे स्वतचे:देखील डोळे ओलावले होते. परंतु कवितेंतला आशय तिला पटत नव्हता... आक्काचा प्रश्न तिच्या मनांतून जात नव्हता. नानांनीं अजूनही अंतर्यामीं तिच्याविषयीं राग धरावा याचं कारण तिला समजलं होतं. परंतु त्यांचा राग तिला समर्थनीय वाटत नव्हता. आक्कानं जें केलं तेंच बरोबर केलं असं तिला वाटत होतं. तिला दुःख होत होतं तें एकाच गोष्टीचं कीं आक्कानं जें प्रेम केलं त्यातून संघर्ष निर्माण झाला होता. आणि संघर्षावाचून मुलांना मोठं होतां येतंच नाहीं कीं काय अशी शंका तिच्या मनांत येत होती...

रात्रीं एकांत मिळाल्याबरोबर तिनं अचलेला विचारलं, "एक गोष्ट विचारूं कां तुला ?"

"हं. विचार."

"अगदीं खरं खरं काय तें सांगशील ?"

"सांगेन."

ती उठली. नानांच्या खोलींतलं तें इंग्रजी सचित्र साप्ताहिक तिनं आपल्या टेबलावर आणून ठेवलं होतं तें उचललं, उघडलं, आणि अचलेपुढें धरून म्हटलं "हा फोटो बघ."

अचलेनं फोटो पाहिला आणि तिला विचारलं, "मला कां दाखवलास ?"

"ओळखलास कां कुणाचा तो ?"

"हो."

"याच्याशीं तूं लग्न केलं असतस तर अधिक सुखी झाली नसतीस कां ? आज त्याच्याबरोबर यूरपला गेली असतीस. हा

फोटो पाहिल्यावर आपण केवढी संधि गमावली असं नाहीं तुला वाटत ? ”

अचलेनं क्षणभर तिच्याकडे नुसतं हंसत पाहिलं. मग ती हळूंच म्हणाली, “ तूं असं विचारतेस यांत आज कित्येक दिवस जो प्रश्न तुला करावा म्हणत होतें त्याचं उत्तर मात्र मला मिळालं. तूं अजून कुणाच्या प्रेमांत सापडली नाहींस असं दिसतंय. ” ती पुन्हां थांबली आणि पुन्हां थोडी हंसली. “ हा फोटो पाहून मला कशाला पश्चात्ताप होईल ? ”

“ एका बड्या अधिकाऱ्याची बायको झाली असतीस तूं नानांचं ऐकलं असतंस तर. ”

“ एखाद्या दिल्लीच्या केन्द्रीय मंत्र्याशीं जरी नानांनीं माझं लग्न ठरविलं असतं तरी मीं त्यांचं ऐकलं नसतं. ”

मैनाच्या तोंडून चटकन प्रश्न गेला, “ आक्का, तूं सुखात आहेस ? ”

अचलेच्या चर्येवर उल्हास आणि गांभीर्य यांचं गंमतीदार मिश्रण दिसूं लागलं. ती म्हणाली “ किती सुखांत आहे तुला काय सांगूं ? ”

“ इकडे माहेरीं तूं आली नसतीस तरीदेखील इतक्याच सुखांत तूं असतीस ? ”

“ असतें असं कसं म्हणूं ? माझ्या सुखांत ती एक उणीव वाटली असती मला. दहा वर्षें वाटलीच कीं. परंतु ती सोडली तर माझं सुख इतकं मोठं होतं कीं साऱ्या बायकांनीं माझा हेवा करावा. दिवाकर मला मनापासून हवा होता. तो मिळाल्यावर माझ्या सुखाला मर्यादा राहिली नाहीं. घरांतून निघून जावं लागलं. पण मनाची खात्री पटली कीं जें सुख मिळविलं तें एवढी किंमत देऊन मिळविण्याइतकं मोठं होतं खचित ! ” साप्ताहिकांतल्या फोटोकडे तिनं पुन्हां पाहिलं. तें मिटून दूर टाकीत ती पुढें म्हणाली, “ असे शंभर फोटो पाहिले तरी माझं चुकलं असं मला वाटणार नाहीं. ”

मैना तिच्याकडे निरखून पहात होती. ती जें बोलत होती तें

अगदीं तिच्या हृदयांतून वर उसळल्याप्रमाणें तिची मुद्रा दिसत होती. तिच्या चर्येवर अभिमान होता. भरपूर आनंद होता. तिच्याकडे पाहतां पाहतां मैना हंसली.

अचला पुढें म्हणाली, " मी घरांतून बाहेर पडलें तेव्हां तूं लहान होतीस. मी एकाएकी कां गेलें याचं तुला आश्चर्य वाटलं असेल. नाना माझ्यावर खूप रागावले, आईनं हाय घेतली, घरांतला सारा आनंद नाहींसा झाला, तें पाहून तुला वाटलं असेल आक्कानं फार वाईट गोष्ट केली. माझ्याविषयीं तुझं वाईट मत झालं असेल. आतां तूं मोठी झाली आहेस. ज्या वयांत मीं हट्ट केला त्या वयांत तू आहेस. मी तशी कां वागलें तें तुला आतां कळेल खऱ्या प्रेमाची चाहूल लागली कीं माणसाला इतर साऱ्या गोष्टी कःपदार्थ वाटूं लागतात. ती चाहूल समजली कीं तिच्याच दिशेनं जावंसं वाटतं. जाणं अवघड असलं तरी जाण्याची शक्ति येते... "

पुन्हां दोघींची दृष्टादृष्ट झाली. दोघींही एकदमच हसल्या. आणि मग अचलेनं एकदम तिच्या गळ्याभोंवतीं हात टाकले आणि तिला मिठींत धरून विचारलं " आता मी विचारूं का तुला एक गोष्ट ? "

" हं विचार. "

" खरं खरं तें सांगशील ? "

" होय, सांगेन. "

" तूं कुणाच्या प्रेमांत पडली आहेस सांग ? "

तिच्या तोंडावर लज्जेचा भाव दिसला नाहीं याचं अचलेला आश्चर्य वाटलं. मैनानं मान हालविली आणि म्हटलं, " मला लग्नच करायचं नाहीं. "

अचला मोठ्यांदा हंसली. तिला एकदम आठवण झाली, ही मैना पांच वर्षांची होती तेव्हां दुसऱ्या कुणाचं लग्न निघालं कीं नानांना आणि आईला विचारीत असे ' माझं लग्न केव्हां करणार ?' लहानपणाच्या कांही एका मर्यादेपर्यंत मुली म्हणत असतात लग्न करायचं. पुढें हळू हळू त्या म्हणूं लागतात, मला लग्नच करायचं

नाहीं. प्रथम प्रथम त्या शब्दांचा अर्थ न कळतांच, केवळ इतर मुलींचं अनुकरण करून त्या तसं म्हणत असतात. नंतर त्या वयांत आल्या म्हणजे मात्र मला लग्न करायचं नहीं असं जेव्हां त्या म्हणतात तेव्हा त्यांना त्यांचा अर्थ कळत असतो. पुरुषांची गुलामगिरी नको अशा अर्थानं बहुधा त्या तसं म्हणत असतात. परंतु लग्न म्हणजे गुलामगिरी हा ऐकीव सिद्धान्त त्याना कोठपर्यंत पटतो ? त्या प्रेमांत सांपडलेल्या नसतात तोंपर्यंत ! प्रेमाची चाहूल त्यांना ऐकूं आलेली नसते तोंपर्यंत !...

अचलेनं तिला विचारलं, " खरं खर सांगायचं कबूल केलं होतंस ना ? "

" खरंच सांगतें आहे. मला नाहीं लग्न करायचं. "

" कुणाच्या प्रेमांत सापडली नाहींस ? "

कां कोण जाणे, पण मैना एकदम हंसली. कदाचित् बहिणीच्या तोंडचा " प्रेम " हा दोन अक्षरी शब्द तिच्या कानांना फार गोड वाटला म्हणून तिला हंसूं आलं असेल. ती मान हालवीत म्हणाली, " अं हं. "

" कुणाचं तुझ्यावर प्रेम बसलेलं नाहीं ? "

मैनानं वरचा ओठ दाबला, खालचा पुढें काढला, उजव्या हाताचीं पसरलेलीं बोटं झटका दिल्यासारखीं उडविलीं, आणि म्हटलं, " कुणास ठाऊक ? "

" ज्यानं स्टेशनावर आपला दोघींचा फोटो काढला त्याचं नांव काय म्हणालीस ? "

" सुरेश लिमये "

" त्याचं प्रेम नांहीं कां तुझ्यावर ? "

मैना म्हणाली, " शीः ! अग अक्का तुला माहीत कां नाहीं कॉलेजांतलीं पोरं कशी मागं लागतात तीं ? "

" माहीत आहे ग पण— "

तिच्या त्या " पण— " कडे लक्ष न देतां मैना म्हणाली, " झालं तर. "

अचलेनं तो विषय संपूं दिला.

परंतु अंथरुणावर पडून डोळे मिटल्यानंतर मैना मात्र अचलेनं विचारलेल्या प्रश्नाचा विचार करूं लागली ... कॉलेजांतले जे तरुण विद्यार्थी तिच्या सहवासाची उत्सुकता दाखवीत असत त्यांची आठवण तिनं करून पाहिली. त्या सर्वांत सुरेश लिमयेच तिच्याशीं अधिक सलगी करीत असे. तिलाही त्याची ती सलगी आवडत असे... परंतु, ती आतां स्वतःला विचारूं लागली, या परस्पर सलगीलाच प्रेम म्हणायचं कीं काय?...

किती दिवस तरी सुरेश लिमयेला तिनं फक्त दुरून पाहिलं होतं. कॉलेजांत तो लेक्चरर होता, परंतु तिच्या वर्गावर तो कधीं येत नसे. पहिल्या वर्षाच्या विद्यार्थ्यांना तो शिकवीत असे, आणि तेदेखील काय तर कॉम्पोझिशन! विद्यार्थ्यांत तो विशेष प्रिय होता. तो शिक्षक म्हणून नव्हे तर कॉलेजच्या हॉकी टीमचा कप्तान म्हणून. मैना व तिच्या खास टोळक्यांतल्या मैत्रिणी त्याला फक्त दुरून पहात असत. विद्यार्थ्यांच्या वह्यांचा मोठा गठ्ठा काखेंत संभाळून खाड खाड बूट बाजवीत आपल्या वर्गाकडे जातांना किंवा एखाद्या वेळेस हॉकी खेळण्याच्या वेळचा पोषाख करून हॉकी स्टिक खांद्यावर टाकून लगबगीनं इकडे तिकडे हिंडताना! तो उंच निंच आणि देखणा होता. त्याचा पोषाखही नेहमीं चांगला असे. ज्या विद्यार्थ्यांना तो शिकवीत असे त्यांच्याहून चार पाच वर्षांनींच तो मोठा होता व त्यांच्यातलाच एक वाटत असे. "मास्तर आले! मास्तर आले!" म्हणून विद्यार्थी आपापसांत त्यांची चेष्टा करीत. विद्यार्थिनीही आपापसांत कुजबुजत "मास्तर आले! मास्तर आले!" आणि उगीचच खुदू खुदू हंसत. खरं म्हणजे त्यांचं रूप त्यांना पहावंसं वाटे. तो त्यांना आवडत असे. परंतु स्वतःला वाटणारं आकर्षण झाकण्यासाठीं त्या चेष्टा करीत आणि खुदू खुदू हंसत. तरुण मुलींची ही ठरलेली रीत आहे. इतर मैत्रिणींच्या चेष्टेंत मैनाही सामील होत असे. शेजारच्या मुलीला कोपरानं ढोसून ती म्हणे "अग ते बघ मास्तर आले."

त्या सगळ्याजणी बायकांच्या ठरीव रीतीप्रमाणें खालीं माना घालून तिरप्या नजरेनं चोरून बघत. सुरेश त्यांच्या अंगावरून गेला कीं त्यांच्यात पुन्हां गोड खसखस पिकत असे. तो मुलींकडे लक्ष देत नसे. निदान आपलं मुळींच लक्ष नाहीं असं दाखवी... किती दिवस तरी मैनानं सुरेशाला अशाच प्रकारें फक्त दुरूनच कधीं कधीं पाहिलं होतं.

पण एकदां कॉलेजच्या मोठ्या हॉलमध्यें फोटोग्राफीचं प्रदर्शन भरलं होतं. एके दिवशीं कॉलेज संपल्यावर बराच वेळा मैना लायब्ररींत वाचीत बसली होती. तिच्या मैत्रिणी आधींच घरोघर गेल्या होत्या. ती लायब्ररींतून बाहेर पडली व हॉलवरून जाऊं लागली. "प्रदर्शन पाहिलंत कीं नाहीं?" असा प्रश्न ऐकून तिनं थबकून पाहिलं. हॉलच्या दारांत सुरेश लिमये उभा होता.

ती म्हणाली "नाहीं."

"पाहण्यासारखं आहे. या ना."

दाराशीं एक चष्मेवाली पारशी मुलगी तिकिटविक्री करण्यासाठीं एका टेबलामागें खुर्चीवर बसली होती.

मैनानं तिला इंग्रजींत विचारलं, "किती पैसे द्यायचे?"

त्या मुलीनं हातांचीं चार बोटं दाखविलीं. "चार आणे" असं ती पुटपुटली तेव्हां तिचे पुढें आलेले घाणेरडे दांत मैनाला दिसले.

मैनानं पर्स उघडली.

पण तितक्यांत सुरेशानं त्या पारशी मुलीला इंग्रजींत सांगितलं, "ही माझी मैत्रीण आहे." त्यानं हात पुढें करून मैनाच्या पर्सचा चाप बंद केला.

त्याच्याबरोबर आंत शिरतां शिरतां मैना त्याला म्हणाली, "म्हणजे तुम्ही या प्रदर्शनाचे मॅनेजर आहांत?"

"मॅनेजर नाहीं. पण मित्रांना प्रदर्शन फुकट दाखवायचा हक्क आहे मला. मीं काढलेले पांच फोटो इथें मांडलेले आहेत. सगळ्या फोटोंना बक्षिसं मिळालीं आहेत."

" होय ?—मला कल्पना नव्हती." मैना हंसून म्हणाली, " मग आतां तुमचेच फोटो आधीं दाखवा मला."

" छे ! छे ! आधीं पाह्यला हवेत असे दुसरे फोटो आहेत. ज्याला सुवर्णपदक मिळालं आहे तो फोटो आधीं दाखवितों."

फोटोंचं प्रदर्शन इतकं पाहण्यासारखं असतं याची मैनाला कल्पना नव्हती. तिचं पाहुण संपण्यापूर्वीच किंवा खरं म्हणजे सुरेशचं दाखविणं संपण्यापूर्वीच घरीदिशीं घंटा वाजली. ती ऐकल्याबरोबर सुरेश म्हणाला " अरे ! प्रदर्शन बंद व्हायची वेळ झाली."

" असं ? "

" आतां उरलेले फोटो पाहण्यासाठीं उद्यां यायला हवं तुम्हाला "

" येईन कीं."

" मी दाराशीं वाट पाहू ? "

" वाट कशाला पाहतां ? मला माहीत झालंय आतां."

" पण तुम्ही तिकिट काढून पाहवं अशी माझी इच्छा नाहीं. आणि प्रत्येक फोटोंत विशेष पाहण्यासारखं काय आहे तें तुम्हाला कळलं पाहिजे. फोटो काढण्यांत जितका आनंद मला होतो तितकाच कुणाला तरी दाखवितांना होतो." त्यानं तिच्याकडे हंसत पाहिलं. " आज तर विशेषच आनंद झाला. "

" काहीं तरीच " अशा अर्थानं मैनानं मान झटकली. पण खुदकन हंसूं आलं तें तिला आवरतां आलं नाहीं.

या पहिल्या ओळखीनंतर सुरेश तिच्या गांठीभेटीचे प्रसंग मुद्दाम घडवून आणूं लागला. ती लायब्ररींत वाचीत बसलेली असली कीं तो तिच्याजवळ येई आणि म्हणे " मीं एक नवा फोटो काढला आहे. पाह्यचा आहे कां ?" कधीं कधीं इतर ठिकाणीं तो तिला गांठी. एकदा तो तिला म्हणाला " तुम्हांला चहा आवडतो कीं कॉफी ? "

ती म्हणाली " दोन्ही."

" पण त्यांतल्या त्यांत?"

तिनं ओठ दातांत धरलं, भुंवया वर केल्या.

त्यानं विचारलं, " आवड ठरविणं इतकं अवघड आहे काय?"

"हे की ते असा पेच घातला की नक्की सांगता येत नाहीं "

तिच्या त्या बोलण्यांत कांहीं तरी गोड गूढार्थ असल्याप्रमाणे सुरेश हंसला. आणि तो हंसल्यामुळें मैनालाही वाटलं की आपल्या बोलण्यात काहीं तरी सूचक अर्थ होता. कोणता ते तिला कळलं नाहीं. परंतु तिलाही हसू आलं.

त्या दिवसापासून तो तिला वरच्चेवर कॉफी पिण्यासाठीं हॉटेलांत नेऊं लागला. ती त्याच्याबरोबर जाऊं लागली. तो तिच्याशीं बहुवचन सोडून सलगीनं केव्हा बोलू लागला तें तिला कळलं नाहीं. ती त्याला अरे जारे केव्हां म्हणू लागली तेही तिला कळलं नाहीं.



तिचा आणि अचलेच्या स्टेशनवर काढलेला फोटो तो देईल म्हणून तो [illegible]हून परत आल्यावर मैनानं दोन दिवस वाट पाहिली. मग [illegible] त्याला विचारलं, " माझा आणि आक[illegible]चा फोटो कसा

काय आला आहे?"

तो म्हणाला "काढलाय कुणी? चांगला येणारच."

"मग अजून दाखविला नाहींस?"

"योग्य वेळीं देणार आहे."

"तयार झाला आहे ना?"

"हो."

"चांगला आला आहे ना?"

"अगदीं फर्स्टक्लास!"

"मग दे कीं. आक्का रोज विचारते आहे,"

"सांगितलं ना! योग्य वेळीं देईन."

"म्हणजे काय? फोटो द्यायला कसली योग्य वेळ हवी?"

"तें तुला नाहीं कळायचं."

आणखी चार दिवस गेले तरी त्यानं फोटो दिला नाहीं.

तिनं विचारलं "अरे फोटो कां देत नाहींस अजून?"

तो म्हणाला "देणार आहे. घाई नको करूंस."

"मुहूर्त पाहतो आहेस कीं काय?"

"हं." म्हणून तो हंसला.

त्याच्या बोलण्याचा अर्थ मैनाली कळेना. त्याला फोटोबद्दल पुन्हां विचारावयाचं नाहीं असं तिनं ठरविलं.

पण मग एके दिवशीं कॉफी पिण्यासाठीं तिला दुकानांत नेल्यावर त्यानं झिरमिरीत कागदांत बांधलेली एक कागदाची पेटी तिच्या हातांत दिली व सांगितलं, "तुझा आणि तुझ्या आक्काचा फोटो यांत आहे."

मैनानं पेटी उघडून पाहिली. चांदीच्या फ्रेममध्यें बसविलेला फोटो तिला दिसला. "वाढदिवसानिमित्त अल्पशी भेट" अशीं अक्षरं फ्रेमवर कोरलेलीं होतीं.

मैना म्हणाली "हें तूं करायला नको होतंस."

त्यानं विचारलं, "कां?"

त्याच्या प्रश्नाचं उत्तर तिला देतां आलं नाहीं. ती फक्त हंसली. क्षणभर थांबून तिनं विचारलं, "योग्य वेळ म्हणत होतास ती ही होय?"

तो हंसत म्हणाला "होय, आजचा दिवस साधायचा होता मला."

"पण माझी जन्मतारीख तुला कशी कळली?"

"इच्छा असली कीं मार्ग सांपडतो—"

"अशी इंग्रजींत म्हण आहे—"

"ती खरी आहे. कॉलेजच्या रजिस्टरमध्यें तुझी जन्मतारीख लिहिलेली आहे—"

"लेक्चरर आहेस त्याचा चांगला उपयोग करतोस म्हणायचा! रजिस्टरमधली माहिती गुप्त समजली जाते ना? तूं चोरी केलीस असं नाहीं कां वाटत?

"चोराशीं चोरासारखंच वागलं पाहिजे."

"मीं काय रे चोरलं तुझं?" असं विचारतांना तिनं केलेली हातांची हालचाल आणि मोठे केलेले डोळे व उचललेल्या भुंवया यामुळें शोभणारी तिची चर्या बघत राहावंसं सुरेशला वाटलं. तो हंसला आणि म्हणाला, "काय चोरलंस मीं नाहीं सांगत. केव्हां तरी कळेल तुला. म्हणजे अजून कळलं नसलं तर—" तो हसला.

आतां अंथरुणावर पडल्या पडल्या मैनाला सुरेशच्या अशा अनेक आठवणी झाल्या. तो तिच्याशीं फार सलगीनं वागत असे व त्याची सलगी तिला आवडत असे....परंतु ती स्वतःलाच विचारूं लागली, या परस्पर सलगीलाच प्रेम म्हणायचं कीं काय?.... तसं तिला वाटेना ... ज्या चाहुलीचं वर्णन अचलेनं तिच्याजवळ केलं होतं, ती चाहूल अजून तिला ऐकूं आली नव्हती! ती चाहूल कशी ओळखावी तें तिला माहीत नव्हतं. परंतु तिला कळत होतं कीं तो जेव्हां कानीं पडेल तेव्हां ती आपल्याला ओळखता येईल. आईच्या दुधाचा पहिला थेंब तान्ह्या मुलाच्या ओठांना लागला कीं कुणी न शिकवितांच त्याला तो कळतो व त्याचा घोट घ्यावासं त्याला वाटत. यौवनांतल्या प्रेमाच्या चाहुलीचंदेखील असंच आहे! कुणी न सागता तिची ओळख पटते!...

: : १० : :

उजव्या हाताला थोड्याशा अंतरावर सहामाही परीक्षेतला अखेरच्या दिवशीचा सकाळचा पेपर लिहीत बसलेल्या मुलीनं हळूंच डाव्या हातानं एक चिठी तिच्या टेबलावर ठेवली, तेव्हां मैनानं खालीं घातलेली मान उचलली आणि तिला खुणेनं विचारलं ' काय ? ' ' वाच ' अशी उलट खूण करून ती मुलगी हंसली. मैनानं चिठी वाचली. " आपण गप्पा मारूं या. एकमेकीला अशाच बारक्या चिठ्या लिहून. पेपरांतला एकदेखील प्रश्न मला धड लिहितां येत नाहीं. शून्य भोपळा मार्क मिळणार आहे मला. तुझ्याशीं बोलायची लहर आली आहे. आज संध्याकाळीं हॉकीची मोठी मॅच आहे. सुरेश लिमये खेळणार आहे. आपण जाऊं या काय मॅच पाह्यला ? " ... मैनानं मान वळवून त्या मुलीकडे बघितलं तिच्या मनांत आलं, आतां काय म्हणावं या पोरीला ?...

गेल्या पांच सहा वर्षांत मुंबईच्या बहुतेक कॉलेजांत सिंधी आणि पंजाबी मुलांची आणि मुलींची संख्या वाढली होती. पण ज्या कॉलेजांत मैना शिकत होती त्या कॉलेजांत त्यांची विशेष गर्दी झाली होती. दूरदूरचीं माणसं एकत्र आलीं कीं एकमेकांच्या आचारविचारांची व राहणीची थोडी तरी सर मिसळ झाल्याशिवाय रहात नाहीं हा सामान्य सिद्धान्त कॉलेजांतल्या तरुण मुलामुलींच्या बाबतींत जास्तच प्रत्ययाला येतो. कॉलेजांतले मुलगे साहजिकच हूड आणि खोडकर असतात. परंतु सिंधी आणि पंजाबी मुलांच्या हूडपणाच्या कांहीं विशिष्ट तऱ्हा होत्या. त्या त्यांच्यापासून इकडल्या मुलांनीं उचलल्या. त्यांच्या पोषाखाच्या कांहीं तऱ्हाही लोकप्रिय झाल्या. सिंधी आणि पंजाबी मुलींची वेषभूषा इकडल्या मुलींना

नवीन वाटली. ती वेषभूषा त्यांनीं उचलली. क्वचित् कांहीं पंजाबी मुलींनी साडी नेसण्यास प्रारंभ केला. परंतु किती तरी महाराष्ट्रीय व गुजराथी मुलींनीं सलवार खमीस घालून झिरझिरीत उंची कापडाचा दुपट्टा वापरण्यास प्रारंभ केला. केवळ पोषाखावरून अमकी विद्यार्थिनी पंजाबी असली पाहिजे असं म्हणायची सोय राहिली नाहीं ... मैनाच्या वर्गांत सहा सात पंजाबी मुली होत्या. त्या सगळ्यांत रिता वैदी नांवाची ही मुलगी जशी अधिक देखणी तशीच बडबडी, हूड, आणि खोडकर होती. मैनाचा ऐच्छिक विषय इंग्रजी आणि मराठी होता. रिता अर्थशास्त्राच्या वर्गांत होती. ती नेहमीं चेष्टेनं म्हणे "या अर्थशास्त्रांत कांऽहीं अर्थ नाहीं. आमचे प्रोफेसर वर्गांत खूप बडबड करतात. मी छानपैकीं झोप काढतें. साऱ्या व्यवहाराचं मूळ पैसा आहे हें अगदीं उघड आहे. पांच वर्षांचं मूलदेखील सांगेल. त्यासाठीं लठ्ठ लठ्ठ ग्रंथ कशाला वाचायला हवेत, आणि प्रोफेसरांची रुक्ष व्याख्यानं कशाला ऐकायला हवींत ?" विद्यार्थिनींच्या खोलींत ती असली चेष्टेची बडबड नेहमीं करी आणि साऱ्या जणींना हंसायला लावी. एकेका प्रोफेसराच्या चालण्याची बोलण्याची ती हुबेहुब नक्कल करून दाखवी, आणि हंशा पिकवी. ती नेहमीं म्हणे, "आपल्या कॉलेजांतले एक सोडून सारे प्रोफेसर बंडल आहेत." कुणी तरी विचारी "हा एक कोण ग रिता ?"

ती म्हणे, "सुरेश लिमये."

"हॅः ! तो काय प्रोफेसर आहे ? साधा लेक्चरर आहे. मास्तर आले मास्तर आले म्हणून पोरं त्याची चेष्टा करतात."

"-चेष्टा केली तरी सर्वांचा प्यार आहे तो !"

"सर्वांचा राहूं दे ग. तुझा आहे कां सांग ?"

रिता न लाजतां आवेशानं इंग्रजींत म्हणे "अर्थात् आहे. त्याचा हॉकीचा खेळ बघशील तर तूंसुद्धां फिदा होशील त्याच्यावर. बाकी तूं महाराष्ट्रीय मुलगी. तुम्हां महाराष्ट्रीय मुलींना हॉकींतलं काय कळतंय ? हातांत स्टिकदेखील धरतां यायची नाहीं तुम्हांला. चुलीपुढें

बसून फुंकण्या धराव्या तुम्ही. ''

'' हं बस कर. माहीत आहे पंजाबांतली आहेस ती.''

अशी अनेक थट्टेची भांडणं रिता इतर मुलींशी करीत असे, आणि जिच्याशीं भांडायचं तिच्या गळयात गळा घालून भांडणाचा शेवट करीत असे ... अशी ही रिता वेडी होती. ... मैना तिला पुष्कळदां चेष्टेनं म्हणे '' तूं वेदी नाहीस, वेडी आहेस ! ''

' वेडी ' या मराठी शब्दाचा चमत्कारिक उच्चार करून रिता विचारी '' वेडी ? म्हणजे काय ? ''

'' पगली ! ''

'' ओ हो ! '' असा उद्गार काढून ती हंसू लागे आणि मैनाच्या मानेभोंवतीं दोन्ही हातांची मिठी घाली...

आतां तिची चिठी वाचून तिच्याकडे पहातां पाहतां मैनाला या साऱ्या गोष्टी आठवल्या. ती हंसली. तिच्या चिठीखालीं तिनं लिहिलं, '' पगली ! '' आणि तो कागद तिच्या टेबलावर ठेवला. ती आपला पेपर लिहिण्यासाठीं पुन्हां खालीं वाकली.

रिता कांहीं वेळ गप्प बसली. ती पेपर लिहित नव्हती. कागदावर वाकड्या तिकड्या रेघोट्या काढीत होती.

मधेंच एक नोटिस आली. सुपरव्हिजन करणाऱ्या सुरेश लिमयेनं ती वाचून दाखविली. परीक्षेतला शेवटला पेपर तिसऱ्या प्रहरीं होणार होता तो कांहीं कारणानं उद्यां सकाळवर ढकलण्यात आला होता.

ती नोटिस ऐकल्याबरोबर कित्येक मुलांनीं आणि मुलींनीं विचित्र आवाज केले. रितानं आपल्या टेबलावर फौंटन पेन टक टक वाजविलं तें इतक्या वेळां आणि इतका वेळ कीं शेवटीं उंच व्यास पीठावरच्या खुर्चीत बसलेल्या सुरेशनं तिच्याकडे डोळे वटारून पाहिलं. तिचं टक टक वाजविणं ताबडतोब बंद झालं. मैनाला वाटलं सुरेशकडे बघून ती हंसलीसुद्धां. तोंड खालीं घालून खालच्या तिरप्या नजरेनं मैनाकडे बघून डोळा मिचकावून ती कुजबुजण्याच्या स्वरात मफाइन्ना हिंदींत म्हणाली, '' कसुरीची माफी असावी

खाविंद ! " तिच्याकडे बघण्याचं टाळून मैना पेपर लिहूं लागली. तिच्या विनोदाचं कौतुक करावं आणि हंसावं अशी रिताची अपेक्षा हे ती हें मैनाला कळत होतं. पण म्हणूनच ती हंसली नाहीं. तिनं तिच्याकडे कौतुकानं बघितलंदेखील नाहीं. उलट भुंवया चढविल्या आणि तिला गप्प राहण्याची खूण केली. रिताचा चेहरा उतरला. तें पाहून मैनाला बरं वाटल तिला एकदां चमकवावं, दुखवावं असंच तिला वाटलं. रिता फार चावटपणा करते, तिला नेहमींच उत्तेजन देण चांगलं नाहीं एवढ्याच एका हेतूनं नव्हे. मैनाच्या मनांत आणखी एक हेतु होता.

रिता उठल्या सुटल्या सुरेशची तारीफ करी, तो मला फार आवडतो असं खुशाल म्हणे, या गोष्टीचं मैनाला पूर्वी काहीं वाटत नसे, परंतु आतांशा तिचं बोलणं ऐकलं कीं मनांतल्या मनांत तिला तें रुचत नसे. कित्येकदां बोलण्याच्या भरांत 'मला सुरेश आवडतो' असं म्हणण्याऐवजीं ' माझं सुरेशवर प्रेम आहे ' असादेखील उद्गार रिताच्या तोंडून बाहेर पडे. त्या उद्गारांत फार खोल अर्थ थोडाच होता ? इंग्रजी बोलण्याच्या पद्धतींत तो सहज खपण्यासारखा होता. परंतु तो ऐकला कीं मैनाला मनांतून तिचा राग येई. हा राग म्हणजे आपल्या मनाचा एक नवाच विकार आहे असं मैनाला वाटे. ती स्वतःला विचारी, म्हणे ना कां रिता वाटेल तें, आपल्याला त्याच्याशीं काय करायचं आहे ? पण तिचं मन हळूंच म्हणे, करायचं आहे तर ! मनांतला हा विचारतरंग लक्षांत आला कीं ती स्वतःशींच थोडी चकित होई. तिला वाटे, आपल्यांत फरक पडतो आहे कीं काय ?... पाटकरांची पद्मा, कोठाऱ्यांची कालिंदी अशा ज्या अनेक मुलींना लेक्चरर म्हणून सुरेश निबंधलेखन शिकवीत असे त्या सगळ्याच त्याच्या शिकविण्यावर——कीं त्याच्यावर ?—— खुष होत्या. त्यांच्या तोंडाची सुरेशची प्रशंसा मुलींच्या बैठकीच्या खोलींत मैनाला नित्य ऐकावी लागे. शंका विचारण्यासाठीं म्हणून त्या मुली सुरेशकडे जात, आणि परत आल्या कीं सुरेश असं असं बोलला, त्यानं अशी अशी कोटी केली असं सांगत. त्यांचीं तीं बोलणीं

ऐकून मैनाला पूर्वी कांहीं वाटत नसे. परंतु आतांशा तीं बोलणीं ऐकलीं कीं वरकरणी जरी ती हंसे तरी मनांतल्या मनांत ती नाराज होई. तिला वाटे सुरेशच्या सहवासांतल्या गंमती सांगण्याचा यांना काय अधिकार ? या पोरींनीं वरचेवर सुरेशकडे काय म्हणून जावं ? शंका विचारण्याचं नुसतं सोंग आहे झालं ! आणि त्या गेल्या तरी सुरेशनं त्यांच्याशीं हास्यविनोद कशाला करावा ? शंका सोडविण्या-पुरतं रोख ठोक बोलतां येत नाहीं ? या मुलींचा लघळपणा त्याला कळत नाहीं ? त्या मुलींपेक्षांही सुरेशचा तिला अधिक राग येई....तो राग आला कीं तिला स्वतःचंच आश्चर्य वाटे. ती स्वतःला विचारी, माझ्यांत फरक पडत आहे कीं काय ?...

रिता जशी सगळ्यांत अधिक बडबडी आणि विनोदी होती तशीच सगळ्यांत अधिक धिटाईनं वागणारी होती. ती कित्येकदां कॉलेजांत येतांना गुलाबाचं मोठं फूल घेऊन येई, आणि सगळ्या मुलींना सांगे, "सुरेशसाठीं मीं आणलं आहे हें." ती नुसतं असं म्हणून रहात नसे. खरोखरच ती त्याला तें नेऊन देई. व्हरांड्यांत उभ्या राहिलेल्या मुलींच्या अंगावरून सुरेश गेला कीं इतर मुली त्याच्याकडे तिरप्या नजरेनं पहात. पण रिता अगदीं सरळ त्याच्या-कडे पाहून हंसे. आणि क्वचित् प्रसंगीं कांहीं बोलेसुद्धां. कॉलेजांतले विद्यार्थी असल्या गोष्टींकडे नेहमीं डोळे लावूनच बसलेले असतात. रिता जवळपास दिसली कीं चटोर मुलगे ओरडत "आय लव्ह सुरेश." एकदां सुरेश वर्गात येण्यापूर्वीं मुलांनीं फळ्यावर खडूनं लिहून ठेवलं "जशी अलीची रिटा तशीच 'सु. लि.'ची (सुरेश लिमयेची) रिता !" विद्यार्थ्यांच्या खोड्या न चिडतां हंसण्या-वारी कशा घालवाव्या तें सुरेशला चांगलं समजत होतं. त्यानं फळ्यावरचा मजकूर पाहिला आणि एक कोटी करून वर्गाला हंसवून तो पुसून टाकला. या साऱ्या प्रकारचा रिपोर्ट विद्यार्थि-नींच्या खोलींत अर्थात् आलाच. विद्यार्थिनींची ती खोली हंशा-टाळ्यांनीं भरून गेली...

मनांतल्या मनांत मैनाला तें सारं असह्य झालं. तिला वाटलं

रितानं असा आगाऊपणा करावा म्हणजे काय? आणि सुरेशनं तो चालू द्यावा? तिची कान उघाडणीकरूं नये? तिनं पुन्हां स्वतःला विचारल, तुला काय करायचंय? आणि तिचं मन पुन्हां म्हणालं, करायच नाहीं कसं, करायचंय तर!...

तिच्या वृत्तींत फरक पडत होता खाचित! प्रेमाची कळी मनांत उगवूं लागली कीं मत्सराचे कोंब फुटूं लागतात! रिताचा तिला मत्सर वाटूं लागला होता. जें स्वतःला हवं तें दुसऱ्या कुणाला तरी मिळत आहे असं माणसाला दिसलं कीं जी अस्वस्थता त्याला टोचूं लागते तिचा अनुभव मैनाला येऊं लागला होता...रिताला वरून ती कांहीं दाखवीत नसे, परंतु मनांतल्या मनांत तिच्याविषयीं तिला अगदीं सूक्ष्म कां होईना पण वैरभाव वाटूं लागला होता...तिला चमकवावं, दुखवावं असं तिच्या मनांत कितीदां तरी येत असे...

म्हणूनच सुरेशला उद्देशून म्हटल्याप्रमाणें "कसुरीची माफी असावी खाविंद" असं रिता कजबुजली तेव्हां हंसण्याऐवजीं अगर तिचं कौतुक करण्याऐवजीं मैनानं भुंवया चढविल्या आणि 'गप्प!' अशा अर्थानं तिच्याकडे बघितलं.

रिताचा चेहरा उतरला, तें पाहून मैनाला बरं वाटलं. पण लगेच रितानं आपले गाल फुगविले, डोळे मोठे केले, आणि मग एकदम जीभ दाखवून मैनाला वेडावलं.

पेपर लिहिण्यासाठीं मैनानं खालीं मान घातली. प्रश्न सोपा होता, खूप लिहावंसं तिला वाटत होतं. परंतु जें लिहावयाचं तें लिहिण्याकडे तिचं एकाग्र चित्त लागेना. प्रश्नाबद्दलच्या विचारांत सुरेशबद्दलचे विचार मिसळूं लागले; आणि ती गुंतागुंत सोडविण्याचा ती प्रयत्न करूं लागली तों प्रश्नांबद्दलचे विचार पुसट होऊन मागं हटले, आणि दुसऱ्या विचारांनीं त्यांची जागा घेतली... वर्गातल्या फळ्यावर सुरेशचं आणि तिचं स्वतःचं नांव मुलांनीं लिहून ठेवलं असतं तर तिला शरम वाटली असती, राग आला असता, विद्यार्थ्यांनीं चटोरपणानं आपला अपमान केला असं तिला

वाटलं असतं. परंतु सुरेशचं आणि रिताचं नांव एकत्र लिहिलं गेलं हें पाहूनही तिला राग आला होता...पूर्वी आला नसता... पण आतां आला होता...रिताचा स्वभावच सलगीनं वागण्याचा होता. ती सुरेशबद्दल जें बोले तें केवळ बोलण्यापुरतंच होतं, त्यांत अधिक खोल अर्थ नव्हता. परंतु हें कळत असूनही त्याचा मैनाला राग येत असे... मैना स्वतःशीं कबूल करूं लागली कीं माझी पूर्वीची वृत्ति राहिली नाहीं, बदलली आहे...

ज्या प्रसंगामुळें तिच्या वृत्तींत बदल घडला तो प्रसंग तिला आठवत होता...

ती मनाशीं म्हणाली, पेपर लिहायला पाहिजे. तिनं समोरच्या भिंतीवरच्या मोठ्या घड्याळाकडे आणि आपल्या डाव्या मनगटावरच्या घड्याळाकडे पाहिलं. एक तासच उरला होता! अजून तीन प्रश्न लिहावयाचे होते! ती झराझर लिहूं लागली. परंतु सुरेशबद्दलचे सारे विचार दूर ठेवण्याचा तिचा निश्चय पुरता पांच मिनिटंदेखील टिकला नाहीं. ज्या प्रसंगामुळें तिच्या वृत्तींत बदल घडविला होता त्या प्रसंगाची आठवण तिच्या मनांत उभी राहिली....

नाटकाचा तिसरा अंक सुरू झाला होता...

तिच्या कॉलेजमधील विद्यार्थ्यांनीं जिमखान्याच्या नव्या इमारतीसाठीं फंड उभारला होता व त्या फंडासाठीं नाटक लावलं होतं. डॉक्टरांनीं चार तिकिटं घेतलीं होतीं. पण अचला आपल्या चार महिन्यांच्या बेबीला घेऊन पूर्वी ठरलेल्या दिवसाच्या आठ दिवस आधीच कानपूरला परत गेली होती. डॉक्टर नाटकाला येणार होते, परंतु आयत्या वेळेस म्हणाले होते मी नाहीं येत. आतांशा ते पुन्हा जरा चिडके आणि त्रासिक झाले होते. त्याच्या कारणाचे तपशील मैनाला कळले नव्हते. तिला इतकंच ठाऊक होतं कीं त्यांच्या हॉस्पिटलसंबंधीं कांहीं तरी भानगड उत्पन्न झाली आहे, त्यांतून एक खटला देखील निर्माण होण्याचा संभव आहे, त्यासाठीं नाना वकिलाकडे हेलपाटे घालीत आहेत, आणि

यामुळें त्यांचं मन कांहीं सुचिंत नाहीं. नाटकाला येत नाहीं असं ते म्हणाले तेव्हां चला कीं असं तिनं म्हणून पाहिलं, पण जास्त आग्रह केला नाहीं. त्यांचं येणं रहीत झालं तेव्हां ताराही म्हणाली, "मी तरी कशाला येऊं? जा तूं एकटीच!" नाटकाला एकटंच यावं लागलं म्हणून मैनाला वाईट वाटलं होतं. परंतु थिएटरावर तिच्या पुष्कळ मैत्रिणी भेटल्या व त्यांच्या घोळक्यांत बसून नाटक पाहूं लागल्यावर तिच्या मनाची प्रसन्नता परत आली. नाटक कांहीं फारसं रंगलं होतं असं नव्हे. परंतु रंगभूमीवरच्या पात्रांची चेष्टा करण्याचा, आणि एकमेकींच्या कानाशीं लागून बोलण्याची व हसण्याची खूप मजा आली होती. त्या समवयस्क मुली वरचेवर एकमेकीला म्हणत "आजूबाजूचे लोक पहात आहेत ग. आपलं बोलणं हंसणं बंद करूं या." परंतु बोलल्या–हंसल्यावाचून त्यांना राहवत नव्हतं.

तिसरा अंक सुरूं झाला होता...

पद्मा पाटकरनं डाव्या हातानं मैनाला एकदम ओढून घेतलं आणि तिच्या कानांत ती म्हणाली, "आपल्या प्रिन्सिपालसाहेबांना मिशा काढायला लावून स्त्रीपार्ट दिला तर ते या राणीसारखे हुबे-हुब दिसतील कीं नाहीं ग?" मैनानं रंगभूमीवरच्या राणीकडे निरखून पाहिलं, आणि तिला एकदम भयंकर हंसूं आलं. मोठ्या प्रयत्नानं तिनं तें हंसणं दाबलं, पण हंसणं संपतांच तिला उचकी येऊं लागली. ती अवरण्याचा तिनं पुष्कळ प्रयत्न केला. परंतु ती पुनः पुन्हां येतच राहिली. आजूबाजूचे लोक तिच्याकडे बघूं लागले, आणि तिला फारच संकोचल्यासारखं झालं.

शेवटीं ती उठली आणि घाईघाईनं बाहेर आली. तिच्या मनांत आलं सोडा घ्यावा म्हणजे कदाचित् उचकी थांबेल. बाहेरच्या मोकळ्या आवारांत सोडा लिंबू विकण्याचा स्टॉल कुठें दिसतो कां ती पाहूं लागली.

"हलो!" असा शब्द तिच्या कानांवर आला.

तिनं पाहिलं तों जरा दूर असलेला सुरेश तिच्याकडे येत होता.

तो म्हणाला, " तुला मघाशींच पाहिलं मीं. पण तुझ्याबरोबर इतर मुली होत्या—"

तिच्या उचकीचा आवाज झाला, आणि तो ऐकून त्यानं आपलं वाक्य अपुरंच ठेवलं.

त्यानं विचारलं " कसं काय आवडलं नाटक ? "

ती कांहीं उत्तर देणार तोंच तिला पुन्हां उचकी आली. तिनं दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेतलं. सोडा लिंबूचा स्टॉल कुठें दिसतो काय म्हणून तिनं इकडे तिकडे नजर टाकली.

त्यानं विचारलं " कांहीं होतंय काय तुला ? "

तिनं मान हालविली. तिच्या उचकीचा पुन्हां आवाज झाला. ती मोठ्या प्रयत्नानं म्हणाली, " अशी सारखी उचकी लागली आहे मला. कुठें सोडा मिळण्यासारखा असेल तर लवकर दे. " तिनं पुन्हां उचकी दिली.

" अरे ! " असं चिंतेच्या स्वरांत म्हणून त्यानं तिच्याकडे पाहिलं. मग तो तिला म्हणाला, " बागेंतल्या त्या कोंपऱ्यांत बाक आहे तिथें आरामशीर बैस पाहूं तूं आधीं. मी सोडा घेऊन येतों.



पण आधीं तिकडे चल. गार वाऱ्याची झुळूक लागल्यावर तुला बरं वाटेल जरा. ये. ”

त्यानं तिला नेऊन बसविलं, आणि धांवत जाऊन सोड्याचा ग्लास तो घेऊन आला व तिला म्हणाला, “ एक चांगला मोठा घोट घे पाहूं. ”

तो तिच्याजवळ बसला. तो मुद्दाम खेटून बसला असं तिला वाटलं नाहीं. परंतु त्याच्या अंगाचा स्पर्श तिला कळला. तिनं सोड्याचे दोन घोट घेतले आणि बाकाच्या पाठीवर मान टाकून डोळे मिटले. क्षणभर तिला वाटलं उचकी थांबणार, परंतु तिला तसं वाटलं तोंच उचकी पुन्हां जोरानं आली. तिच्या हातांतला ग्लास पडेल अस दिसलं म्हणून सुरेशनं तो आपल्या हातांत घेतला. तिनं अगदीं रडवी चर्या करून त्याच्याकडे पाहिलं आणि म्हटलं, “ आतां काय करूं रे ? ”

त्याचा डावा हात रिकामा होता. तिच्या पाठीवर आणि डोक्यावर किंचित थोपटल्यासारखं करून तो म्हणाला, “ घाबरूं नकोस. आणखी दोन घोट घे. ”

“ खरं म्हणशील तर मला सोडा कधीं आवडत नाहीं. ”

“ मग सोडा हवा कशाला म्हणालीस ? ”

“ माझी आपली कल्पना कीं, कांहीं गोड घेण्यापेक्षां सोडा प्यालेलं बरं. त्यात गॅस असतो. तो घेतला कीं ढेकर येते —” तिला पुन्हा उचकी आली.

तो म्हणाला, “ चटकन घोट घे पाहूं. अन बोलूं नकोस. गप रहा. ”

“ पण तूं मला सारखं बोलायला लावतो आहेस. ” ती हंसली.

तो हंसला आणि म्हणाला, “ बरं बरं ! मी अगदीं गप्प बसतों. ”

तिनं ग्लासांतून दोन घोट घेतले आणि पुन्हां बाकावर मान टाकून डोळे मिटले.

किती वेळ गेला कुणास ठाऊक ?

पण मग अगदीं हल्क्या आवाजांतले त्याचे शब्द तिला ऐकूं

आले. " आतां तुला बरं वाटतं कां ? मैना ! ... " त्याच्या हाताचीं बोट तिच्या बोटांत हलकेच गुंतलीं त्याचं तें बोलणं इतक्या हळूं आवाजांतलं होतं कीं आपण तें खरोखरच ऐकलं कीं आपल्याला भास झाला हें तिला कळेना. परंतु त्याच्या शब्दांच्या गोड नाजूकपणाचा स्पर्श तिच्या सबंद अंगाला झाला. तिनं डोळे उघडून पाहिलं. तो बोलत नव्हता. त्याचे ओठ मिटलेले होते मात्र तो तिच्याकडे अगदीं निरखून पहात होता, आणि तिचा हात त्यानं खरोखरच धरलेला होता.

चपापल्यासारखं करून ती त्याच्यापासून दूर सरकली आणि म्हणाली, " आतां मला आंत जायला हवं. मुली म्हणतील ही कुठें—" तितक्यांत तिला मोठीच उचकी आली.

मघांपेक्षांही अधिक रडवी चर्या करून तिनं त्याच्याकडे बघितलं. तिनं आपल्या गळ्यावर उजवा पंजा दाबून धरला आणि दातखिळी बसल्याप्रमाणें तोंड गच्च मिटून घेतलं. पण उचकी थांबविण्याच्या या विचित्र उपायाचं तिला हंसू आलं. आणि हंसण्यांतून पुन्हां जोराची उचकी आली. अगदीं टेकीला आल्याप्रमाणें ती म्हणाली "आतां काय करावं बाई ? "

त्यानं विचारलं " आंत जाऊन कुणी डॉक्टर असले तर घेऊन येऊं काय ? "

ती चटकन म्हणाली, " नको नको. उगीच बोभाटा नको. "

तिनं पुन्हां आपल्या गळ्यावर आणि तोंडावर हात दिला आणि ती गप बसली.

रंगभूमीवरचं एक पात्र तानांची भेंडोळीं सोडीत होतं. मधून मधून थोड्या टाळ्या वाजत होत्या ... स्टॉलवरच्या माणसानं दोन बाटल्या उघडल्या त्याचे फक् फक् असे आवाज झाले. स्टॉलपुढें दोन माणसं उभीं होतीं तेवढींच. बाकी बागेच्यांच्या आवारांत कुणी नव्हतं. वाऱ्याची गार झुळूक मधूनच आली कीं झाडांची पानं थोडीं हलत होतीं...तो तिच्याकडे टक लावून बघत होता. तिच्या बोटांत गुंतलेलीं त्याचीं बोटं आणखी घट्ट झालीं होतीं...

ती म्हणाली, " तुला माझ्याजवळ अडकून पडावं लागलं—"

तो म्हणाला, " कांहीं तरीच काय बोलतेस ? "

पुन्हां दोघं स्तब्ध राहिलीं.

' मला वाटतं आतां थांबली तुझी उचकी ' असं तो म्हणणार होता इतक्यांत तिच्या उचकीचा पुन्हां आवाज झाला, म्हणून तो म्हणाला, " इतक्या जोरानं कुणी आठवण काढली तुझी ? "

" अचलेनं काढली असेल—" बोलतां बोलतांच तिला पुन्हां उचकी आली.

तो म्हणाला, " एक गांवठी उपाय माहीत आहे कां तुला ? "

' कोणता ? '

" त्या उपायाचा प्रत्यक्ष अनुभव मीं घेतलेला नाहीं. परंतु ऐकला आहे. "

कोणता सांग कीं. ही उचकी थांबयासाठीं काय वाटेल तें करायला मी तयार आहे. "

तो हंसला आणि म्हणाला, " असं म्हणते आहेस पण करायची नाहींस. "

" सांग तरी—"

" कुणाचं तरी मस्तक जोरानं हुंगावं म्हणतात. "

तिनं त्याच्याकडे रागानं पाहिलं. डोळे मोठाले करून आणि मानेला झटका देऊन ती म्हणाली, " चल ! "

" वाटेल तें करीन म्हणाली होतीस ना ? "

" म्हणून काय झालं ?—" तिला पुन्हा उचकी आली.

तो हंसला.

ती म्हणाली, " माझा प्राण जातो आहे आणि तुला हंसू येतं आहे. " तिचा आवाज अगदीं रडका होता.

तो म्हणाला " मी सांगतों तो उपाय करून पहाण्यांत विनयभंग होईल असं तुला वाटतंय तर या रुमालाचा तरी जोरानं वास घे. " त्यानं आपल्या खिशांतून रुमाल काढला आणि तिच्या नाकाशीं धरून म्हटलं, " अगदीं खूप जोरानं श्वास आंत ओढा-

यचा हं. प्राणायाम केला आहेस कां कधीं ? "

तिनं रुमाल हुंगला आणि ती म्हणाली " सेंट कुठला आहे रे हा ? रिता वेदीच्या रुमालाला हा वास येतो म्हणून विचारतें. "

तो रागानं म्हणाला " रितानं दिलेला सेंट मी घेईन असं तुला वाटतं तरी कसं ? मला काय भीक लागली आहे ? "

ती म्हणाली " चेष्टा केली रे. "

" असली चेष्टा मला नाहीं आवडत. तुला शंका वाटत असेल तर माझा रुमाल दे परत. रिताच्या सेंटनं तुझी उचकी कदाचित् थांबेल, पण पोटदुखी वाढेल."

" अरे बाबा चेष्टा केली म्हटलं ना ? एवढीशी थट्टा सहन होत नाहीं ? " तिनं हंसून त्याला हंसविलं आणि मग रुमाल नाकाला लावून पुन्हां जोरानं हुंगला.

तिची उचकी खरोखरच थांबली.

तो हंसून म्हणाला, " माझं औषध लागू पडलं बघ ! "

ती हंसली व म्हणाली, " कांहीं फी मागायचा विचार आहे कीं काय ? "

" मागितली तर देशील कां ? "

तितक्यांत तिनं पुन्हां उचकी दिली.

सुरेश म्हणाला, " अगदीं चक्क खोटी उचकी दिलीस. मी फी मागेन या भीतीनं. "

" शाबास रे ! खोटी उचकी दिली काय ? या उचकीनं माझीं आंतडीं दुखूं लागलीं आहेत आणि तूं म्हणतोस खोटी आहे. " तिनं एक हात गळ्यावर आणि दुसरा हात पोटावर दाबला. तिच्या डोळ्यांत आसवं आलेलीं दिसलीं.

तो अर्धवट स्वतःशीं हळूं आवाजांत म्हणाला, " तुझे हाल पहावत नाहींत मला. काय करूं मी ? "

त्याच्या त्या शब्दांत आणि त्याच्या चेहेऱ्यावर जो भाव तिला त्या क्षणीं दिसला त्यांत फार अर्थ होता. तिनं आपल्या हातांतला त्याचा हात दाबला. ती म्हणाली, " कांहीं करूं नकोस, थांबेल

माझी उचकी." तिनं रुमाल पुन्हां जोरानं हुंगला.

मग मात्र बराच वेळ तिला उचकी आली नाहीं. ती थांबली असं वाटूं लागलं.

त्यानं विचारलं " आंत जाऊन बसणार कां तूं परत ?"

ती म्हणाली, " नको. पुन्हां सुरू झाली म्हणजे पंचाईत. मला वाटतं मी घरीं जावं हें चांगलं."

" मलासुद्धां तसंच वाटतं. पोचवूं कां तुला ?"

" मला टॅक्सी करून दे म्हणजे झालं. मी जाईन. तूं कशाला येतोस ? आभाराचं भाषण करायचंय ना तुला ?"

" मी जागेवर सांपडलों नाहीं कीं करील दुसरं कुणी —"

तिनं तोंडावर बोटं ठेवलीं आणि म्हटलं " नको नको—"

तो कांहींशा अधिकारानं म्हणाला " आतां वाद नको घालूंस माझ्याशीं. ऊठ पाहूं." तो उभा राहिला. त्यानं तिच्या खांद्या-खालीं हात घातला आणि विचारलं, " टॅक्सीपर्यंत चालवेल ना तुला ? " त्याच्या स्वरांत मधासारखीच मायेची चिंता होती, व चेहेऱ्यावरही मधाचाच भाव तिला दिसला.

" चालवेल तर काय झालं ! " असं म्हणतांना तिला हंसूं आलं.

त्यानं स्टॉलपाशीं थबकून ग्लास परत दिला, पैसे दिले, व तिला घेऊन तो बाहेर रस्त्यावर आला.

टॅक्सी चालू झाल्यावर त्यानं विचारलं, " आतां तुला बरं वाटतं ना ?"

" हो. " तिनं मागच्या गादीवर डोकं टेकलं. " या गार वाऱ्यानं तर फार हुशारी वाटते मला. मला वाटतं आतां उचकी खरोखर थांबली."

तो कांहीं बोलला नाहीं. त्यानं कांहीं बोलावं असं तिलाही वाटत नव्हतं. त्याच्या अंगाचा स्पर्श तिला होत होता. आजपर्यंत तो तिच्याशीं कितीदां तरी पुष्कळ सलगीनं बोलला होता. परंतु या घटकेच्या त्याच्या स्पर्शांत कांहीं नवीनच अर्थ होता असं तिला

वाटलं. आजपर्यंत त्याच्या सलगीच्या बोलण्याला तिनं फक्त मोकळ्या खेळकरपणानं उत्तर दिलं होतं. आतां मात्र तिला वाटलं कीं त्यापेक्षां अधिक खोल आणि अधिक नाजुक असा भाव आपल्या अंतःकरणांत उद्भवला आहे. तो भाव शब्दांनीं सांगावा असं तिला वाटलं नाहीं. आपणही मुक्या स्पर्शानं जबाब द्यावा अशी इच्छा तिला झाली. ती त्याच्या आणखीच जवळ सरकली. भीत भीत. थर थर कांपत...

मग एकदम ती दूर सरकली आणि म्हणाली, "तूं आभाराचं भाषण करणार होतास, नाहीं कां ?"

तो हंसला आणि म्हणाला, "आत्तांदेखील आभाराचं भाषण करणार आहे ना !"

"इथें ? गाडींत ? !" ती हंसली. "कुणाचे आभार मानणार तूं ?"

"उचकीचे ! आली म्हणून, आणि गेली म्हणून !"

ती अगदीं मनापासून हंसली.

पुन्हां कांहीं वेळ तीं दोघंही गप्प राहिलीं.

मग त्यानं विचारलं, "आतां घरीं गेल्यावर पुन्हां नाहीं ना येणार उचकी तुला ?"

"तें तुझ्या हातीं आहे."

"म्हणजे काय ?"

"घरीं गेल्यावर माझी आठवण करूं नकोस म्हणजे झालं."

"तुला नाहीं कां यायची माझी आठवण ?"

"फार येईल !"

"मग झालं तर ! दोघांच्या आठवणींची काटछाट होईल आणि कुणालाच उचकी नाहीं यायची."

"उचकीशास्त्रांत तूं इतका पारंगत असशील अशी मला नव्हती कल्पना."

"माझं मला तरी तें कुठें माहीत होतं ?"

मैना हंसली. त्यानं तिच्या मांडीवर हात ठेवला तेव्हां त्याच्या

दंडाला तिनं आपल्या हाताचा विळखा घातला...

या साऱ्या आठवणी तिच्या मनांत गर्दी करूं लागल्या तेव्हां ती स्वतःशीं म्हणाली, पेपर लिहायचं सोडून मी हें काय करतें आहे ?... पेपरांत आधींच लिहिलेला मजकूर तिनं संदर्भासाठीं पुन्हां वाचला, आणि ती मनाशीं म्हणाली, आतां पेपर लिहायचा ! बस !... ती झरझर लिहूं लागली...

ज्या प्रसंगाची आठवण तिला आतां झाली त्या प्रसंगानं तिच्या मनाची वृत्ति पालटली होती. पाटकरांची पद्मा, कोठाऱ्यांची कालिंदी, अशा मुलींनीं सुरेशची प्रशंसा केलेली तिला खपेनाशी झाली होती. रितानं आपल्या स्वभावानुसार सुरेशशीं सलगी करावी हें तिला रुचेनासं झालं होतं. तिला चटकन हेवा वाटे. मत्सराची बोच अनुभवाला येई. सुरेशवर दुसऱ्या कुणाचाही अधिकार असूं नये अस तिला आतांशा वाटूं लागलं होतं. पूर्वी कधीं वाटलं नव्हतं. परंतु आतां तें वाटणं तिला टाळतां येत नसे...

ती एकीकडे पेपर घाईघाईनं लिहीत होती आणि दुसरीकडे "कसुरीची माफी असावी खाविंद" या रिताच्या शब्दांची आठवण करून मनाशीं म्हणत होती, सुरेशला सांगितलं पाहिजे कीं तूं रिताशीं साधं बोलतांदेखील कामा नये...ही मला सांगते आहे आज संध्याकाळीं सुरेशची मोठी मॅच आहे म्हणून ! ही मला विचारते आहे येणार कां ! तूं कशाला ग हवीस मला बोलवायला ...

तितक्यांत रितानं पुन्हां एक चिठी लिहून हळूंच तिच्या टेबलावर ठेवली. मैनानं तिच्याकडे दटावून पाहिलं. रिता कुजबुजून म्हणाली, "वाच तरी." मैनानं चिठी वाचली. "येणार कां तूं मॅच पाहायला ? फायनल आहे. सुरेशजवळ पास मागणार आहे मी." मैनानं चिठीची गुंडी केली, ती रिताच्या अंगावर फेकली, आणि ती पुन्हां खालीं मान घालून पेपर लिहूं लागली.

कांहीं वेळानं रिता उठली, व आपला जवळ जवळ कोरा राहिलेला पेपर उचलून ती निघाली.

सुरेशपुढच्या टेबलावर पेपर ठेवतांना ती त्याच्याकडे पाहून हंसली. त्यानं तिला इंग्रजींत विचारलं, ' झाला कां पेपर लिहून ?" ती म्हणाली, " बघा ना उघडून." त्यानं पेपर उघडून पाहिला. कोरीं पानं बघितल्यावर तो हंसला व म्हणाला, "सुंदर!" रिता हंसली आणि बाहेर गेली. थोड्या वेळानं सुरेशही बाहेर गेला. तो लगेच दोन तीन मिनिटांत परत आला. परंतु मैनाला तें पाहून राग आला. रिताशीं बोलण्यासाठीं तो बाहेर गेला असावा अशी तिला शंका आली, ती तिला कांहीं केल्या मनावेगळी करतां येईना.

शेवटची घंटा होण्याच्या सुमारास बहुतेक हॉल रिकामा झाला होता. मैना आणि दुसरे दोन विद्यार्थी तेवढे राहिले होते. घंटा झाल्यावर मैना पेपर घेऊन उठली. सुरेशच्या हातांत तिनं पेपर दिला तेव्हां त्यानं विचारल, " कसा काय गेला आहे पेपर ? " तिनं घुश्शांतच मान हालविली, आणि ती जाऊं लागली. तो तिला हळूंच इंग्रजींत म्हणाला, " ऑफिसांत जरा थांबशील कां ? " तिनं पुन्हां घुस्सा दाखविला. कांहीं न बोलतांच ती हॉलच्या बाहेर गेली.

ती व्हरांड्यांतून जात होती तेव्हां कॉलेजचा एक शिपाई तिच्याजवळ आला आणि म्हणाला " तुमचा ड्रायव्हर तुमचा फराळाचा डबा आणून ठेवून गेला आहे. संध्याकाळीं पेपर सुटण्याच्या वेळेस येतों म्हणून सांगून गेला आहे."

मैनानं तोंडावर बोट टेकलं, आणि ती म्हणाली, " पण आतां पुढचा पेपर आहे कुठें ? कॅन्सल झाला आहे. उद्यां व्हायचा आहे. मी तर घरीं जायचं म्हणत होतें."

शिपाई म्हणाला, " असं ? म्हणजे घोटाळाच झाला ! "

" तर काय ! " तिनं भुवयांना आठी घातली व ती क्षणभर जागच्या जागींच उभी राहिली. मग तिनं विचार केला, ऑफिसांत जाऊन फराळाचा डबा तर घ्यावा. गाडी नाहीं तर बसनं जातां येईल.

ती ऑफिसात गेली. दोघां कारकुनांपैकीं एकच खुर्चीत होता

त्याला तिनं विचारलं ' अहो सराफ, माझ्या ड्रायव्हरनं फराळाचा डबा ठेवला आहे कां?"

तो म्हणाला, " हो दिला, पण वाटवेंच्याजवळ दिला आहे. त्यांनीं आपल्या कपाटांत ठेवला आहे, आणि कपाटाला कुलुप लावून ते जरा खालीं गेले आहेत."

" वाटवे केव्हां येतील?"

" चहा पितील, विडी ओढतील, आणि येतीलच. बसा ना." त्यानं खुर्ची ओढून पुढें केली.

मैना खुर्चींत बसली आणि वाटव्यांच्या टेबलावर 'लाल खंजीर' नांवाचं एक पुस्तक दिसलं तें उचलून चाळून पाहूं लागली.

खाड् खाड् बुटांचा आवाज झाला म्हणून तिनं वर पाहिलं.

सुरेश हंसत तिच्याजवळ आला आणि म्हणाला, " थँक यू!"

त्याच्या सांगण्याप्रमाणें त्याची वाट बघत आपण ऑफिसांत बसलों अशी त्याची समजूत झाली याची मैनाला राग आला.

तो म्हणाला, " तुझ्याशीं काम आहे थोडंस."

ती घुश्शांत म्हणाली " जें उद्यावर ढकलतां येण्यासारखं असेल तें आज करूं नये."

तो हंसून म्हणाला " ढकलतां येण्यासारखं नाहीं ना, म्हणून तर."

तितक्यांत वाटवे कारकून आले. तिला पाहतांच ते म्हणाले ' आय ॲम व्हेरी सॉरी हं." त्यांनीं चटकन् सद्र्याखालून जानवं ओढून काढलं, जानव्याच्या टोकाला बांधलेल्या जुडग्यांतली किल्ली वेगळी केली, कपाट उघडलं, आणि डबा काढून मैनापुढें ठेवला.

" थँक्स" असं म्हणून डबा घेऊन मैना निघाली. तिनं सुरेश-कडे पाहिलंदेखील नाहीं. जणुं तो तिच्यापुढें उभा होता हें तिच्या गांवींदेखील नव्हतं. तिच्या त्या वागण्याचा त्याला चमत्कार वाटला. परंतु तो रागावला नाहीं. तिच्याबरोबर तो चालूं लागला. जिन्याच्या पायऱ्या उतरतां उतरतां तो तिला म्हणाला, " तुझ्याशीं थोडं बोलायचं आहे."

त्याच्याकडे न पाहतांच ती म्हणाली " माझ्याशीं कां रिताशीं ! "

तिच्या एक थोबाडींत द्यावी असं त्याला फार वाटलं. परंतु त्यानं आपला राग गिळला. जिन्याच्या आणि व्हरांडयाच्या पायऱ्या उतरल्यावर वाळू पसरलेल्या वाटेवरूनही मैना अगदीं झपाझप चालूं लागली. तो म्हणाला, " जलद चालण्याच्या शर्यतींत चालते आहेस कीं काय ? कुठें जायचं आहे इतक्या घाईनं ? "

" बस पकडायची आहे—"

" दर पांच मिनिटांनीं बस येते कीं. घाई कशाला ? जरा उभी रहा. मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे. "

तरी ती झराझर पावलं टाकीतच राहिली. शेवटीं कॉलेजपुढच्या आवाराच्या गेटजवळ त्यानं तिचा हात पकडला आणि म्हटलं, " असं काय करतेस ! उभी रहा ना. "

ती उभी राहिली. परंतु त्याच्याकडे पाहून म्हणाली, " रिता कुठें तरी उभी असेल. तिच्याशीं बोल काय बोलायचं तें. "

तो रागानं म्हणाला, " रिता रिता काय चालवलं आहेस ? तिचा काय संबंध ? "

" तुलाच माहीत. ती पेपर देऊन गेली तेव्हां तिच्या मागोमाग धांवलास कीं नाहीं ? "

" तिच्या मागं ? आतां कमाल झाली तुझी ! ती गेली आणि नंतर थोड्या वेळानं मी हॉलमधून बाहेर पडलों हें खरं आहे. परंतु तूं जो संबंध जोडते आहेस तो मूर्खपणाचा आहे. "

" रिताचा पेपर ठेवून घेतांना तूं ' सुंदर ' असं म्हणाला नाहींस ? "

" अग सुंदर म्हटलं तें तिला काय ? तिचा कोरा पेपर पाहून—"

" मला नको सांगूस. तुझ्याकडे पाहून ती हंसली आणि तिनं मुरका मारला हें मीं माझ्या डोळ्यांनीं पाहिलं. "

" आतां बरीक हद्द झाली तुझ्यापुढें ! पण जाऊं दे. आज

संध्याकाळचा तुझा पेपर कॅन्सल झाला आहे. माझ्या मॅचला ये. तूं कधीं येत नाहींस माझी मॅच पाह्यला."

"मला त्या खेळांतलं कांहीं कळत नाहीं. रिताला फार गोडी आहे हॉकीची—"

"पुन्हां रिताचं नांव काढशील तर—" त्यानं वाक्य पुरं न करतां फक्त डोळे मोठे करून तिच्याकडे बघितलं. मग अगदीं गोड हास्य करून तो म्हणाला, "तुला हॉकींतलं कांहीं कळत नसलं तरी माझ्यासाठीं ये. मॅच पाह्यला तूं हजर आहेस हें मला माहीत असलं कीं मला अधिक अवसान चढेल. आजची फायनल मॅच आहे. ती जिंकून चांदीची मोठी ढाल मिळवायची आहे. तूं यावंस अशी माझी फार इच्छा आहे. माझ्याबरोबरच नेलं असतं तुला. परंतु मला टीमबरोबर पुढें जायलं हवं. पण खेळाडूंच्या पाहुण्यासाठीं खास जागा ठेवलेली असते. तुला पास देऊन ठेवतों—" त्यानं खिशांतून पास काढून तिच्यापुढें धरला.

पण तिनं तो घेतला नाहीं. ती म्हणाली, 'रिताला दे तो पास.' ती झटकन् दूर झाली. मधेंच थबकून तोंड वळवून ती इंग्रजींत म्हणाली. "बेस्ट लक!" आणि ती झपझप चालूं लागली. पुन्हां त्याच्याकडे तिनं पाह्यलंदेखील नाहीं. आपण केवळ संशयानं आणि मत्सरानं इतक्या कठोरपणानं बोललों आणि वागलों हें बरं केलं कीं चूक केलं हा विचारसुद्धां त्या क्षणीं तिच्या मनाला शिवला नाहीं...

परंतु बसमध्यें चढून बसल्यावर मात्र तिची वृत्ति पालटली. सुरेशानं रिताशीं किंवा दुसऱ्या कोणत्याहि मुलीशीं किंचित्‌देखील सलगीनं वागूं नये असा बंदोबस्त करण्यासाठीं आपल्या मनांतला राग एकदां त्याला दाखवायला हवाच होता, तेव्हां आपण केलं तें बरोबरच केलं असं स्वतःच्या वागण्याचं समर्थन ती अजूनही करीत होती. परंतु तें समर्थन आतां तिचं तिलाच पटत नव्हतं. आपण कठोरपणाचा जरा अतिरेक केला असं तिच्या मनांत येऊं लागलं. सुरेशला जें सांगायचं होतं तें गोडीगुलाबीनं आणि प्रेमानं सांगतां

## : : ११ : :

मैना ताराकडे बघत राहिली. कसल्या दुःखानं तिचा जीव इतका कासावीस केला होता!— मैनाला कळेना. ताराच्या तोंडून आतां कोणते शब्द बाहेर पडतात अशा उत्कंठेनं व कांहींशा भीतीनं ती बघत राहिली.

शेवटीं तारा म्हणाली " आपल्यावर फार विचित्र संकट आलं आहे ग. "

ती पुन्हां गप्प झाली. मैनानं हळूंच विचारलं, " कसलं संकट ? "

" यांची अब्रू, लौकिक, धंदा सारं धुळीस मिळायची वेळ आली आहे. आणि त्यांतून वाचायचं असेल तर त्याची भलतीच किंमत द्यायला हवी. साठ हजार रुपये! जें कांहीं जवळ आहे नाहीं तें सगळं!—"

तारा पुन्हां स्तब्ध झाली. मैना तिच्याकडे पुन्हां बघत राहिली ...नाना आतांशा कसल्या तरी फिकीरींत आहेत एवढं तिला माहीत होतं त्यांचीं आणि ताराचीं कांहीं बोलणीं अधून मधून तिनं ऐकलीं होतीं. नाना वारंवार वकिलाकडे जात, कधीं कधीं वकील घरीं येत व नानांशीं तासन् तास बोलत बसत हें तिनं पाहिलं होत. परंतु नानांच्या हॉस्पिटलमध्यें कांहीं तरी भानगड झाली आहे व त्यातून खटला निर्माण होण्याचा संभव आहे एवढाच बोध तिला झाला होता. तिला पुष्कळदां वाटे, नानांना किंवा ताराला विचाराव. परंतु तिच्या मनांत येई, नको. अप्रिय विषय आपल्यापर्यंत पोचूं नये अशी त्या दोघांची इच्छा असेल तर त्याबद्दल आपण त्या दोघांना कशाला विचारावं! आलं असेल

कांहीं संकट. पण तें आलं तसं जाईलही. त्याचा उल्लेख नाना किंवा तारा तिच्याजवळ कधीं करीत नसत. आपणहि त्यांच्याजवळ तो न करणं बरं असं मैना मनाशीं ठरवी. तथापि नाना कसल्या तरी चिंतेनं अस्वस्थ असलेले तिला दिसत. त्यांच्या वृत्तीचा आनंद आणि खेळकरपणा नाहींसा झाला होता. अचला ज्या दिवशीं कानपूरला गेली त्या दिवशीं तिला पोचविण्यासाठीं ते स्टेशनवर आले नव्हते. नंतर नाटकाची तिकिटं घेतलीं असूनसुद्धां ते म्हणाले होते, मला यावंसं वाटत नाहीं, मी येत नाहीं. त्यांच्या मनाचा उत्साह पार ओसरून गेल्याप्रमाणें ते वागत. त्यांची चर्या चिंताग्रस्त दिसे. जेवण्याच्या वेळेस बोलतांनादेखील त्यांचं लक्ष जेवण्याकडे नसे आणि बोलण्याकडेही नसे. निराळेच कसले तरी तापदायक विचार त्यांच्या मनांत चालू असावेत असं वाटे. मधूनच डाव्या पंजानं ते कपाळ दाबीत आणि डोळे मिटून घेत. त्यांची उद्विग्नता मैनाच्या लक्षात आल्यावाचून राहिली नव्हती. परंतु ती उद्विग्नता उत्पन्न करणारं संकट कोणतं आहे अगर किती मोठं आहे तें तिला कधींच कळलं नव्हतं... आणि आतां तारा सांगत होती, नानांची अब्रू, लौकिक, धंदा सारं धुळीस मिळणार होतं!...किंवा साठ हजार रुपये द्यावे लागणार होते !...

ती हळूंच म्हणाली " म्हणजे ? सांगतेस तरी काय तूं ? "

तारा म्हणाली, " जें आहे तें सांगतें—"

" पण सारी हकीकत नीट सांग तरी मला. इतके दिवस तुम्हीं मला कसं कांहींच कळूं दिलं नाहीं ? "

" दुःखाच्या गोष्टी कशाला सांगायच्या ? "

" पण आतां तरी नीट सगळं सांग मला."

" फार मोठी हकीकत आहे. ज्या दिवशीं अचला परत गेली ना, त्याच दिवशीं या संकटाची चाहूल पहिल्यांदा लागली. तेव्हां-पासून आत्तांपर्यंत याची सारखी खटपट चालली होती तें संकट टाळण्याची. वकील म्हणतात होऊं दे फिर्याद. या खटल्यांतून निर्दोषी म्हणून अब्रूनिशी तुमची सुटका करण्याची हमी आम्ही

घेतों. परंतु मला तें पटत नाहीं. अखेर सुटका झाली तरी खटला चालू असेपर्यंत किती मनस्ताप सोसावा लागेल, सुनावणीच्या वेळेस वकील काय काय धिंडवडे काढतील, वर्तमानपत्रात काय काय छापून येईल, याची नुसती कल्पना आली कीं माझ्या अंगावर शहारे येतात. म्हणून मी यांना सारखं सांगतें आहे कीं फिर्याद व्हायला नको. ती बाई काय जे पैसे मागत असेल तेवढे सगळे तिच्या डोंबलावर घाला. आपण निष्कांचन झालों तरी हरकत नाहीं. पण कोर्टांतल्या खटल्याचे भोग नकोत. साठ हजार रुपये देऊन जग किती दुष्ट आहे वाईट आहे त्याचा अनुभव विकत घेतला म्हणावा. कुठल्या मुहूर्तावर त्या बाईला यांनी हॉस्पिटलमध्यें दाखल करून घेतली परमेश्वर जाणे !--"

मैनानं विचारलं, " कोण बाई ? "

" तिचं नाव शेवंतीबाई पारिख---"

" म्हणजे गुजराथी ?

तारा एकदम वैतागानं म्हणाली " गुजराथी कीं महारीण कोणास ठाऊक ? तिला यानीं हॉस्पिटलमधें दाखल करून घेतलीच नसती तर पुढचं सार संकट टळलं असतं. परंतु यांना तरी बिचाऱ्यांना काय कल्पना ? सज्जन प्रामाणिक माणसाला वाटत असतं, सारं जग आपल्यासारखंच आहे. म्हणून तें माणूस अंधारांत राहतं. आणि आपल्या सज्जनपणानं आणि कर्तृत्वानं आपण कुणी शत्रू निर्माण केला आहे व तो आपल्या पाठींत सुरा खुपसण्यासाठीं दुष्ट व्यूह रचीत आहेत असा त्याला चुकूनदेखील संशय येत नाही. त्या शेवंतीबाई पारिखचं याच्याकडे तपासणीसाठीं येणं म्हणचे एका दुष्ट व्यूहाचा भाग होता परंतु हें सारं आता कळतं आहे. ज्या वेळेस ती आली त्या वेळेस या व्यूहाचा याना काय कल्पना ? यांना वाटलं इतर शेंकडों पेशंट येतात तशीच ही शेवंतीबाई आली असेल..."

' डॉ. एन्. व्ही. सुलाखे ' अशीं तांबडीं इंग्रजीं अक्षरं ज्यावर लिहिलेलीं होतीं, तें दुधी रंगाचं काचेचं दार लोटून आत येणाऱ्या

त्या स्त्रीला बसण्याची खूण करतांना जेंव्हां डॉक्टरांनीं तिच्याकडे पाहिलं तेव्हां कुणी त्यांच्या कानांत हळूंच सांगितलं असतं, " ही बाई बदमाष आहे " तरी त्यावर त्यांनीं विश्वास ठेवला नसता. ती उंच बांध्याची होती. पिवळसर गोऱ्या रंगाची. थोड्या आडव्या अंगाची. तिचं कपाळ अरुंद होतं, नाक जरा गोबरंसं होतं, दांत काळ्या किटणानं रंगलेले होते. तिचे केस अगदीं जुन्या तऱ्हेनं विंचरलेले होते, आणि तिच्या तोंडावर सात्त्विक सभ्यता होती. तिनं आल्याबरोबर नमस्कार केला तोदेखील केवढ्या नम्रतेनं.

ती खुर्चींत बसल्यावर डॉक्टरांनीं वही आणि पेन्सिल सरसावून विचारलं, " नांव ? "

" शेवंतीबाई."

" आडनांव ? "

" पारिख."

" लग्न झालंय ? "

" हां."

" वय ? "

ती हंसली आणि म्हणाली, " नक्की नाहीं सांगतां येत, पण अठ्ठावीस लिहा."

मग वही दूर सारून पेन्सिल तशीच हातांत ठेवून डॉक्टरांनीं विचारलं " काय तक्रार आहे तुमची ? "

" पोटांत फार दुखतं आहे." तिनं पोटावर दोन्ही हात दाबले आणि मग केव्हां दुखतं कसं दुखतं, दुखूं लागल्याला किती दिवस झाले इत्यादि हकीगत सांगितली.

डॉक्टरांनीं ती ऐकून घेतली; आणखी कांहीं प्रश्न विचारले, आणि मग शेवटीं खुर्चीवरून उठत ते म्हणाले " आंतल्या खोलींत चला. तपासून पाहतों."

ती पांच महिन्यांची गरोदर होती. तिच्या पोटदुखीचं निदान डॉक्टरांना नक्की करतां येईना. आठ पंधरा दिवस तिला हॉस्पिटलमध्यें नजरेखालीं ठेवली तर करतां येईल असं त्यांना वाटलं. तिनं त्या

गोष्टीस संमति दिली. डॉक्टरांनीं तिला दाखल करून घेतली. लाम नांवाचा एक पारशी डॉक्टर मदतनीस म्हणून त्यांच्याकडे होता. रत्ना शेवाळे नावाची मुख्य नर्स होती. त्या दोघांनाही शेवंतीबाईची केस त्यांनी समजून सांगितली.

या गोष्टीला सहा दिवस झाले. सातव्या दिवशीं रात्रीं डॉक्टर लामचा टेलिफोन आला म्हणून तारानं डॉक्टरांना उठविलं. डॉक्टर टेलिफोनवर गेले व त्यांनी लामला विचारलं, " काय डॉक्टर ?"

" तुम्हांला तावडतोब इकडे हॉस्पिटलमधें आलं पाहिजे."

" कां ? "

" शेवंतीबाईची केस सीरियस झाली आहे. तिच्या गर्भाशयांतून भलत्याच प्रमाणावर रक्तस्राव सुरू झाला आहे. "

" असं ? कांहीं हरकत नाहीं. मी येतोंच."

कपडे करतां करतांच हॉस्पिटलमधें गेल्यावर काय करायचं तें डॉक्टरांनीं मनाशीं ठरविलं.

त्यांनीं शेवंतीबाईला धीर दिला. तिची संमति विचारली, आणि गर्भपाताचं ऑपरेशन केलं.

त्यानंतर पंधरा दिवस शेवंतीबाई हॉस्पिटलमधें राहिली. खडखडीत बरी झाली. डॉक्टरांनीं डिसचार्ज दिल्यावर घरीं गेली.

असे शेकडो पेशंट हॉस्पिटलमध्यें येतात आणि जातात. हॉस्पिटल चालविणाऱ्या डॉक्टरला त्यांची आठवणही रहात नाहीं. शेवंतीबाई पारिख हें नांव डॉक्टर सुलाखे विसरूनदेखील गेले. बरेच दिवसांनीं तें नांव त्यांना पुन्हां आठवून पहावं लागलं तें शेवंतीबाई पारिखकडून बिल वसूल होत नाहीं अशी तक्रार त्यांच्या कंपाउंडरनं त्यांच्याजवळ केली तेव्हां. पण तेव्हांदेखील ते कंपाउंडरला म्हणाले, " येतील पैसे. जातात कुठें ! पुन्हां पाठवा आपल्या माणसाला."

त्यानंतर पुन्हां दोन तीन वेळां कंपाउंडरनं तक्रार आणली तेव्हां डॉक्टरांनीं त्याला सांगितलं, " वसूल होत नसतील पैसे तर सोडून द्या पाहूं. बुडाले म्हणून समजूं."

कंपाउंडरनं भीत भीत म्हटलं, " आपण किती बिलं बुडूं देता

विचार केला आहे कां ? ”

डॉक्टर हंसले व म्हणाले, “ तीं बुडालीं तरीसुद्धां हॉस्पिटल उत्तम चाललंय ना, एवढाच विचार मी करतों. रोग्यांची सेवा करणं हें डॉक्टराचं पहिलं कर्तव्य. खूप पैसा मिळतो आहे. पण पैसा हें माझं ध्येय नाहीं. सेवा आणि सज्जनपणा हेंच ध्येय आहे. तें सोडायचं नाहीं आपल्याला. ”

कांहीं न बोलतां कंपाउंडर निघून गेला. त्याला माहीत होतं कीं आपल्या सज्जनपणाच्या आणि नैपुण्याच्या जोरावर डॉक्टर सुलाख्यांनीं आपलं हॉस्पिटल अल्प काळांत मोठ्या भरभराटीला आणलं होतं. सुलाख्यांचं हॉस्पिटल या ठिकाणीं होण्याच्या आधीं समोरच डॉक्टर विष्णु पंडित याचं हॉस्पिटल होतं. ते डॉक्टर जर्मनींत शिकून परत आलेले होते. त्यांच्याकडे रोग्यांची खूप गर्दी असे. पण रोग्यांना पिळून काढणं आणि वाटेल त्या लटपटी करणं हें त्या डॉक्टर विष्णु पंडिताचं ध्येय होतं त्यांच्याकडे रोगी खूप जात, परंतु सारे त्यांना शिव्या देत असत. समोर सुलाख्याचं हॉस्पिटल झालं तेव्हांपासून गरीब, श्रीमंत सारे रोगी त्यांच्याकडे येऊं लागले होते. डॉक्टर पंडितांचं हॉस्पिटल ओस पडलं होतं. ते डॉक्टर सुलाख्यांचं वैर करूं लागले होते. त्यांच्याकडे जाणाऱ्यांजवळ ते डॉक्टर सुलाख्यांची खूप निंदा करीत आणि त्यांना शिव्या देत. “ सुलाख्याला काय समजतंय ढेकळ ? साऱ्या मुलखाचा डॅंबिस आहे तो ” असं ते म्हणत. सुलाख्यांचा उत्कर्ष पाहून ते मत्सरानं जळत होते. या साऱ्या गोष्टी डॉक्टर सुलाख्यांना माहीत होत्या. परंतु ते म्हणत, “ करूं दे बिचाऱ्याला माझं वैर विनाकारण करायचं असेल तर. मी कशाला त्याच्याकडे लक्ष देऊं ? तो माझं कांहीं वाकड करूं शकत नाहीं ! ” कंपाउंडरला हें सारं माहीत होतं. शेवंतीबाई पारिखचं बिल बुडालं तर बुडूं दे असं डॉक्टर सुलाखे म्हणाले त्याचं त्याला आश्चर्य वाटलं नाहीं.

शेवंतीबाईच्या केसची आठवण नंतर राहण्याचं डॉक्टर सुलाख्यांना कांहींच कारण नव्हतं.

परंतु एके दिवशीं त्यांच्या टपालांत एक रजिस्टर्ड पाकिट आलं. तें त्यांनीं उघडून पाहिलं तों त्यांत वकिलाची नोटिस होती! "आमच्या अशिल कुमारी शेवंतीबाई पारिख यांनीं माहिती दिल्या-वरून ..." या वाक्यांतील 'कुमारी' हा शब्द वाचल्याबरोबर डॉक्टर चकितच झाले!...

"... तुम्ही शेवंतिबाईशीं पुष्कळ दिवस अनैतिक संबंध ठेवला. तुमच्यापासून ती गरोदर राहिली तेव्हां तिच्यावर तुम्ही गर्भपाताचे ऑपरेशन केलें..."

आपण हें काय, वाचीत तरी काय आहोंत असा डॉक्टर सुळाख्यांना भ्रम वाटला...त्यांनीं पुन्हां एकदां दोनदां ती वकिलाची नोटिस वाचली...मग त्यांच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला! एकूण ही शेवंतीबाई म्हणजे एक हलकट, उनाड बाई होती म्हणायची! तिच्या तडाख्यांत आपण गवसलों होतों म्हणायचें!

त्या दिवसापासून जन्मांत कधीं न अनुभविलेला असा मनस्ताप डॉक्टराच्या वाट्याला आला होता. वाटेल तसल्या लटपटी लबाड्या करून, गरजू रोग्यांना नाडून डॉक्टरी धंद्याची नीति धाब्यावर बसवून खोऱ्यानं पैसा ओढणारे, आणि कायद्याच्या कचाट्यांत कधीं-देखील न सापडतां समाजांत प्रतिष्ठितपणानं वावरणारे, ख्याली-खुशालींत राहणारे, मोटारी उडविणारे कित्येक समव्यवसायी डॉक्टर त्यांना माहीत होते. उलट, सज्जन, पापभीरु नामांकित डॉक्टरां-वर अकस्मात् कांहीं तरी भयंकर बालंट आल्याचीं व त्यांना धंद्यांतून आणि समाजांतून उठावं लागल्याचीं कांहीं उदाहरणं त्यांना ऐकून माहीत होतीं. असं बालंट आपल्यावर कधीं काळीं येईल असं त्याना स्वप्नांतदेखील वाटलं नव्हतं. परंतु आतां तें प्रत्यक्ष येऊन ठेपलं होतं...खरं म्हणजे त्यांनीं शेवंतीबाईवर मोठे उपकार केले होते. त्या दिवशीं तिच्या गर्भाशयांतून एकाएकीं रक्तस्राव सुरू झाल्याचं टेलिफोनवर ऐकल्याबरोबर ते चकितच झाले होते. त्यांनीं तिला काळजीपूर्वक तपासली होती. अशा रक्तस्रावाचा संभव त्यांना बिलकूल दिसला नव्हता. परंतु तो सुरू झाल्यानंतर नुसतं

आश्चर्य करीत राहून चालण्यासारखं नव्हतं. जो कांहीं उपाय करावयाचा तो ताबडतोब करावयास हवा होता. सुदैवानं ऑपरेशन यशस्वी झालं होतं. शेवंतीबाईच्या प्राणावरचं संकट टळलं होतं. त्यांनीं ऑपरेशन करतांना तिची संमतिही घेतली होती. आणि नंतर तिच्याकडून बिलाचे पैसे मिळाले नाहींत तेव्हां ते खुशाल बुडूं दिले होते. खरं म्हणजे तिनं त्यांच्या उपकाराबद्दल व चांगले-पणाबद्दल कृतज्ञता ठेवायला हवी होती...पण आतां तिचा वकील लिहीत होता—

" तुम्ही शेवंतीबाईशीं पुष्कळ दिवस अनैतिक संबंध ठेवला. तुमच्यापासून ती गरोदर राहिली तेव्हां तिच्यावर तुम्ही गर्भ-पाताचें ऑपरेशन केलें... "

केवढा किळसवाणा आणि भयंकर आरोप ! दुष्टाव्याचा किती भयंकर हा प्रकार ! कांहीं वेळ डॉक्टरांच्या मनानं ठावच सोडला. आपल्या सहनशक्तिपलीकडचा हा प्रहार आहे असं त्यांना वाटलं... ही गोष्ट ताराला लगेच सांगावी कीं सांगूं नये याचा निश्चय त्यांना करतां येईना. पुरुषाच्या वांट्याला कधीं कधीं मानहानीचा असा प्रसंग येतो कीं अत्यंत प्रेमाच्या जिवलग सखीलादेखील तो कळूं नये असं त्याला वाटतं. परंतु दोन अंतःकरणांत अंतर उरलेलं नसलं कीं दुःख सांगितल्याखेरीज राहवत नाहीं...तारानं डॉक्टरांना धीर दिला. खचून चालणार नाहीं, संकटाला तोंड कसं द्यायचं त्याचा विचार केला पाहिजे ही गोष्ट त्याना पटविली. ती त्यांना म्हणाली, "उत्तमांतल्या उत्तम वकिलाचा सल्ला घ्या आधीं."

डॉक्टरांची सगळी हकीगत ऐकल्यावर शेवडे वकील म्हणाले " तुम्हांला वाटतं तितकं भीतीचं कारण नाहीं डॉक्टर. "

कोरड्या घशांत आशेचं अमृत पडल्याप्रमाणें डॉक्टरनीं एकदम विचारलं, " नाहीं ! असं कसं म्हणतां ! "

शेवडे वकील म्हणाले " म्हणतों याला कारण आहे. ही शेवंतीबाई पारिख कोण तें मला माहीत आहे. "

" होय ! लग्न झालेली आहे कीं कुमारी आहे ! खरं काय ! "

शेवडे हंसले आणि म्हणाले " लग्न झालेलीही नाहीं, आणि ज्या अर्थीं ती गरोदर होती त्या अर्थीं तिला कुमारीही म्हणतां येणार नाहीं. ती एक प्रतिष्ठित रखेली आहे ! "

" काय म्हणतां ? "

" कुणाची म्हणून नाहीं विचारलंत ? " शेवडे पुन्हा हंसले. " तुमच्या समोर कुणाचं हॉस्पिटल आहे —? "

डॉक्टरांनीं एकदम आश्चर्यानं म्हटलं. " काय, सांगतां काय ? डॉक्टर विष्णु पंडितची रखेली आहे ही शेवंतीबाई ? "

शेवडे हंसले आणि त्यांनीं मान हालाविली.

डॉक्टरांना आश्चर्याचा मोठाच धक्का बसला.

आणि त्यानंतरच्या दिवसांत एकेक नवीनच गोष्ट उघडकीस येऊं लागली व त्यांपैकीं प्रत्येकीचा धक्का त्यांना बसूं लागला. हळूं हळूं डॉक्टर विष्णु पंडितांनीं त्यांचा सूड घेण्यासाठीं त्यांच्या विरुद्ध रचलेल्या कारस्थानाचं संबंध चित्र स्पष्ट दिसूं लागलं.

शेवडे वकिलांनीं शेवंताबाईची खाजगी गांठ घेऊन तिला सांगितलं की " बाई, डॉक्टर सुलाख्यांकडून पैसे उकळण्यासाठीं हा फिर्यादीचा डाव तूं खेळते आहेस खरी, परंतु तो कोर्टांत टिकायचा नाहीं. "

ती बाई मोठी वस्ताद. ती म्हणाली, " तो शहाणपणा नका आपण मला शिकवूं. आमची केस मजबूत आहे. तुम्हांला केस आपसांत मिटवायची असेल तर माझ्याशीं बोलण्यांत अर्थ नाहीं. डॉक्टर विष्णु पंडितची भेट घ्या. "

" त्याचा काय संबंध ? "

ती म्हणाली, " कोर्टांत मी कधीं सांगणार नाहीं, पण तुम्हांला खाजगी म्हणून सांगतें कीं डॉक्टर पंडितनींच मला मुद्दाम पढवून डॉक्टर सुलाख्यांकडे पाठविलं होतं."

आश्चर्य वाटलं तरी चेहेऱ्यावर दिसूं न देण्याची संवय वकिलांना झालेली असते. शेवंतीबाईकडे रोखून बघत शेवडे म्हणाले, " पण डॉक्टर पंडितलादेखील कळायला हवं कीं हा डाव सहज साधण्या-

सारखा नाहीं. साक्षीपुरावे होतील तेव्हां सुलाखयांचा मदतनीस डॉक्टर लाम आणि मुख्य नर्स रत्ना शेवाळे यांच्याही साक्षी होतीलच कीं."

शेवंतीबाई हसली आणि म्हणाली, "होतील ना. जरूर होतील. पण जी गोष्ट कोर्टांत सांगणार नाहीं पण तुम्हांला म्हणून आतां खाजगी सांगायला हरकत नाहीं अशी आणखी एक गोष्ट आहे. लाम आणि रत्ना दोघांनाही लाच देऊन डॉक्टर पंडितनीं आपल्या कारस्थानांत सामील करून घेतलं होतं."

तोंडावर आश्चर्य दिसूं न देण्याचा प्रयत्न शेवड्यांना पुन्हां एकदां करावा लागला परंतु ते त्या बाईच्या नजरेला नजर भिडवून बघत राहिले.

ती बाई बनेल आणि धाडसी खरीच. ती हंसली व म्हणाली, "माझ्या अंगांतून रक्तस्राव एकाएकीं कां सुरू झाला डॉक्टर सुलाखेंना कुठें आहे माहीत? डॉक्टर पंडिताच्या सांगण्यावरून लामनं त्या रात्रीं तो मुद्दाम सुरू केला, आणि सुलाखेंना टेलिफोन केला—"

आतां मात्र चेहऱ्यावर आश्चर्य न दाखविणं शेवड्यांना फार कठीण झालं. त्यांच्या मनांत आलं, काय भयंकर अघोरी बाई आहे ही! ते म्हणाले, "रक्तस्राव थांबला नसता आणि मेली असतीस त्या रात्रीं म्हणजे?"

ती किंचित् हसली आणि म्हणाली, "पैसा हवा तर जिवावर उदार व्हायला नको कां?"

"आणि खुशाल गर्भपात करून घेतलास? पोटांतलं मूल मारलंस?"

"मूल काय, पुन्हां होईल. पुष्कळ उमर बाकी आहे अजून. आणि शिवाय मूल काय मीं मारलं? डाक्टर सुलाखेंनीं मारलं. तीच तर फिर्याद करायची आहे माल त्यांच्यावर."

शेवड्यांच्या मनांत आलं, या बाईला मन बिन कांहीं आहे कीं नाहीं? हिला बाई म्हणायचं कीं चेटकीण कीं हडळ? खरोखर असा चांडाळपणाचा नमुना त्यांनीं स्वतः तर कधीं पाहिला

नव्हताच, परंतु या जगाच्या पाठीवर कुठें असेल हेंसुद्धां पूर्वी त्यांना खरं वाटलं नसतं.

फिर्यादीचं एकंदर कारस्थान डॉक्टर विष्णु पंडितचं होत हें कळल्यावर डॉक्टर सुलाखे चकित झाले. त्यांनीं डॉक्टर पंडितचा अपराध केला होता तो एवढाच कीं त्यांच्या हॉस्पिटलसमोर हॉस्पिटल उघडलं होतं, आणि आपल्या गुणांच्या जोरावर भरभराटीला आणलं होतं! परंतु म्हणून काय डॉक्टर पंडितनं असा सूड घ्यावा? आपल्याला माणसांतून उठविण्याचं असं दीर्घसूत्री कारस्थान रचावं? एक माणूस दुसऱ्याचा इतका भयंकर द्वेष करूं शकतं? आणि इतक्या हुशारीनं सारा व्यूह रचूं शकतं? डॉक्टर सुलाखेंना जसं फार आश्चर्य वाटलं तसंच अतिशय दुःखही झालं, आणि या खटल्यांत आपल्या अब्रूची प्रतिष्ठेची आणि धंद्याचीदेखील राख होणार या भयानं ते अगदीं गांगरून गेले.

ताराची प्रेमळ सोबत त्यांना होती, तिच्याकडून त्यांना धीर मिळत होता, म्हणूनच त्यांचं मन थोडं तरी खंबीर राहिलं. गांगरून जाऊन ते हताशच झाले असते. परंतु तारा त्यांना सारखं म्हणत राहिली, "तुम्ही निष्कलंक आहांत, अगदीं भिऊं नका. सूर्य-चन्द्रांनादेखील ग्रहण लागतं, परंतु तें सुटल्याखेरीज रहात नाहीं." शेवडे वकील तर डॉक्टरांना सांगत होते "भ्यायचं कारण नाहीं हो. केस जिंकू आपण. शेवंतीबाई डॉक्टर पंडितची रखेली आहे हें आपल्याला सहज सिद्ध करतां येईल. कोर्टांत तिच्या दानतीचीं लक्तरं करून दाखवली कीं तिचा शब्द कसा कवडी किंमतीचा आहे तें सिद्ध होईल. लाम आणि रत्ना शेवाळे यांच्या साक्षीदेखील लबाडीच्या आणि खोट्या ठरवितां येतील. ही केस तर आपण जिंकूंच. पण उलट बेअब्रूची फिर्याद करून शेवंतीबाईकडून ठणठणीत नुकसाभरपाई वसूल करूं आपण. डॅबिस लोकांना वठणीवर आणण्याची विद्या भरपूर अवगत आहे आम्हांला. चाळीस वर्षं धंदा केला तो काय उगीच? तुम्ही बिलकुल डरूं नका."

डॉक्टरना शेवड्यांचा हा सल्ला थोडा तरी पटत असे. परंतु

तारा तो मानायला तयार नव्हती. ती म्हणे " खटला व्हायला नको. शहाण्या माणसानं कोर्टाची पायरी कधीं चढूं नये. "

शेवडे म्हणत, " सत्याचा अखेर जय होईलच. "

" हें सुभाषित बोलायला ठीक आहे हो वकीलसाहेब." तारा म्हणे " प्रत्यक्षांत तुम्हीच सांगा न्यायाचा काटा सत्याकडे झुकेल अशी हमी देतां येईल ? आणि शिवाय सत्याचा जय झाला तरी अखेर होणार. प्रारंभींच नाहीं होणार. शेवटीं ! तो शेवट गांठीपर्यंत कोर्टांत काय काय घिंडवडे निघतील, काय तऱ्हेचे प्रश्न विचारले जातील, किती मानहानि, मनस्ताप सहन करावा लागेल, लोकांच्या जिभा किती सैल सुटतील त्याला कांहीं गणति ? त्या साऱ्या त्रिटंबनेचं चित्र मला स्पष्ट दिसतं आहे. कोर्ट कचेरी होऊं देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्या बयाला म्हणावं तुला किती पैसे पाहिजेत बोल."

शेवडे वकील म्हणत, " अशान दुष्टाचं पारिपत्य होत नाहीं. त्याचा डाव साधतो. आणि पुन्हां दुसऱ्या कुणावर तरी बालंट घेतांना त्याला अधिक धीर येतो. दुष्टाला ठेंचून काढणं आणि पुन्हां आपल्या दुष्टाव्याची नांगी तो कुणाला मारणार नाहीं असं करणं हेंच खर कर्तव्य आहे. हें कर्तव्य करायला माणसं कचरतात, आणि म्हणून समाजकटकांना कायद्याचा दरारा वाटेनासा होतो. तुम्हीसुद्धा भिऊन पैसे चारले तर व्हायचं कसं ? "

शेवडे वकिलांच्या असल्या बोलण्याचा डॉक्टरांच्या मनावर परिणाम होत असे. ते ताराला म्हणत " शेवड्यांच्या बोलण्यांत तथ्य आहे." तारा म्हणे, " तथ्य असलं तरी तें पथ्य नाहीं. खटला चालूं झाला कीं आपल्याला मनस्ताप किती होईल याचा विचार शेवड्यांना कसा करतां येणार ? पण आपल्याला करायला नको ? शिवाय सॉलिसिटर, साक्षीदार, इत्यादींचा खर्च एकदां सुरूं झाला कीं त्याला कांहीं सीमा राहील कां ? हॉस्पिटलच्या कामाकडे तुमचं लक्ष बिलकुल राहणार नाहीं. त्यामुळेंही पर्यायानं आर्थिक नुकसान होईल. म्हणजे हजारो रुपयांचा चुराडा होईल. मानसिक त्रास आणि लौकिक विटंबना सोसायची, आणि शिवाय

पैसे घालवायचे! त्यापेक्षां ती बाई मागेल तेवढे पैसे तिला देऊन दुर्लौकिक आणि चिंता टाळणं अधिक शहाणपणाचं नाहीं कां!"

तिचं हें म्हणणंही डॉक्टरांना पटत होतं.

त्यांच्या मनाची द्विधा अवस्था झाली होती. एकदां त्यांना वाटे, शेवडे म्हणतात तें बरोबर आहे. दुष्ट डॅंबिस माणसांना आपण धडा शिकवायला हवा. परंतु पुन्हां त्यांच्या मनांत येई, धडा शिकविण्याच्या गोष्टी कोणत्या भरंवशावर बोलायच्या? खटल्यांत आपण निर्दोषी ठरूं याची शंभर टक्के खात्री थोडीच बाळगतां येण्यासारखी आहे? शिवाय खटला लढवायचा म्हटला कीं पैशा-परी पैसा खर्च होणार, चिंतेचं ओझं वहावं लागणार. त्यांना एकदां वाटे वकिलाचं ऐकावं, एकदां वाटे ताराचं ऐकावं.

शेवटीं शेवंतीबाईला पैसे देऊन गप्प बसविण्याचा त्यांनीं निर्णय घेतला. त्यांच्या सांगण्यावरून शेवडे वकीलांनीं तिच्याकडे जाऊन तिच्या गप्प बसण्याची किंमत विचारली. तिनं उत्तर दिलं, "डॉक्टर पंडित म्हणतात साठ हजार रुपये घे." तो आकडा शेवाडेनीं डॉक्टर सुलाख्यांना टेलिफोनवरून कळविला. डॉक्टरांनीं घरीं टेलिफोन करून ही हकीगत ताराला सांगितली. ती समजल्यापासून तारा सारखी रडत बसली होती. अखेर रडून रडून थकल्यावर ती न्हाणी-घरात गेली होती. टॉवेलनं तोंड पुशीत बाहेर आली तोंच मैना तिच्या दृष्टीस पडली होती. तिला पाहतांच आपलं सारं चमत्कारिक दुःख तिला आठवलं होतं. एकदम मैनाच्या गळ्यांत गळा घालून ती रडूं लागली होती... सारी हकीगत सांगतांना आपलं रडणं आवरणं तिला बऱ्याचवर कठीण झालं होतं...

बोलतां बोलता तारा थांबली. आसवांनीं भरलेल्या डोळ्यांनीं मैनाकडे बघत ती म्हणाली, "असं हें फार चमत्कारिक संकट आपल्यावर आलंय ग."

एकतां ऐकतां मैनाच्याही अंतःकरणांत दुःख उचंबळून आलं होतं ती सारखी रडतच होती. तिनं ताराचे दोन्ही हात आपल्या हातांत घट्ट धरून ठेवले होते. बोलणं संपवून तारा स्तब्ध झाली

तेव्हां उलट कांहीं बोलण्याचं तिला सुचेचना. संकटाच्या वावटळींत सांपडलेल्या आपल्या आईबापांना ती काय धीर देऊं शकत होती ! ती कोणता शहाणपणा शिकवूं शकत होती ! आणि ती स्वत: रडली भेकली तरी त्यांच्या दुःखाचा भार कसा हलका होणार होता !... ताराशीं काय बोलवं तिला समजेना. गुदमरलेल्या मनानं आणि बावरलेल्या ओल्या चिंब नजरेनं एखाद्या मुक्या जनवराप्रमाणें ती फक्त ताराकडे बघत राहिली...

तारा म्हणाली, " हा डॉक्टर पंडित म्हणजे कसा पूर्वजन्मींचा वैरी उभा राहिला आहे बघ !..."

मैनाच्या तोंडून उद्गार निघाला " वैरी खराच ग बाई ! "

तितक्यांत टेलिफोन वाजला. मैनानं चटकन उठून तो घेतला, आणि तिनं ताराला सांगितलं " नानांनीं तुला हॉस्पिटलमध्यें थोडा वेळ बोलावलं आहे. तिथें शेवडे वकील दुसऱ्या एका मोठ्या वकिलांना घेऊन आले आहेत म्हणे. लवकर बोलावलं आहे तुला."

तारा गेली. मैना घरांत एकटी राहिली, सारजा आली ती कामाला लागली. पुढच्या खोलींत मैना एकटीच खुर्चींत पडून राहिली. किती रडलं तरी तिला तें पुरेसं वाटेना. आश्चर्याच्या आणि दुःखाच्या तडाख्यानं तिचं विचारचक्र तर अजिबात मोडतोड होऊन बंद पडलं होतं. मन बधिर झालेलं आणि हुंदके मात्र अनावर झालेले अशा विचित्र अवस्थेचा ताण माणसाला अगदीं असह्य होतो... मग एकाएकीं तिला सुरेशची आठवण झाली. ती झाल्याबरोबर बाकी साऱ्या गोष्टींचा तिला विसर पडला, आणि तिच्या मनांत आलं, फार कठोरपणानं वागलों आपण त्याच्याशीं. मॅच पाहायला जायला हवं होतं आपण... सुरेशला आपण दुखविलं हें बरं नाहीं केलं... आपण त्याचं म्हणणं ऐकलं असतं तर आपण या घटकेला बॉबे जिमखान्याच्या मैदानावर... तिला एकदम आठवण झाली, रेडिओवर मॅचची कॉमेंटरी आहे. तिनं झटकन घड्याळ्यांत पाहिलं... संपत आली असेल मॅच. पण शेवटचीं पांच मिनिटं ऐकतां येतील.

ती झटकन उठली. रेडिओपाशीं जाऊन तिनं चावी फिरविली. टाळ्यांचा आणि आरड्याओरड्याचा गोंगाट एकदम तिच्या कानां- आला. आणि मग कॉमेंटरी करणाऱ्या आवाज तिच्या कानावर पडूं लागला.

" ...अजून कोणत्याही संघाचा गोल न झाल्यामुळें सामान्याला भयकर रंग चढला आहे. शेवटची शिटी वाजायला फक्त चार मिनिटं उरलीं आहेत. या चार मिनिटात कोणत्या संघाचं पारडं वर आणि कोणत्याचं खालीं जातं बघायचं. दहा बारा हजार प्रेक्षकांना हा ताण आतां असह्य झाला आहे. एकेका सेकंदांत दैवाचा निकाल ठासून भरलेला आहे. चेंडू क्षणांत एका हद्दींत येतो आहे तर क्षणांत दुसऱ्या हद्दींत जातो आहे. युनिव्हर्सिटी संघाच्या सुरेश लिमयेनं आज खेळाची पराकाष्ठा केली आहे. तो निघाला पहा पांढरा शुभ्र चेंडू हॉकीच्या काठीनं पुढें पुढें ढकलीत ! प्रतिस्पर्धी संघाचे चार गडी त्याच्या पाठीवर आहेत, आणि त्याच्या हातून चेंडू काढून घेण्याचा प्रयत्न करताहेत. परंतु सुरेश लिमये म्हणजे एक बडा चलाख जादूगार आहे. चौघा प्रतिपक्षीयाना हुलकावण्या देत तो चेंडू घेऊन निघाला आहे. ' बक अप सुरेश ! ' ' कम ऑन युनिव्हर्सिटी ! ' अशा आरोळ्यांनीं मैदान दुमदुमून गेलं आहे. तो पहा निघाला सुरेश एखाद्या चित्त्यासारखा ! त्यानं तडाखा मारून चेंडू आपल्या डाव्या बगलेच्या साथीदाराकडे टोलविला बघा ! तो साथीदार चेंडू घेऊन पुढें सटकला आहे. सुरेश लिमये चार झेपांत शत्रूच्या गोलपाशीं जाऊन उभा राहिला आहे. त्याचा डाव्या बगलेचा साथीदार त्याला चेंडू परत देणार काय ? ओ हो ! दिला ! आला चेंडू परत सुरेश लिमयेच्या हातीं ! प्रति- पक्षाच्या पांच सहा गड्यांनीं सुरेशभोंवतीं कोंडाळं केलं आहे ! त्या सगळ्यांना चुकवून तो चेंडू घेऊन पुढें चालला बघा. आतां गोलापासून तो फार तर दहा फुटांच्या अंतरावर असेल. ' शूट ! शूट ! ' च्या आरोळ्या जिकडून तिकडून उठताहेत. सुरेश

लिमयेची काठी उचलली गेली! त्यानं चेंडूला तडाखा दिला. एखाद्या बंदुकीच्या गोळीसारखा जाऊन तो गोलच्या फळीवर वाजला. युनिव्हर्सिटी संघाचा गोल झाला !...अरे पण हें काय! सुरेश लिमये हिरवळीवर निपचित पालथा पडला आहे. हातांतली काठी त्यानं फेकून दिली आहे. सारे खेळाडू त्याच्या-भोंवतीं जमा झाले आहेत... जिमखान्याच्या पॅव्हिलियनमधून डॉक्टर धांवत येतो आहे. सुरेशला जबरदस्त दुखापत झालेली दिसते आहे. डॉक्टर त्याला उठवीत आहेत. दोघा खेळाडूंनीं खांद्यांखालीं आधार दिला आहे. त्याला धड पाऊल टाकतां येत नाहीं. कितपत दुखापत त्याला झाली आहे कुणास ठाऊक?... खेळाचं अर्ध मिनिट शिल्लक आहे. सुरेश लिमये मैदानांतून गेला. युनिव्हर्सिटी संघाचे दहाच खेळाडू आतां खेळत आहेत... चेंडू युनिव्हर्सिटी संघाच्या हद्दींत आला आहे... संघाच्या उजव्या बगलेच्या 'हाफ बॅक' नं तो आपल्या ताब्यांत घेतला, आणि सपाटून टोला मारला. चेंडू खेळाच्या हद्दीबाहेर गेला... पण खेळ संपल्याची अखेरची शिटीच वाजते आहे. सामना संपला. युनिव्हर्सिटी संघाचा विजय झाला. या विजयाच्या श्रेयाचा मोठा वाटा अर्थातच सुरेश लिमयेकडे आहे. प्रतिपक्षावर गोल चढवितां चढवितां त्याला दुखापत व्हावी हें दुर्दैव तर खरंच. परंतु त्यानं मैदान सोडलं तें बहादुरी गाजवून! आपल्या संघाच्या गळ्यांत विजयाची माळ घालून! हजारों प्रेक्षकांची वाहवा मिळवून!..."

कॉमेंटरी बंद झाली. मैदानावरचा गलगा गोंधळ विरून गेला. रेडिओ स्टेशनवरचा अनाऊन्सर इंग्रजींत सांगूं लागला, "आत्तां आपण बॉम्बे जिमखान्याच्या मैदानावर झालेल्या युनिव्हर्सिटी संघ आणि टाटा संघ यांच्यांतील हॉकीच्या निर्णायक सामन्याचा वृत्तांत ऐकलांत..." मैनानं चावी फिरवून रेडिओ बंद केला. तिच्या मनाची अवस्था मोठी चमत्कारिक झाली होती. हर्ष आणि दुःख

यांच्या लाटा एकमेकींवर आदळत होत्या. सुरेशनं बहादुरी गाजविली होती ! सामना जिंकला होता ! सुरेशनं ! ज्याच्यावर तिची प्रीति जडली होती त्या सुरेशनं ! तिला वाटलं, तो आपल्या समोर असतां तर त्यांचे दोन्ही हात हातांत घेऊन आपण कुस्करले असते. सुरेशबद्दलच्या अभिमानानं, हर्षानं, आणि आपलं जसं त्याच्यावर प्रेम आहे तसंच त्याचं आपल्यावर आहे या जाणीवेनं तिचं हृदय उचंबळून आलं. पण त्याबरोबरच त्याची मॅच पहावयास आपण गेलों नाहीं व त्याला आपण दुखविलं हें आपण फार वाईट केलं अशा पश्चत्तापाचाही चटका तिच्या मनाला बसला. आणि सुरेशला दुखापत होऊन तो मैदान सोडून गेला त्याचं वर्णन तिला पुन्हां आठवलं तेव्हां तर ती मनांतल्या मनांत दुःखानं घाबरी झाली. त्याला किती लागलं होतं कुणास ठाऊक ? ती मैदानावर असती तर धांवत गेली असती आणि तिनं त्याला आपल्या हातांनीं कुरवाळलं असतं. लोकांच्या देखत ! आतां तिच्या मनांतल्या प्रेमाला लज्जेची व संकोचाची मर्यादा उरली नव्हती. पण ती मूर्खासारखी घरीं राहिली होती ! त्याला दुखवून ! त्याच्यापासून दूर !... तिला वाटलं पंख लावून भरारी घ्यावी, सुरेशकडे जावं, त्याच्या अंगावरून हात फिरवावा, त्याला थोपटावं, त्याची क्षमा मागावी, त्याला सांगावं माझं प्रेम तुझ्यावर आहे... परंतु हें करणं शक्य नव्हतं...उद्यांपर्यंत वाट पहाणं भाग होतं.

दुसऱ्या दिवशीं कॉलेजांत पोंचल्याबरोबर तिनं चौकशी केली. तिला वाटलं होतं सुरेशला फार मोठी इजा झाली असेल तर तो कदाचित् कॉलेजांत आलेला नसेल. पण शिपायानं सांगितलं "आले आहेत." ती धांवत प्राध्यापकांच्या बैठकीच्या खोलीकडे गेली. तिनं दारांतून डोकावून पाहिलं. समोरच्या खिडकीपाशीं कुणाशी तरी बोलत सुरेश उभा होता. त्यानं कोट घातलेला नव्हता, आणि त्याचा डावा हात गळ्याभोंवतीं बांधलेल्या फडक्यांत अडकविलेला होता. त्याची व तिची दृष्टादृष्ट झाल्यावर तो हंसला, व बोलणं

सोडून खिडकीपासून दूर होऊन तिच्याकडे येऊं लागला. झपाझप पावलं टाकण्याची केवढी ती त्याची ऐट! त्याच्या गतींतलं सौंदर्य तिनं कितीदां तरी पाहिलं होतं, परंतु आतां तें दृष्टीस पडतांच पूर्वी कधीं झाली नव्हती अशी तिच्या हृदयाची हालचाल झाली. आणि कां कोण जाणे, तो जवळ येऊन उभा राहिल्याबरोबर लज्जेचे ऊष्ण रोमांच तिच्या अनुभवास आले...

खरं म्हणजे लाजेनं तिची जीभच कोरडी पडली. परंतु ती प्रयत्न करून म्हणाली, "सुरेश!" तिनं आवंढा गिळला आणि पुढें म्हटलं "आधीं तुझं अभिनंदन करूं कीं आधीं क्षमा मागूं?"

तो हंसला आणि म्हणाला "कांहींच करूं नकोस!"

तिनं डोळे मोठाले करून त्याच्याकडे बघितलं. मार्दवाची केवढी शोभा दाटली होती तिच्या डोळ्यांत! त्या डोळ्यांनीं त्याला विचारलं "म्हणजे काय?"

तो हळूंच म्हणाला, "क्षमा कसली मागतेस? माझ्यावरचा तुझा राग म्हणजे मला हवा हवासा वाटणारा पण तुझ्याकडून कधीं न मिळालेला पुरावा होता. तुझ्या रागाचं मला वाईट वाटलं नाहीं. उलट मला जें कळायला हवं होतं तें कळलं. आणि अभिनंदन म्हणतेस पण शब्दांनीं कशाला करायला हवं? तुझ्या चेहऱ्यावर तें ओसंडून वहातं आहे."

मैनानं चपापून इकडे तिकडे पाहिलं. व्हरांड्यात कोणी नव्हतं. पण ती बोलली नाहीं. तिच्या तोंडून शब्द उमटेचना. तिनं फक्त पुन्हां त्याच्याकडे पाहिलं. तिच्या डोळ्यांत आसवांची गर्दी झाली होती.

तो तिला हळूंच म्हणाला, "लायब्ररींत जाऊं. तिथें या वेळेस कोणी नसेल."

आज तिला एकच पेपर होता. तिनं सांगून ठेवल्याप्रमाणें ड्रायव्हर गाडी घेऊन आला. गाडींत बसल्यावर सुरेश तिला म्हणाला "कुठें जायचं?"

ती म्हणाली, "तूं म्हणशील तिथें."

" माझ्या खोलीवर जाऊं या ? "

" म्हणजे काय ? तूं खोलींत राहतोस ? तुझं घर नाहीं इथें मुंबईत ? "

सुरेश हंसला. तो म्हणाला "माझी हकीगत थोडीशी चमत्कारिक आहे. ती ऐकून तुला कदाचित् आश्चर्य वाटेल."

" तुझ्याबद्दलचं कांहीं सांगितलंस तरी मला आश्चर्य वाटायचं नाहीं."

" असं म्हणते आहेस परंतु तुला आश्चर्य वाटेल. पण माझी हकीगत सांगायची ती इथें गाडींत नको. खोलीवर पोचल्यावरच सांगेन."

" खोलीवर म्हणजे कुठें ? ड्रायव्हरला तूंच सांग रस्ता."

लॅमिंग्टन रोडवर एके ठिकाणीं गाडी थांबली. सुरेशच्या मागोमाग मैना उतरली. एका लहानशा तीन मजली इमारतींत शिरली. दोन प्र स्त स्वच्छ जिने चढून गेली, खोलीचं कुलुप तो उघडीत होता तेव्हां त्याच्या उजव्या दंडाभोंवतीं विळखा घालून उभी राहिली, त्यानं दार लोटलं व " ये " म्हटलं तेव्हां ती आंत गेली.

खोली खूपच प्रशस्त होती. खोलीभर जाड सतरंजी घातलेली होती. पुस्तकं, सुंदर फ्रेम केलेले लहान मोठे फोटो, फोटोग्राफींतल्या व हॉकींतल्या नैपुण्याबद्दल मिळालेले चांदीचे लहान मोठे पेले व पदकं असा त्या खोलीचा साजशृंगार होता. एका कोपऱ्यांत हॉकीच्या काठ्या उभ्या होत्या..कडेच्या भिंतीला दार होतं त्यावर पडदा झुलत होता. पडद्याच्या झिरझिरीत अंगांतून आंतल्या खोलीचा कांहीं भाग दिसत होता...

सुरेश म्हणाला, " बैस ना."

ती उगीचच खुदकन हंसली. हळूंच पावलं टाकीत ती कोपऱ्याकडे गेली आणि हॉकीच्या काठ्यांकडे बघत तिनं विचारलं, " ह्यांतल्या कोणत्या काठीनं काल गोल केलास ? "

तो म्हणाला, " काठीनं चेंडू मारायचा असतो इतका हॉकीचा खेळ कळतो आहे म्हणायचा तुला ! रितां वेदीपेक्षा फारशी

मागासलेली नाहींस !"

" आतां तूं काढलंस कां तिचं नांव ?"

" काल रिता आली होती ना मॅच पाह्यला. तिनं मला किती उत्तेजन दिलं. मला दुखापत झाली असं कळल्यावर ती ड्रेसिंग रूममध्यें आली आणि म्हणाली माझं तुमच्यावर फार प्रेम आहे."

रडव्या आवाजानं मैना म्हणाली, " आतां बस कर ना बाबा ! कितीदां क्षमा मागूं तुझी ?"

" मीं रिताला म्हटलं, माझ्याशीं लग्न करशील कां ? मला पंजाबी ब्यूटी फार आवडते—"

मैनानं कोपऱ्यांतली एक काठी उचलली आणि ती उगारून म्हटलं, " आतां बघ हं."

मोठमोठ्यांदा हंसत सुरेश तिच्याजवळ गेला. त्यानं तिच्या हातांतली काठी काढून घेतली आणि विचारलं " आतां रिताचं नांव कधीं काढणार नाहींस ?"

"कध्धी नाहीं ! तुझ्या गळ्याशपथ !" तिनं भावनेच्या आवेगांत हात उंच करून त्याच्या गळ्यावर टेकला. त्यानं तो हळूच धरला व तिच्या लुसलुशीत ओटांचं चुंबन घेतलं.

तो कॉफी करण्यासाठीं म्हणून आंतल्या खोलींत गेला. " मी करतें कीं कॉफी " असं ती म्हणाली, परंतु त्यानं तें मानलं नाहीं. " तूं बैस इथेंच " असं म्हणून तो गेला. परंतु तो गेल्यावर ती बसली नाहीं. खिडकीशीं उभी राहिली. मोठ्या रस्त्याच्या बाजूची ती खिडकी होती. समोर दूर अंतरावर ' मलबार हिल ' चं टोक दिसत होतं. अलीकडे चौपाटीचा भाग होता तिथें समुद्राचं पाणी उन्हांत चमचम करीत होतं. त्याच्या अलीकडे आगगाडीचे रूळ होते, त्यावरून एक लोकल गाडी धांवत गेली. अगदीं अलीकडे रस्त्याला लागून पेट्रोलच्या पंपाची प्रशस्त जागा होती. दूरच्या डाव्या कोपऱ्यांत उंच उंच लाकडी बोर्डांवर लावलेल्या सिनेमाच्या मोठाल्या जाहिराती होत्या. ' आवारा ' चित्रपटाच्या जाहिरातींत एक तरुण पुरुष आणि एक तरुण स्त्री हातांत हात

घालून चाललेली रंगविली होती... त्या चित्राकडे मैना बघत राहिली...तिच्या मनांत आलं, सुरेश आणि मी अशीच हातांत हात घालून लवकरच आयुष्याच्या वाटेनं चालायला लागूं...

ती मनाशीं ठरवीत होती, आज घरीं गेल्यावर आपल्या प्रेमाची आणि सुरेशची सारी हकीगत ताराला सांगायची. उद्यां सुरेशला आपल्या घरीं न्यायचं, आणि नानांची व त्याची ओळख करून द्यायची. तिच्या घरांतलं वातावरण सध्यां चमत्कारिक आणि खिन्न झालं होतं. डॉक्टर आणि तारा चिंतेत चूर झालीं होतीं. त्या चिंतेत तीही सहभागी होती. परंतु ती चिंता अंतःकरणांत ठरूं नये इतकं तिचं अंतःकरण हर्षानं भरलेलं होतं. आपल्या प्रेमाची गोड कहाणी आईबापांना सांगण्यासारखी घरांतली परिस्थिति नाहीं ही शंका तिला क्षुल्लक वाटत होती. सुरेशसारख्या तरुणाचं आणि आपलं प्रेम जमलेलं पाहून आपल्या आईबापांना आनंदच होईल, कदाचित् आपल्या आनंदाशीं तद्रूप झाल्यानं त्यांची खिन्नता नाहींशी होईल असं मैनाला वाटलं. घरावर आलेल्या संकटाची छाया जाऊं द्यावी आणि मग आपल्या प्रेमाची कहाणी आई-बापांना सांगावी असं मैनाच्या मनांतदेखील आलं नाहीं. आनं-दानं तुडुंब भरलेलं आपलं हृदय तारापुढें आणि नानांपुढें उघडं करा अशी तिला घाई झाली होती. सारा संयम, सारा विवेक जिच्यामुळें अशक्य होतो अशी नाजूक चाहूल तिला आतां अगदीं स्पष्ट ऐकूं येत होती...

मैनाच्या मनांत आलं, अचलेच्या लग्नाला नानांनीं विरोध केला, माझ्या बाबतींत तसं घडण्याचं कांहींच कारण नाहीं. माझा सुरेश ताराच्या आणि नानांच्या पसंतीस संपूर्णतः उतरेल असाच आहे. कांहीं म्हणतां कांहीं दोष नाहीं त्याच्यांत. बिचाऱ्या अचलेला घरा-बाहेर पडावं लागलं. नानांचा तर तिच्यावर अजूनदेखील गुप्त रोष होता. परंतु तरीदेखील ती आपल्या प्रीतीला जागली. जी चाहूल तिला ऐकूं आली तिनं तिला सामर्थ्य दिलं. तीच चाहूल आतां मला ऐकूं येत आहे. आणि माझा मार्ग अगदीं सोपा आहे.

आईच्या आणि नानांच्या प्रेमाला न आंचवितां मला सुरेशशीं लग्न करतां येईल...

घंटा वाजल्याचा आवाज झाला तेव्हां ती दचकली. खिडकींतून वळून तिनं पाहिलं तों झगेवाल्या मडमेच्या आकाराची जी पितळी घंटा मघाशीं तिनं टेबलावर पाहिली होती ती उचलून सुरेश वाजवीत होता. ती हंसली. त्यानं घंटा परत टेबलावर ठेवली, आणि छोट्या टेबलावर मांडलेल्या ट्रेकडे हात ऐटदारपणें झुकवून म्हटलं, " कॉफी ! "

कॉफी घेतां घेतां तिनं विचारलं " एकटाच राहतोस इथें ? मग तुझं घर कुठें आहे ? "

तो म्हणाला " इथें मुंबईतच आहे. "

मैनानं मान हालविली. ' कुठें ' म्हणून तिनं विचारलं नाहीं. त्याचं घर कुठं आहे, घरांत माणसं कोण आहेत, त्यांच्यात न राहतां तो निराळा एकटा का राहातो, इत्यादि प्रश्नांबद्दलची जिज्ञासा तिला एकाएकीं वाटेचाशींच झाली. या प्रश्नांचं काय महत्त्व होतं ? या प्रश्नांचा आणि तिच्या प्रेमाचा काय संबंध होता ? त्याचं रूप, त्याचे गुण यांवर ती भाळली होती. त्याचा सहवास, त्याचा निकट स्पर्श यांची ती भुकेली होती. त्याच्या प्रीतीची साक्ष त्याची नजर देत होती. त्याच्या पहाण्यांत, त्याच्या बोलण्यांत जी चाहूल होती तिनं ती त्याच्याकडे ओढली जात होती...त्याचं घर कुठें कां असेना ? ' कुठें ? ' म्हणून विचारण्याऐवजीं ती नुसती त्याच्याकडे बघत राहिली...

परंतु तिनं विचारलं नाहीं तरी तो सांगूं लागला, " घर लहान सहान नाहीं, चागलं मोठं आहे. श्रीमंताचं आहे. दिमाखदार आहे. परंतु मला तिथें रहावंसं वाटत नाहीं. लहानपणीं रहात होतों. लिमयांच्या घरांत मी दत्तक गेलों त्यानंतरही मी बापाकडेच रहात होतों. माझा दत्तक बाप मला धड आठवत नाहीं. आई आठवते. ती चार वर्षांपूर्वी वारली. आतां मी एकटाच आहे. माझे जन्मदाते आईबाप असूनही मी स्वतःला पोरकाच समजतों. त्यांच्या-

कडे कधीं मी जातदेखील नाहीं. मॅट्रिक होईपर्यंत मला फारसं कांहीं कळत नव्हतं. पण मग वडिलांची एकेक विपरीत गोष्ट कळूं लागली. सारी न्याय नीति धाब्यावर बसवून केवळ पैसा हें ध्येय ठेवून भरभराटीला येणारीं माणसं असतात, त्यांपैकीं माझे वडील एक आहेत हें माझ्या ध्यानांत येऊं लागलं. माझ्या दत्तक घरची पुष्कळशी इस्टेट त्यांनीं बळकावली. माझ्या दत्तक आईला लुबाडलं. तिचा छळ केला. या गोष्टी कळूं लागल्या आणि उघड्या डोळ्यांनीं पहावेनात तेव्हां माझ्या वडिलांशीं माझीं भांडणं होऊं लागलीं. शेवटीं माझी दत्तक आई वारली तेव्हांपासून मी असा एकटा राहूं लागलों. माझ्या वडिलांच्या तडाख्यांतून दत्तक घरची जी थोडी फार इस्टेट वाचली तेवढीच आतां माझी इस्टेट. ती मोठीशी नाहीं, परंतु मला पुरेशी आहे. मी फार श्रीमंताचा मुलगा आहे अशी नाहीं ना तुझी कल्पना ?—"

तो बोलतां बोलतां थांबला तेव्हां मैनाला चटकन उत्तर दिलं नाहीं. तो जें सांगत होता त्याकडे तिचं धड लक्ष नव्हतं. तो थांबला तेव्हां ती थोडीशी दचकली. त्यानं आपल्याला कांहीं तरी विचारलं हें तिच्या लक्षांत आलं, आणि त्यानं काय विचारलं त्याची आठवण तिनं करून पाहिली. तें आठवल्यावर ती थोडी हंसली आणि म्हणाली, " मी कोण अशी मोठ्या श्रीमंताची लेक लागून राहिलें आहे ! "

तो हंसला आणि म्हणाला, " श्रीमंताची लेक नाहींस कां तूं ? माझा तर तुझ्याकडून मिळणाऱ्या हुंड्यावर डोळा आहे ! "

" असं कां ? आकडा सांगून तरी ठेव म्हणजे आमच्या नानांना तो सांगेन, आणि त्यांना झेपण्यासारखा असला तरच तुझं स्थळ त्यांना सांगेन. "

" माझं स्थळ ! " तो मोठमोठ्यांदा हंसूं लागला, आणि 'स्थळ' या विचित्र शब्दांतला सारा विनोद एकदम लक्षांत आल्याप्रमाणें मैनादेखील खूप हंसूं लागली.

ती जायला निघाली तेव्हां त्यानं तिला विचारलं, " तुझ्या

नानांना माझं स्थळ पसंत पडेल कां ? तुला काय वाटतं ? ”

ती हंसली आणि म्हणाली, “ मी सांगेन ना त्यांना लाखांतलं स्थळ आहे म्हणून. ”

“ केव्हां सांगशील ? ”

“ कां ? फार घाई आहे कां तुला ? ”

“ हो, लवकर कळलेलं बरं. म्हणजे जमत नसेल तर स्थळाला दुसरीकडे खटपट करतां येईल. ”

“ होय कां ? ” असं म्हणून तिनं डोळे मोठे केले आणि त्याच्या डाव्या दंडाला चिमटा घेतला. ती म्हणाली, “ जाऊं ? ”

“ आता उद्यां—”

“ कॉलेजांत. ”

तो हंसला आणि म्हणाला, “ उद्यां कुठलं कॉलेज ? सुटी झाली कीं. ”

“ खरंच कीं. मग ? ”

“ इथेंच ये कीं ! मी वाट पाहीन. ”

त्याच्या नजरेंतला भाव दिसल्याबरोबर ती गोरी मोरी झाली. “ अं हं ! नको–” असं म्हणून तिनं मान वळविली, आणि ती जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागली.

ती घरीं पोचली तेव्हां तारा कालच्याहून निराळ्या वृत्तींत तिला दिसली. नानाही हॉस्पिटलमध्यें गेलेले नव्हते, घरींच होते. किती तरी दिवसांनीं आई, बाप, आणि लेक एकत्र बसलीं व हंसत खेळत बोललीं. बोलतां बोलतां मैनाच्या मनांत सारखं येत होतं, सुरेशचा विषय काढावा काय ? साऱ्या गोष्टी यांना सांगाव्यात काय ? सुरेशला केव्हां आपल्या घरीं बोलावूं असं विचारावं काय ? पण तिला धीर झाला नाहीं. नानांच्या गप्पा ती ऐकत राहिली. त्यांच्या गप्पांत वरचेवर शेवंतीबाईच्या प्रकरणाचाच विषय निघत होता. मात्र त्याबद्दल आतां चिंतेंत असल्यासारखं ते बोलत नव्हते. ते पुन्हां पुन्हां म्हणाले, “ पन्नास हजार रुपये देऊन संपविलं एकदांचं प्रकरण. या तारानं आग्रह केला म्हणून, नाहीं तर

शेवड्यांचा सल्ला ऐकून खटला होऊं देणार होतों मी." तारा म्हणाली, "आतां असं म्हणतां काय? किती घाबरून गेलां होतात माहीत आहे मला." ते म्हणाले, "हं:! घाबरलों होतों काय?" तारा म्हणाली "छे छे! फक्त जेवणखाण सोडलं होतं आणि झोप उडाली होती इतकंच!" तें ऐकून मैना हंसली आणि मग नाना आणि ताराही हंसलीं.

डॉक्टर म्हणाले "डॉक्टर विष्णु पंडित इतका बदमाश असेल अशी कल्पना नव्हती. खरोखर डाकूच म्हणायला हवा."

मैना चेष्टेनं म्हणाली "साधा डाकू नाहीं. जर्मन—रिटर्न्ड डाकू."

"तर काय! कधीं सावली अंगावर पडली त्याची तर आंघोळ करावी असा."

तारा हंसली आणि म्हणाली "तुमच्या अंगावर कशाला पडणार आहे त्याची सावली?"

"पडणार नाहीं ग. पण आपलं सांगितलं. असल्या बदमाष लोकांना डॉक्टरीचा धंदा तर करूं देतां कामां नयेच, पण समाजानं वाळींत टाकायला हवं!"

मैनानं आपल्या मनांतला विषय मनांतच ठेवला. मात्र घरावर आलेली संकटाची छाया दूर झाली याचा तिला आनंद झाला. तारा आणि नाना दोघंही चिंतेत असतांना त्यांच्याजवळ सुरेशची गोष्ट कशी काढायची असं तिला जें वाटलं होतं तें वाटेनासं झालं होतं. रात्रीं ती निजली ती अशा विचाराच्या आनंदांतच कीं आपला मार्ग आतां मोकळा झाला आहे, नानांना आणि ताराला आपल्या मनांतलं आतां सांगायला कांहींच हरकत नाहीं. सुरेशच्या खोलीवर उद्यां गेल्यावर येतांना त्याला बरोबर घेऊन घरीं आणलं तरी-देखील चालण्यासारखं आहे. सुरेशशीं चेष्टेनं काय बोलायचं तें मनांतल्या मनांत ती जुळवूं लागली ... "आमच्या घरीं तुला दाखवायला नेणार आहे मी आज! येतोस?" तो कदाचित् म्हणेल, "माझा डावा हात गळ्यांत बांधलेला आहे! असाच आलों तरी

चालेल कां?" "दोन्ही हात गळ्यांत असले तरीदेखील पसंत पडशील!" तो कदाचित् मिस्किल नजरेनं बघेल आणि विचारील, "माझ्या स्वतःच्याच गळ्यात घालूं कीं तुझ्या?..." अशा प्रकारचा गोड संवाद मनाशीं रचीत ती झोपीं गेली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा पितां पिता डॉक्टरांनीं ताजं वर्तमानपत्र उघडून पाहिलं आणि ते एकदम ताराला म्हणाले, "ही बातमी पाहिलीस काय? डॉक्टर विष्णु पंडितला अटक झाली आहे."

तारा म्हणाली "म्हणजे? काय, सांगतां काय?"

"बघ ना" असं म्हणून डॉक्टरानीं वर्तमानपत्राची घडी तारापुढें केली.

मैना खुर्चीवरून उठली, ताराच्या पाठीशीं जाऊन खालीं वाकून ताराबरोबरच वर्तमानपत्रांतील ती बातमी वाचूं लागली.

"एका जर्मन-रिटर्नड डॉक्टराला व्हिस्कीचा बेकायदा सांठा केल्यबद्दल अटक."

असा मोठ्या टाइपांतला मथळा होता. खालीं पोलीस छाप्याचा समग्र वृत्तान्त दिला होता.

वर्तमानपत्र हातावेगळं करीत तारा म्हणाली, "देवाच्या घरीं अजून थोडासा न्याय शिल्लक आहे म्हणायचा!"

डॉक्टर म्हणाले "डॉक्टर पंडितला अटक झाली यावरनं म्हणतेस कीं काय?"

"होय ना. आतां कोर्ट चांगली शिक्षा ठोठावीलच कीं नाहीं?"

डॉक्टर हंसले आणि म्हणाले "भ्रम आहे तुला. डॉक्टर पंडितला शिक्षा बिक्षा कांहीं व्हायची नाहीं. निर्दोषी म्हणून तो सुटेल कीं नाहीं बघ."

"सुटला तर फार वाईट वाटेल मला."

"तुझ्या वाईट किंवा बरं वाटण्यावर जग नाहीं चाललेलं. या हातानं द्यावं अन् त्या हातानं घ्यावं असं आपण म्हणतों. पण तो

निव्वळ भ्रम आहे. डॉक्टर विष्णु पंडितमारखीं माणसं ख्याली-खुशालींत मानमरातबांत रहावीं हाच दुनियेचा न्याय आहे."

"असेल बाई. परंतु खरं विचाराल तर मीं देवाला नवस केला आहे कीं डॉक्टर पंडितचं कांहीं वाईट झालेलं ऐकेन तेव्हां पेढे वाटीन. फार फार छळवाद केला त्यानं आपला."

"तर काय? आणि चीड येते ती अशा विचाराची कीं त्याचं परिपत्य करण्याचं कांहींदेखील साधन आपल्याजवळ नसावं."

मैना जरा वेळानं उठली आणि आंघोळीसाठीं न्हाणीघरांत गेली.

ती बाहेर आली तेव्हां तारानं तिला सांगितलं, "तुला टेलिफोन आला होता ग."

"कुणाचा?"

"नांव सांगितलं नाहीं. आवाजही माझ्या ओळखीचा नव्हता. ज्यानं फोन केला तो म्हणाला, मी घाईत आहे, मैनाला एवढंच सांगा कीं आजच्या सभेला घटकाभर आधींच ये."

मैनाला चटकन बोध झाला नाहीं. टॉवेलनं केस घाशीत ती ताराकडे बघत राहिली.

तारानं विचारलं, "कसली सभा?"

"आलं लक्षांत!" असं म्हणून मैना खुदकन् हंसली आणि खोलीकडे पळाली.

खोलींत गेल्याबरोबर तिनं दार बंद केलं आणि ती मोठ्यांदा हंसूं लागली. "सभा! सभा!" असा उद्गार काढीत हंसत ती आरशापुढें उभी राहिली, आणि जणुं सुरेश तिच्यापुढें उभाच होता अशी कल्पना करून ती म्हणाली, "किती लबाड आणि चतुर आहेस तूं! घटकाभर आधींच येऊं काय...येईन बरं. मात्र सभेचं काम लवकर आटपलं पाहिजे बरं कां. कारण सभेनंतर तुला इकडे बरोबर घेऊन येणार आहे मी. नानांना दाखवायसाठीं. शक्य तर आमच्या घरीं जेवायला ठेऊन घेणार आहे तुला..."

त्यानंतर तिचं कशाकडेदेखील चित्त लागेना. सुरेशकडे जाण्याची घटका केव्हां एकदां येते अशी तिच्या जिवाला घाई झाली होती. तोंपर्यंतचा वेळ जादूनं उडून जावा असं तिला वाटत होतं घरांतलं वातावरण पुष्कळच प्रसन्न झालं होतं. नाना आणि तारा खुषींत होतीं. तिच्या लग्नाला त्यांची संमति मिळण्यास कसलीदेखील अडचण नव्हती. तिचा प्रियकर त्यांना आवडेल याबद्दल शंकेला जागाच नव्हती. अचलेच्या वाट्याला जो झगडा आला होता. तसला प्रसंग तिच्यावर येण्याची कांहींच शक्यता नव्हती. तिच्या अंतःकरणांत अगदीं निर्भेळ हर्ष भरला होता. जी चाहूल तिनं ऐकली होती ती विलक्षण सुखाची तर होतीच, परंतु ती ऐकून ज्या वाटेनं ती जाणार होती त्या वाटेवर काटे नव्हते, गुलाबाचे गेंद विखुरले होते ...

ती कशी बशी तीन वाजेपर्यंत घरांत टिकली. मग ती निघाली किती वाजतां परत येतां येईल त्याचा नेम नसल्यामुळें, किंबहुना लवकर येतां येणार नाहीं हें ठाऊक असल्यामुळें, ती नानांना म्हणाली, " गाडी नको मला. मी जाईन बसनंच." ती घाईघाईनं निघाली आणि बसच्या स्टॉपवर गेली. तिला माहीत नव्हतं, परंतु तिची थोरली बहीण दिवाकरला भेटण्यासाठीं याच बस स्टॉपवर जाऊन उभी रहात असे ! पंधरा वर्षांनंतर आतां अचलेऐवजीं ती उभी राहिली होती ! जी चाहूल अचलेनं ऐकली तीच तिला ऐकूं आली होती म्हणून !

" कुठें निघालीस ग ? " असा कुणाचा तरी प्रश्न ऐकूं आला म्हणून मैनानं पाहिलं.

पाटकरांची पद्मा तिच्याकडे चालत येत होती.

ती हंसली.

पद्मा जवळ आली व म्हणाली " आज मावशीकडे जेवायला आलें होतें. परत चाललें. तूं कुठें निघालीस ? "

" सभेला ! " असं सांगतांना मैनाला मनांतल्या भयंकर हंसूं आलं.

" कसली सभा ? "

खोटं बोलण्याचे तपशील ऐन वेळेस तयार करून सांगण्याची मैनाला संवय नव्हती. ती म्हणाली " अशीच ! ", आणि तो विषय पुढें चालूं राहूं नये म्हणून दूरवर बघून ती उद्गारली, "केव्हां येणार आहे मेली बस कुणास ठाऊक ? "

पद्मानं हातांतलं वर्तमानपत्र उघडलं आणि विचारलं, " ही विलक्षण बातमी वाचलीस काय ? "

" असल्या बातम्या रोजच्च येताहेत कीं. भट्टी पकडली ! छापा घातला ! रोज मरे त्याला कोण रडे ? "

"अग पण माझ्या मावशीच्या नवऱ्यानं कांहीं विलक्षणच बातमी सांगितली."

" हं ? "

" ते हॉकीचे मोठे षोकी आहेत. टाटामधेंच नोकरीला आहेत. त्यांच्या संघाचा परवां पराजय झाला, माहीत आहे ना तुला ? "

या पद्मानं हें काय बोलणं काढलं असं मनाशीं आश्चर्य करीत मैना नुसतं म्हणाली, " हं ! "

" त्यांना सुरेश लिमयेचा फार अभिमान आहे—"

" होय कां ? "

" हो ना. तर ते मला काय म्हणाले माहीत आहे ? मी अगदीं थक्कच झालें त्यांनीं सांगितलं तें ऐकून."

अजूनहि पद्माच्या बोलण्याचा रोख मैनाच्या लक्षांत येईना. तिनं घाईनं विचारलं, " काय सांगितलं ? "

" ते मला म्हणाले अग पद्मा, हा तुझा सुरेश लिमये म्हणजे भांगेंत तुळस आहे बघ. डॉक्टर विष्णु पंडितसारख्या माणसाच्या पोटीं इतका गुणी मुलगा—"

मैनानं झटकन् तिचा हात पकडून करकचून दाबला आणि विचारलं, " खरं म्हणतेस पद्मा ? सुरेश लिमये म्हणजे--"

" डॉक्टर विष्णु पंडितांचा मुलगा ! तो लहानपणींच दत्तक गेला आहे म्हणून--" तिनं दूरवर पाहिलं आणि म्हटलं, " तुझी बस

आली बघ. माझ्या उपयोगाची नाहीं ही...."

मैनानं पाहिलं. परंतु तिला बस दिसेना ! कांहींच दिसेना ! तिच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली होती. पद्माच्या तोंडून तिनं जें ऐकलं होतं तें तिला भयंकर वाटलं होतं. सुरेश डॉक्टर पंडितांचा मुलगा होता ! ज्या डॉक्टर पंडितला तिचे आईबाप पूर्वजन्मीचे वैरी समजत होते त्यांचा ! हाय रे दैवा ! तिच्या हातांपायांतली शक्तिच एकदम नाहींशी झाली होती. तिच्या डोळ्यांना कांहीं दिसेनासं झालं होतं !... हॉर्न वाजवीत बसचं तांबडं धूड जवळ आल्यावर मात्र ती दचकली. परंतु भ्रमिष्टासारखी जागच्या जागीं उभीच राहिली. प्रियकराकडे धांव घेण्याची सारी घाई जणुं तिच्या मनांतल्या मनांत थिजूनच गेली होती. ज्या चाहुलीच्या दिशेनं ती निघाली होती ती जणुं तिला एकाएकीं ऐकूंच येईनाशीं झाली होती...

पद्मानं तिला म्हटलं " अग जायचं ना तुला ? "

तिनं ढकललं म्हणूनच, नाहीं तर मैनाचं पाऊल कांही बसमधें पडलं नसतं.

वळणावर बसला लहानसाच हेलकावा बसला, परंतु मैनाचा झोक इतका गेला कीं ती खालींच पडणार होती. कंडक्टरनं तिला सावरलं आणि म्हटलं " दारांत कां उभ्या राहिलांत आपण ? बसा ना " ती एका बाकावर जाऊन बसल्यावर त्यानं तिला विचारलं, " कुठलं तिकीट देऊं ? "

कुठलं तिकीट ? कुठे जाणार होती ती ? कुणाकडे ?...क्षणभर मैनाला कांहींदेखील आठवेना. मोठ्या प्रयासानं ती भानावर आली आणि म्हणाली, " ऑपेरा हाऊस. "

तिच्या चित्ताचे तुकडे तुकडे झाले होते, आणि ते जुळवून सांधणं तिला फार कठिण जात होतं. तिनं बाकावर मान टेकली, डोकं घट्ट दाबलं, डोळे मिटून घेतले, आणि ती मनाशीं म्हणाली, " विचार करायला हवा ! विचार करायला हवा ! "

पद्मानं जी गोष्ट तिला सांगितली होती ती आधीं तिच्या

स्वप्नांतदेखील नव्हती. सुरेश काल तिला आपली हकीगत सांगत होता तेव्हां तिच्याकडे तिनं धड लक्षदेखील दिलं नव्हतं. तिला वाटलं होतं, असेल कांहींही हकीगत, मला काय करायचं आहे ?... आणि आतां तिला जें कळलं होतं तें जसं अतर्क्य होतं तसंच फार महत्त्वाचंही होतं. सुरेश डॉक्टर विष्णु पंडितचा मुलगा होता ! बापाशीं पटत नाहीं म्हणून तो घराबाहेर पडला होता व वेगळा रहात होता. परंतु डॉक्टर पंडित त्याचा जन्मदाता बाप होता ! तिला स्वतःला या गोष्टीचं बिलकुल महत्त्व वाटत नव्हतं. परंतु नानांना आणि ताराला तें वाटल्यावाचून कसं राहील ? आणि सुरेशशीं तिचं लग्न ते कसं होऊं देतील ? नाना तिला म्हणतील, " माझ्या वैऱ्यांच्या मुलाशीं लग्न करणार तूं ? " तारा म्हणेल, " अग ज्यानं आपला भलता छळवाद केला, आपल्याला पन्नास हजार रुपयांना लुबाडलं, त्या दुष्ट माणसाच्या मुलाशीं— " दिवाकराच्या प्रेमांत सापडल्याबद्दल अचलेला जशा नानाच्या शिव्या खाव्या लागल्या होत्या तशाच शिव्या आतां तिला खाव्या लागणार होत्या ! अचला प्रेमासाठीं घराबाहेर पडली होती. आतां कदाचित् तिलाही घराबाहेर पडावं लागणार होतं. या प्रेमाच्या चाहुलीचा नित्याचाच असा धर्म आहे काय कीं ज्या वाटेनं तें बोलावतं त्या वाटेनं दुःख सोसावंच लागतं ?...सुरेशकडे जायचं म्हणून ती घरांतून बाहेर पडली होती. पण आतां " जाऊं कीं जाऊं नको ?" " जाऊं कीं जाऊं नको ?" अशा प्रश्नांचे प्रहार तिच्या मनावर होत होते.

" ऑपेरा हाऊस ! "

जवळच उभ्या असलेल्या कंडक्टरची ती आरोळी कानांवर आली तेव्हां मैना भानावर आली. ती उठली, बसमधून उतरली, रस्त्यानं चालूं लागली. परंतु ' जाऊं कीं नको ? ' हा तिच्या मनांतला मंत्र अजून चालूच होता. एखाद्या यंत्राचे दोन घण आळीपाळीनं आपटत रहावे त्याप्रमाणें ' जाऊं ? ' ' जाऊं नको ? ' या शब्दांचे आवाज तिच्या मनांत घुमत होते...दूर समोरच्या कोपऱ्यावर उंच बोर्डावर लावलेल्या सिनेमाच्या जाहिरातींतली ती ' आवारा ' ची